श्रीकृष्णानें पाहिलें ॥ १२ ॥ त्यानें शंख, चक्र, तरवार, गदा, शार्ङ्ग धनुष्य, श्रीवत्सचिन्ह इत्यादि धारण केलीं असून कंठांत कौस्तुभासारखा मणि व गळ्यांत वनमाला घालून स्वतःला भूषविलें होतें ॥ १३ ॥ त्यानें रेशमाचीं दोन वस्त्रें परिधान केलीं असून रथावर गरुडचिन्हांकित ध्वज फडकविला होता. त्याच्या मस्तकावर अमूल्य किरीट व अलंकार असून कानांत मकराच्या आकाराचीं कुंडलें होतीं ॥ १४ ॥ याप्रमाणें आपल्यासारखा पण कृत्रिम असा वेष धारण केलेला पौंड्रक, एखादा नट रंगभूमीवर नटून यावा त्याप्रमाणें त्या रणभूमीवर आलेला जेव्हां कृष्णानें पाहिला, तेव्हां त्याला मोठें हसूं कोसळलें ॥ १५ ॥ असो. तेथें जमलेल्या त्या शत्रूंनीं शूल, गदा, परिघ, शक्ति, ऋष्टि, प्रास, तोमर, तरवारी, पट्टे, बाण इत्यादि शस्त्रास्त्रांचा मारा श्रीकृष्णावर चालू केला ॥ १६ ॥ तेव्हां कृष्णानेंहि उलट त्या पौंड्रक व काशिराज यांचे हत्ती, रथ, घोडे व पायदळ यांनीं युक्त अशा सैन्यावर गदा, तरवार, सुदर्शनचक्र व बाण इ. शस्त्रास्त्रांनीं चाल केली व प्रळयकाळचा अग्नि जशी चतुर्विध प्राण्यांची दशा करितो, तशी त्यानें त्यांची दशा केली ॥ १७ ॥ श्रीकृष्णाच्या चक्रानें शत्रुसैन्याचे रथ, घोडे, हत्ती, सैनिक, गाढवें, उंट इत्यादींचा संहार केल्यामुळें त्यांचा रणांगणावर खच पडला असतां तें रणांगण धैर्यशाली लोकांना आनंद देणारें असें भूतपति शंकराच्या भयंकर क्रीडांगणाप्रमाणें शोभूं लागलें ॥ १८ ॥ नंतर श्रीकृष्ण पौंड्रकाला म्हणाला, ' हे पौंड्रका, दूताबरोबर निरोप पाठवून तूं मला सांगितलेंस त्याप्रमाणें मीं तीं शस्त्रास्त्रें आतां तुझ्या अंगावर टाकतों ! ॥ १९ ॥ तसेंच, हे मूर्खा, तूं माझें नांव जें खोटेपणानें धारण केलें आहेस, तेंहि तुला सोडून द्यावयास लावितों पहा ! इतकेंच काय पण मला तुझ्याशीं लढण्याची जर इच्छा नसती, तर मी तुला आज खचित शरणहि आलों असतों ! ' ॥२०॥ याप्रमाणें श्रीकृष्णानें पौंड्रकाची निंदा केल्यावर त्याच्या रथावर बाण मारून तो मोडून टाकिला व इन्द्र जसा वज्रानें पर्वताचें शिखर तोडितो, त्याप्रमाणें कृष्णानें त्या रथहीन झालेल्या पौंड्रकाचें मस्तक आपल्या सुदर्शन चक्रानें तोडून टाकिलें ॥ २१ ॥ तसेंच त्यानें बाण मारून काशिराजाचेंहि मस्तक धडापासून वेगळें केलें. आणि वारा जसा कमळाचा कळा वाहून नेतो त्याप्रमाणें तें मस्तक काशिनगरींत नेऊन टाकिलें ॥ २२ ॥ अशा रीतीनें आपला मत्सर करणाऱ्या पौंड्रकाचा व त्याचा मित्र जो काशिराजा त्याचा वध केल्यावर श्रीकृष्ण द्वारकेस परत आला असतां, सिद्धगण त्याच्या अमृतासारख्या मधुर कथा गाऊं लागले ॥२३॥ शुकाचार्य सांगतात, हे परीक्षित् राजा, पौंड्रक हा नित्य भगवान् श्रीकृष्णाचें ध्यान करीत असून त्याचें स्वरूपहि धारण करीत असल्यामुळें त्याचीं सर्व बंधनें नष्ट होऊन तो स्वतः कृष्णपरमात्म्यांत लीन झाला. ॥२४॥ इकडे काशी नगरींत राजवाड्याच्या दाराशीं कुंडलांनीं युक्त असें मस्तक पडलेलें पाहून तें कोणाचें असावें व तें तेथें कसें आलें याविषयीं लोकांत तर्कवितर्क चालू झाले ॥ २५ ॥ शेवटीं तें मस्तक काशीच्या राजाचेंच होय असें समजून आलें व तें पाहून त्या राजाच्या राण्या, मुलगे, नातेवाईक व नागरिक लोक ' हे राजा, हे आमच्या आश्रयदात्या, आमचा घात झाला ! ' असें म्हणून रडूं लागले ॥ २६ ॥ त्या राजाला सुदक्षिण नांवाचा मुलगा

होता. त्यानें पित्याचें उत्तरकार्य केलें आणि आपल्या पित्याचा वध करणाराचा उलट वध करून पित्याच्या ऋणांतून मुक्त होण्याचा त्यानें निश्चय केला ॥ २७ ॥ याप्रमाणें मनांत निश्चय केलेल्या त्या सुदक्षिणानें नंतर आपल्या उपाध्यायाच्या साहाय्यानें समाधिसाधनानें महेश्वराचें पूजन केलें ॥ २८ ॥ त्या पूजनानें भगवान् महेश्वर त्याच्यावर संतुष्ट होऊन त्याला वर देऊं लागला. तेव्हां 'पित्याचा वध करणाराच्या वधाचा उपाय हाच वर मला इष्ट आहे' असें त्यानें सांगितलें ॥ २९ ॥ तें ऐकून महेश्वर म्हणाला, 'हे सुदक्षिणा, ऋत्विज् स्वरूपी दक्षिणाग्नीचें तूं ब्राह्मणांच्या साहाय्यानें पूजन कर. शत्रूचा वध करण्यासाठीं जो विधि सांगितला आहे त्या विधीप्रमाणें तें पूजन होऊं दे. अशा रीतीनें प्रसन्न झालेला अग्नि माझ्या प्रमथ नामक गणांच्या साह्यानें क्रूर कामीं लाविला म्हणजे तो तुझा मनोरथ पूर्ण करील !' महेश्वरानें याप्रमाणें आज्ञा केली असतां श्रीकृष्णाला मारण्याच्या हेतूनें सुदक्षिणानें तसें व्रतसाधन केलें ॥ ३० ॥ ३१ ॥ त्या वेळीं अतिशय भयंकर असें शरीर धारण केलेला अग्नि कुंडांतून बाहेर आला. त्याच्या मस्तकावरील केस व दाढीमिशा तापलेल्या तांब्याप्रमाणें लाल होत्या आणि त्याच्या डोळ्यांतून जळजळीत निखारें बाहेर पडत होते ॥ ३२ ॥ त्याच्या दाढा व भयंकर दंडाकार भुवया यांच्या योगानें त्याचें मुख भेसूर दिसत होतें. आपल्या जिभेनें ओठाच्या बाहेरील भाग तो चाटीत होता. तो नग्न होता आणि आपला त्रिशूळ पाजळीत होता ॥ ३३ ॥ त्याचे पाय ताडाएवढे उंच असून चालतांना तो पृथ्वीला गदगदवीत होता. त्याच्या भोंवतीं भूतांचा घोळका होता. असा तो अग्नि दाही दिशा जाळीत जाळीत द्वारकेच्या बाजूनें चाल करून जाऊं लागला ॥ ३४ ॥ दुष्ट हेतूनें येणाऱ्या त्या अग्नीला द्वारकेंतील लोकांनीं जेव्हां पाहिलें, तेव्हां अरण्यांत वणवा पेटूं लागला म्हणजे पशूंची जशी त्रेधा उडते, तशी त्या सर्व लोकांची त्रेधा उडाली ॥ ३५ ॥ ते अगदीं धावरून गेले आणि सभेंत फाशांनीं खेळत बसलेल्या भगवान् श्रीकृष्णाजवळ येऊन त्याला म्हणाले, 'त्रैलोक्यनाथा श्रीकृष्णा, हा अग्नि सारी नगरी जाळून टाकीत आहे; आमचें यापासून रक्षण कर !' ॥ ३६ ॥ त्या लोकांची ती दुर्दशा व भीतीनें ग्रस्त झालेले आपले बांधव पाहून सर्वांचा आश्रयदाता तो भगवान् श्रीकृष्ण त्यांना हंसून म्हणाला, 'लोक हो भिऊं नका, मी तुमचें रक्षण करितों.' ॥३७॥ सर्व प्राणिमात्राच्या अंतर्यामीं त्याचप्रमाणें बाहेरहि नित्य असणारा जो सर्वसाक्षी समर्थ श्रीकृष्ण त्याला तो अग्नि म्हणजे महेश्वरानें सोडिलेली घातक कृत्या आहे हें समजून आलें व तिचा नाश करण्यासाठीं त्यानें आपल्या हातांत असलेल्या सुदर्शनाला आज्ञा केली ॥ ३८ ॥ त्या सुदर्शनाचें तेज कोटि सूर्याएवढें असून प्रलयकाळच्या अग्नीप्रमाणें तें जोरानें पेटत होतें व त्याच्या तेजानें आकाश, दाही दिशा, पृथ्वी व अंतरिक्ष इत्यादि सर्व प्रदेश भरून गेले होते. श्रीकृष्णाच्या हातून सुटतांच त्या चक्रानें त्या घातक अग्नीला चिरडून टाकिलें ॥ ३९ ॥ श्रीकृष्णाच्या सुदर्शनानें याप्रमाणें त्या कृत्यारूपी मारक अग्नीचा पाडाव केला असतां, तो अग्नि वाईट तोंड करून माघारा फिरला आणि हे परीक्षित् राजा, काशीनगरीला परत येऊन त्यानें सुदक्षिण व त्याचे पुरोहित यांना समूळ जाळून टाकिलें !

अशा रीतीनें सुदक्षिणानें आपला घात आपणच करून घेतला ! ! ॥ ४० ॥ असो. कृत्याग्नीनें सुदक्षिणास जाळून टाकिल्यावर तें विष्णुचक्र काशीनगरींत शिरलें व त्यानें नगरांतील सभागृहें, बाजार, गोपुरें, चव्हाटे, कोठारें, भांडारें, हस्तिशाळा, घोडशाळा, रथशाला, स्वयंपाकगृहें इत्यादिकांचें भस्म करून टाकिलें ॥ ४१ ॥ याप्रमाणें सारी काशीनगरी जाळून टाकिल्यावर विष्णूचें तें सुदर्शन चक्र निष्पाप कर्म करणाऱ्या अशा त्या श्रीकृष्णापाशीं पुन: येऊन उपस्थित झालें ॥ ४२ ॥ जो कोणी मनुष्य पुण्यकीर्ति श्रीकृष्णाच्या या पराक्रमाचें वर्णन दुसऱ्याला ऐकवितो किंवा स्वत: शांत मनानें ऐकतो, तो सर्व पापांपासून मुक्त होतो ॥ ४३ ॥

**सहासष्टावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय ६७ वा

परीक्षित् राजा, म्हणाला, ' हे शुकाचार्य, विलक्षण पराक्रम करणारा, अंतरहित व ज्याच्याशीं कोणाची तुलनाहि करतां येत नाहीं असा जो बळराम, त्याच्यासंबंधानें पुन: कांहीं ऐकावें अशी इच्छा आहे. तरी त्या प्रभूनें जे दुसरे कांहीं पराक्रम केले असतील ते मला सांगावे. ' ॥ १ ॥

शुकाचार्य सांगतात, ' राजा, नरकासुराचा मित्र कोणी द्विविद नांवाचा वानर होता. तो सुग्रीवाचा प्रधान असून मोठा पराक्रमी होता व मैन्द नामक वानराचा भाऊ होता ॥ २ ॥ आपला मित्र जो नरकासुर त्याच्या वधाचा सूड उगवावा असें त्या द्विविद वानराच्या मनांत आलें व साऱ्या देशाचा घात होईल अशा रीतीनें आग लावून नगरें, गांव, खाणी, गौळवाडे यांना तो जाळून टाकूं लागला ॥ ३ ॥ एकदा त्यानें एक डोंगर उपटून त्याच्या खालीं आनर्त देशाचा अगदीं चुराडा करून टाकिला. कारण तेथें त्याचा मित्र जो नरकासुर त्याचा वधकर्ता श्रीकृष्ण राहत होता ॥४॥ पुन: एकदा त्यानें समुद्रांत उभें राहून त्यांतील पाणी दोन्ही हातांनीं वर फेंकिलें व तीरावरील देश त्यांत बुडवून टाकिले ! त्याला दहा सहस्र हत्तींचें बळ होतें ॥ ५ ॥ मोठमोठ्या ऋषींच्या आश्रमांत जाऊन त्यानें त्यांतील वृक्ष मोडून टाकिले व विष्ठा, मूत्र इत्यादि टाकून त्या ऋषींच्या यज्ञांतील अग्नींत घाण केली ! ॥ ६ ॥ तो अभिमानानें फुगलेला असून पर्वतांच्या गुहांत माणसांना कोंडी व कुंभेरी माशी जशी मातीच्या घरांत किड्याला कोंबून तें झांकून घेते, तसा तो दगडांनीं त्या गुहांचीं दारें बंद करून टाकी ! ॥ ७ ॥ याप्रमाणें तो साऱ्या देशाला उपद्रव देत व कुलीन स्त्रियांना भ्रष्ट करीत फिरत असतां, एकदां त्याला फार मधुर असें गायन ऐकूं आलें व त्याच्या नादावरून तो रैवतक पर्वताकडे गेला ॥ ८ ॥ तेथें यदुपति बळराम त्याच्या दृष्टीस पडला. त्याच्या गळ्यांत कमळांची माळ असून त्याचे सर्व अवयव सुरेख होते व त्याच्या भोंवतीं स्त्रियांचा घोळका जमलेला होता ॥ ९ ॥ मदिरा प्याल्यामुळें मदानें त्याचे डोळे चंचल आले असून तो तोंडानें गाणें म्हणत होता व मदमत्त झालेल्या हत्तीप्रमाणें त्याचें शरीर शोभत होतें ॥ १० ॥ त्याला पाहून तो दुष्ट वानर एका झाडाच्या खांदीवर चढून झाड हलवूं लागला आणि बळराम व त्याच्या स्त्रिया यांच्यापुढें स्वत:चें प्रदर्शन करीत किल किल शब्द करूं लागला ॥ ११ ॥ त्या वानराचा तो धीटपणा पाहून बळरामाच्या स्त्रिया हसूं लागल्या. कारण तरुण स्त्रियांच्या स्वभावाप्रमाणें त्या थट्टेखोर असून अत्यंत हास्यप्रिय अशा होत्या ॥ १२ ॥ तो वानर भुवया उडवीत त्यांच्या समोर येऊन उभा राहिला व चेष्टा करीत त्यांना वांकुल्या दाखवूं लागला. त्या स्त्रिया व बळराम त्याच्याकडे पाहूं लागलीं असतां तो त्यांना आपले कुल्ले दाखवूं लागला, तेव्हां बळरामाला राग येऊन त्यानें त्याच्यावर दगड फेंकिला. असे दगड फेंकून मारण्यांत बळराम मोठा

पटाईत होता ॥ १३ ॥ तरीपण द्विविदानें तो दगड चुकविला आणि बळरामाजवळचें मदिरेचें भांडें पळवून तो धूर्त वानर हंसत व वांकुल्या दाखवीत बळरामाला संताप उत्पन्न करूं लागला ॥ १४ ॥ त्या दुष्टानें बळरामाच्या मदिरेचा कुंभ फोडून टाकिला व त्याच्या स्त्रियांचीं वस्त्रेंहि फाडिलीं ! अशा प्रकारें उन्मत्त झालेल्या त्या बलिष्ठ वानरानें त्या सगळ्यांना तुच्छ समजून त्यांना उपद्रव दिला ॥ १५ ॥ त्याचा तो दांडगेपणा पाहून आणि त्यामुळें तेथील देशांना उपद्रव होत आहे असें जाणून बळरामाला राग आला आणि त्यानें त्या शत्रु झालेल्या वानराला ठार करण्याच्या हेतूनें आपला नांगर व मुसळ हीं उचललीं ॥ १६ ॥ तेव्हां त्या महापराक्रमी द्विविदानें सुद्धां एका हातानें जवळचा एक ताडाचा वृक्ष उपटिला व वेगानें बळरामाच्या अंगावर धांवत येऊन त्याच्या मस्तकावर त्या ताडानें प्रहार केला ॥ १७ ॥ पण तो प्रहार मस्तकावर बसत असतांहि बळराम पर्वताप्रमाणें स्थिर राहिला आणि प्रहार सहन करून आपल्या सुनन्दनामक मुसळाचा त्या समर्थानें द्विविदाला तडाखा दिला ॥ १८ ॥ तो मुसळाचा तडाखा मिळाल्यामुळें द्विविदाच्या मेंदूचा चुराडा उडाला आणि त्यांतून रक्ताच्या धारा फुटून त्याचें शरीर, कावेनें जसा डोंगर शोभतो त्याप्रमाणें शोभूं लागलें. तरी पण त्यानें त्या तडाख्याला फारसें जुमानिलें नाहीं ॥ १९ ॥ त्यानें पुनः दुसरा एक ताडवृक्ष उपटिला आणि त्याचीं पानें वेगवेगानें काढून टाकून त्याच्या योगानें तो बलरामाला रागानें झोडपूं लागला; पण बलरामानें त्याचे शेंकडों तुकडे करून टाकिले ॥ २० ॥ मग द्विविदानें आणखी एक ताड उपटून रागानें बळरामावर त्याचे प्रहार केले; पण बळरामानें त्याचेहि तसेच शेंकडों तुकडे केले. अशा रीतीनें युद्ध करीत असतां द्विविदाचा बलरामानें पुनःपुनः पाडाव केला व त्या वानरानेंहि पुनःपुनः ताड उपटून तें सारें वन वृक्षरहित करून टाकिलें ! ॥ २१ ॥ सर्व वृक्ष संपल्यावर त्या क्रोधी द्विविदानें बळरामावर पाषाणांचा वर्षाव करण्यास आरंभ केला; पण बळरामानें आपल्या मुसळानें त्या साऱ्या पाषाणांचें चूर्ण करून टाकिलें ॥ २२ ॥ शेवटीं तो बलाढ्य वानर आपल्या लांब बाहूंच्या मुठी वळून बळरामावर चाल करून आला आणि त्याच्या छातीवर दोन्ही हातांनीं गुद्दे देऊं लागला ॥ २३ ॥ तेव्हां बळरामानेंहि नांगर व मुसळ बाजूला ठेविलीं आणि रागानें आपल्या दोन्ही हातांनीं द्विविदाच्या मानगुटीवर तडाखे लगावले. बलरामाचे तडाखे बसूं लागतांच द्विविद रक्त ओकत मरून पडला ! ॥ २४ ॥ हे परीक्षित् राजा, त्याच्या पडण्यानें तो रैवतक पर्वत, जशी वाऱ्यानें नाव पाण्यांत हालते त्याप्रमाणें, त्याच्यावरील पाण्याचीं टाकीं व झाडें यांसह थरथरला ॥ २५ ॥ त्या वेळीं देव, सिद्ध आणि मोठमोठे ऋषि यांनीं बळरामाचा जयजयकार करून त्याला नमस्कार केला, आणि 'फार चांगलें केलें, फार उत्तम केलें' अशी त्याची स्तुति करून त्याच्यावर फुलें उधळिलीं ॥ २६ ॥ याप्रमाणें जगाला उपद्रव देणाऱ्या द्विविदाचा वध केल्यावर भगवान् बळराम, लोकांचा स्तुतिघोष चालला असतां द्वारकेंत परत आला ॥ २७ ॥

**सदुसष्टावा अध्याय समाप्त**

# अध्याय ६८ वा

शुकाचार्य सांगतात, हे परीक्षित् राजा, दुर्योधनाची लक्ष्मणा नांवाची एक कन्या होती. त्या कन्येच्या स्वयंवरप्रसंगीं, श्रीकृष्णाला जांबवतीपासून झालेला मुलगा जो सांब त्यानें ती स्वयंवरासाठीं उभी असतां तिचें हरण केलें ॥ १ ॥ तेव्हां कौरवांना राग येऊन ते म्हणाले, ' काय हो हा दांडगा पोर ! आम्हांला कस्पटासमान लेखून यानें आमची मुलगी तिच्या इच्छेविरुद्ध बलात्कारानें पळवून नेली ! ॥ २ ॥ तरी आतां या दांडग्या पोराला बंदींत टाका. यादवांना भिण्याचें कारणच नाहीं. ते आपलें काय करणार आहेत ? ते केवळ आमच्या कृपेनें उत्कर्षास पावले आणि आम्हींच दिलेलें राज्य उपभोगीत आहेत ॥ ३ ॥ आणि जरी कदाचित् मुलाला बंदींत टाकिलेलें ऐकून यादव येथें आलेच, तर त्यांचा गर्वपरिहार होऊन उत्तम प्रकारें दमन केलेल्या इंद्रियांप्रमाणें उगें राहाणेंच त्यांना भाग पडेल ' ॥ ४ ॥ असा विचार करून, वृद्ध कौरवांनीं अनुमोदन दिलेले ते कर्ण, शल, भूरि, यज्ञकेतु, दुर्योधन इत्यादि वीर सांबाला पकडावयास धांवले ॥ ५ ॥ ते धृतराष्ट्राचे पुत्र आपल्याला पकडण्यासाठीं आपल्यामागें लागले आहेत असें जेव्हां सांबानें पाहिलें, तेव्हां त्या शूरानें आपलें सुंदर धनुष्य हातीं घेतलें आणि त्यांना तोंड देण्यासाठीं तो सिंहासारखा एकटाच उभा राहिला ॥ ६ ॥ मोठ्या आवेशानें त्याला पकडावयास सिद्ध झालेले ते कर्ण आदिकरून कौरववीर ' उभा राहा, उभा राहा ! ' असें म्हणत, आपआपलीं धनुष्यें हातीं घेऊन त्याच्यावर चाल करून गेले आणि बाण सोडूं लागले ॥ ७ ॥ हे परीक्षित् राजा, त्या वेळीं अचिन्त्यशक्ति श्रीकृष्णाचा पुत्र असा तो सांब, कौरवांनीं बाणांची वृष्टि केली असतां, क्षुद्र प्राण्यांच्या उपद्रवाला सिंह जसा जुमानीत नाहीं, त्याप्रमाणें त्यानें त्यांची पर्वा केली नाहीं. उलट त्या वीरानें आपलें सुंदर धनुष्य सज्ज करून त्यांना चमत्कार केला आणि सर्व कौरवांना आपल्या बाणांनीं घायाळ करून सोडिलें. कर्ण आदिकरून सहा वीरांना एकाच वेळीं सहा सहा बाण मारून त्यानें त्यांना विव्हल केलें ॥ ८ ॥ ९ ॥ प्रत्येकीं रथावर चार चार बाण सोडून त्यांचे चारी घोडे चीत केले. एकएक बाणानें सारथ्याला घायाळ केलें आणि एकेका बाणानें मोठमोठीं धनुष्यें घेतलेल्या रथी वीरांचीहि त्यानें तीच दशा उडविली ! सांबाचा तो पराक्रम पाहून सर्वांनीं त्याची स्तुति केली ॥ १० ॥ नंतर ( त्यांनीं कट करून ) चौघांनीं सांबाच्या रथाचे चार घोडे मारिले, एकानें सारथ्याचा वध केला व एकानें त्याचें धनुष्य तोडून टाकिलें ॥ ११ ॥ याप्रमाणें या कौरवांनीं त्याला कसेंबसें मोठ्या कष्टानें रथहीन केल्यानंतर त्याला त्यांनीं बांधलें आणि नंतर त्यासह आपली कन्या जी लक्ष्मणा तिला घेऊन ते विजयी झालेले कौरववीर नगरांत परत आले ॥ १४ ॥ शुकाचार्य म्हणतात, हे परीक्षित् राजा, हें हस्तिनापुरांत घडलेलें वर्तमान जेव्हां

नारदाच्या तोंडून यादवांच्या कानीं आलें, तेव्हां त्यांना संताप उत्पन्न झाला आणि उग्रसेनाच्या आज्ञेवरून ते कौरवांना शिक्षा करण्याच्या उद्योगाला लागले ॥ १३ ॥ यादववीर युद्धास सिद्ध झाले आहेत हें पाहून बळरामाला बरें वाटलें नाहीं. ( तो भांडणाचें कारण नष्ट करावें म्हणून झटणारा असल्यामुळें, कौरव व यादव यांच्यांत कलह व्हावा हें त्याला इष्ट नव्हतें. ) त्यानें यादवांना युद्धापासून परावृत्त करून शांत केलें ॥१४॥ आणि सूर्यासारख्या तेजस्वी रथांत बसून तो हस्तिनापुरास निघाला. तो निघाला असतां, चंद्राभोंवतीं जसे इतर ग्रह असावे त्याप्रमाणें पुष्कळ ब्राह्मण व यादव कुळांतील वृद्ध पुरुष त्याच्या भोंवतीं जमून त्याच्या समागमें निघाले ॥ १५ ॥ हस्तिनापुरास पोंचल्यावर बळरामानें नगराबाहेर एका उपवनांत तळ दिला आणि कौरवपक्षाचें म्हणणें काय आहे तें समजून घेण्यासाठीं उद्धवाला धृतराष्ट्राकडे पाठविलें ॥ १६ ॥ उद्धव तेथें गेल्यावर त्यानें धृतराष्ट्राला व तसाच भीष्म, द्रोण, बाल्हिक व दुर्योधन यांना रीतीप्रमाणें नमस्कार केला आणि बळराम आल्याचें वृत्त त्यांना सांगितलें ॥ १७ ॥ आपला अत्यंत प्रिय मित्र बळराम आपल्याकडे आला आहे हें ऐकून कौरवांना मोठें समाधान वाटलें आणि ते सारे हातांत भेटीचे पदार्थ घेऊन त्याला सामोरे गेले आणि त्यांनीं त्याची यथाविधि भेट घेऊन त्याला गाय व अर्घ्य आणि भेटीचे पदार्थ अर्पण केले. त्यांपैकीं जे बळरामाचा पराक्रम जाणत होते त्यांनीं मस्तक लववून त्याला नमस्कार केला ॥ १८–१९ ॥ मग त्यांनीं एकमेकांना कुशल प्रश्न विचारिले आणि आपले बंधु सर्व खुशाल आहेत असें समजल्यावर बळराम मोकळ्या मनानें त्यांशीं बोलूं लागला ॥ २० ॥ तो म्हणाला, ‘ राजाधिराज उग्रसेनमहाराजांनीं तुम्हांला जी आज्ञा केली आहे, ती शांत चित्तानें ऐकून त्याप्रमाणें विलंब न लावतां वर्तन करावें ’ ॥ २१ ॥ ती आज्ञा अशी:—‘तुम्हीं पुष्कळ जणांनीं मिळून धर्मानें वर्तन करणाऱ्या अशा आमच्या पुत्राचा अन्यायानें पाडाव केला आणि त्याला बंदींत घातलें; तथापि बांधवांत सख्य राहावें या हेतूनें आम्ही त्याची तुम्हांला क्षमा करतों ’ ॥ २२ ॥ याप्रमाणें यादवांच्या सामर्थ्याला अनुरूप व वीर्य, शौर्य व सामर्थ्य यांनीं युक्त अशी ती उग्रसेनाची आज्ञा बळराम सांगूं लागला असतां, तें बलरामाचें भाषण ऐकून कौरवांना राग आला, व ते म्हणाले, अहो, ‘ केवढें मोठें हें आश्चर्य ! कालगति मोठी विचित्र आहे. तिच्यामुळें पायांतील पादत्राण मुकुट घातलेल्या डोक्यावरच बसूं लागलें ! ॥ २३–२४ ॥ हे यादव आम्हींच दिलेल्या राज्यामुळें आमच्या बरोबरीचे झाले व कुंतीच्या विवाहामुळें त्यांचा आमचा संबंध जडून निजणें, बसणें, जेवणें इत्यादि व्यवहारहि त्यांचे व आमचे एकत्र होऊं लागले ॥ २५ ॥ चवऱ्या, पंखे, शंख, श्वेतवर्णाचें छत्र, किरीट, सिंहासन, राजशय्या इत्यादि राजभोगाचा ते आज जो उपभोग घेत आहेत, तो केवळ आम्ही तिकडे लक्ष देत नाहीं म्हणूनच ! ॥ २६ ॥ सर्पांना दूध पाजून पाजणारानें त्याचा उलट परिणाम करून घ्यावा, त्याप्रमाणें यादवांना आम्हीं राजचिन्हें देऊन हा उलट परिणाम करून घेतला ! वास्तव त्यांना आजपर्यंत राजचिन्हें दिलीं तेवढीं पुरे झालीं. कारण आमच्याच कृपेनें उत्कर्षास चढून ते यादव आतां

निर्लज्जपणें आम्हांलाच आज्ञा करूं लागले आहेत ! ॥ २७ ॥ पण भीष्म, द्रोण, अर्जुन इत्यादि कौरवपक्षीयांनीं आपण होऊन दिल्याशिवाय त्यांच्या ताब्यांतील वस्तु प्रत्यक्ष इंद्राला तरी बळजोरीनें घेतां येईल काय ? सिंहाच्या ताब्यांतील पदार्थ मेंढा कसा घेऊं शकेल ? ॥ २८ ॥

शुकाचार्य म्हणतात, हे परीक्षित् राजा, कौरवांना आपलें उच्च कुळ, सामर्थ्यवान् बांधव व अपार ऐश्वर्य यांच्यामुळें गर्वाचा पूर आला होता. ते असभ्य कौरव बळरामाला असलीं दुर्भाषणें बोलून नगरांत परत गेले ॥ २९ ॥ कौरवांचा हा दांडगेपणा पाहून आणि त्यांचीं असभ्यपणाचीं भाषणें ऐकून बळराम रागानें क्षुब्ध झाला. तो इतका कीं त्या वेळीं त्याच्याकडे पाहणेंहि कठीण होतें. नंतर वारंवार हंसत तो बोलूं लागला ॥ ३० ॥ तो म्हणाला, 'खरोखर जे आडदांड लोक आहेत ते नाना प्रकारच्या अभिमानानें पछाडलेले असल्यामुळें त्यांना शांति नको असते. पशूंशीं वागतांना जसा दांडक्याचा उपयोग करावा लागतो, तसा त्यांना शांत करावयास दंडच पाहिजे ॥ ३१ ॥ अहो, कौरवांचा अपराध पाहून यादव अगदीं संतापून गेले होते व कृष्णालाहि राग आला होता; पण हळूहळू त्यांना शांत करून मी या कौरवांचें कल्याण करावें या बुद्धीनें येथें आलों ॥ ३२ ॥ पण या दुष्ट मूर्खांना तर कलहाचीच आवड दिसते ! माझी अवज्ञा करून मलाच ते मोठ्या अभिमानानें दुरुत्तरें बोलूं लागले ! ॥ ३३ ॥ अरे, उग्रसेनमहाराज हे भोज, वृष्णि व अंधक या लोकांचे अधिपति असून त्यांची आज्ञा इंद्रादि लोकपालहि शिरसामान्य करितात; असे उग्रसेन आज्ञा करावयास अयोग्य काय ? ॥ ३४ ॥ तसेंच ज्यानें सुधर्मा नामक देवसभाही आधीन करून घेतली, जो पारिजातकासारखा कल्पवृक्ष स्वर्गांतून खालीं आणून आज त्याचा उपभोग घेत आहे आणि सर्वांची स्वामिनी अशी प्रत्यक्ष लक्ष्मी त्याच्या पायांची सेवा करिते तो लक्ष्मीपति श्रीकृष्ण गर्दा राजचिन्हें धारण करावयास आणि सिंहासनावर बसण्यास योग्य नाहीं काय ? ॥ ३५ ॥ ३६ ॥ अरे, साधुलोक तीर्थस्थानाची सेवा करितात, पण त्यांनाहि पवित्र करणारी अशी ज्याची पायधूळ, सारे लोकपाल आणि त्याच्या अंशाचे अंश ब्रह्मदेव, शंकर, मी स्वत: व लक्ष्मी अशीं आम्हीं आपल्या सुंदर किरीटयुक्त मस्तकांवर नित्य धारण करितों, त्या श्रीकृष्णाला राजसिंहासन म्हणजे क:पदार्थ आहे ! ॥ ३७ ॥ आम्ही यादव खरोखर कौरवांनीं दिलेल्या भूमीच्या तुकड्यावरच जगलों आहोंत ! खरोखर आम्ही पादत्राणें आणि ते कौरव मात्र मस्तक होत ! ॥ ३८ ॥ अहो, मद्य पिऊन मत्त झाल्याप्रमाणें हे अभिमानी कौरव ऐश्वर्यानें धुंद होऊन वाटेल तसे असंबद्ध प्रलाप काढूं लागले तर कोणता समर्थ पुरुष ते सहन करील ? ॥ ३९ ॥ यास्तव मी आज ही पृथ्वी निष्कौरव करून सोडतों ! " असें बोलून रागानें क्षुब्ध झालेल्या त्या बळरामानें आपला नांगर उचलला. त्या वेळीं तो बलराम

सारें त्रैलोक्यच जणूं आतां जाळतो कीं काय असें वाटूं लागलें ॥ ४० ॥ त्यानें तें हस्तिनापुर नांगराच्या फाळानें उपटून काढलें आणि रागाच्या आवेशांत त्याच्यावर प्रहार करीत तें गंगेंत ओढून नेलें ॥ ४१ ॥ तेव्हां आपलें नगर बळराम ओढून नेत आहे आणि गरगर फिरणाऱ्या नावेप्रमाणें तें गंगेंत पडत आहे असें पाहून कौरव घाबरून गेले ॥ ४२ ॥ लगेच ते आपली कन्या लक्ष्मणा आणि कृष्णपुत्र सांब यांना पुढें करून, सर्व कुटुंबांतील मंडळीचे प्राण वांचवावे म्हणून त्या प्रभु बलरामाला शरण गेले आणि त्याच्या पुढें हात जोडून उभे राहिले ॥ ४३ ॥ ते त्याला म्हणाले, " हे बलरामा, तूंच सर्वांचा आधार आहेस. आम्हांला तुझ्या सामर्थ्याची जाणीवच नाहीं. आम्ही क्षुद्र बुद्धीचे असून मूर्ख आहों; आम्हांकडून घडलेल्या अपराधांची कृपा करून क्षमा कर ॥ ४४ ॥ या जगाची उत्पत्ति, रक्षण व लय या सर्वांना तूंच कारणीभूत असून तुला दुसरा कसलाहि आधार लागत नाहीं. हे समर्था, हा सारा तुझा खेळ चालला असून हे लोक म्हणजे तुझीं केवळ खरोखर खेळणीं होत असें ज्ञाते म्हणतात ॥ ४५ ॥ हे सहस्र मस्तकें धारण करणाऱ्या शेषस्वरूपी भगवंता, ही सारी पृथ्वी तूंच आपल्या एका मस्तकावर सहज रीतीनें धारण केली असून शेवटीं तूंच साऱ्या विश्वाला आपल्या स्वरूपांत लीन करितोस. त्या वेळीं तुझ्याशिवाय दुसरें कांहींहि उरत नाहीं व तेव्हां तूं एकटाच झोंपी जातोस ॥ ४६॥ तुझा जो राग होतो, तोहि लोकांना वळण लावण्यासाठींच होय. त्यांत द्वेषाचा किंवा मत्सराचा कांहीं संबंध नसतो. हे भगवन्, विश्वाची उत्पत्ति व रक्षण हीं करण्यासाठीं, तूं सत्त्वगुणाचा अवलंब करितोस ॥ ४७ ॥ हे सर्व प्राणिमात्रांच्या नियंत्या, हे सर्व शक्तिमान् निर्विकार परमेश्वरा, हे विश्वाच्या उत्पत्तिकर्त्या, तुला नमस्कार असो. तुला आम्ही शरण आलों आहों " ॥४८॥

शुकाचार्य म्हणतात, हे परीक्षित् राजा, याप्रमाणें ते कौरव उद्विग्न होऊन कांपत कांपत बळरामाला शरण गेले व त्याची करुणा भाकूं लागले. तेव्हां बळराम त्यांच्यावर प्रसन्न झाला आणि त्यांना अभय देऊन ' भिऊं नका, भिऊं नका !' असें म्हणाला ॥४९॥ मग दुर्योधनानें साठ वर्षें वयाचे बाराशें हत्ती, एक लक्ष वीस हजार घोडे, सूर्यासारखे तेजस्वी असे सहा हजार सोन्याचे रथ आणि सुवर्णालंकार गळ्यांत घातलेल्या हजार दासी इत्यादि वस्तु आपल्या मुलीविषयींच्या प्रेमाची खूण म्हणून तिला आंदण दिल्या ॥ ५० ॥ ॥ ५१ ॥ यादवश्रेष्ठ बळरामानें त्या सर्व वस्तूंचा स्वीकार केला आणि आपला पुतण्या सांब व त्याची पत्नी लक्ष्मणा यांना समागमें घेऊन तो द्वारकेस जावयास निघाला. तेव्हां त्याच्या मित्रांनीं त्याचें अभिनंदन केलें ॥ ५२ ॥ बळराम द्वारकेस आल्यावर आपल्यावर

मन:पूर्वक प्रेम करणाऱ्या बांधवांना भेटला आणि कुरुदेशांत त्यानें जें कांहीं कार्य केलें होतें तें सर्व राजसभेमध्यें थोर यादव मंडळी बसली असतां त्यांना त्यानें निवेदन केलें ॥ ५३ ॥ शुकाचार्य म्हणतात, राजा, अजूनहि हस्तिनापुराजवळ बळरामाच्या त्या पराक्रमाची खूण राहिलेली असून दक्षिणेच्या बाजूला गंगेच्या कांठावर तें नगर जरा वर उचलल्यासारखें दिसत आहे ॥ ५४ ॥

**अडसष्ठावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय ६९ वा

शुकाचार्य म्हणतात,—हे परीक्षित् राजा, श्रीकृष्णानें नरकासुराचा वध करून त्याच्या बंदींत असलेल्या अनेक कुमारिकांशीं एकट्यानें विवाह केला असें जेव्हां नारदानें ऐकिलें, तेव्हां तो प्रकार स्वत: पाहावा अशी त्याला इच्छा झाली ॥ १ ॥ तो मनांत म्हणाला, 'श्रीकृष्णाचें एकच शरीर असतां त्यानें एकाच वेळीं सोळा हजार स्त्रियांशीं वेगवेगळ्या मंदिरांत एकट्यानें विवाह केला हें खरोखर मोठें आश्चर्य होय !' ॥ २ ॥ तें आश्चर्य पाहण्याची त्याला उत्कंठा लागली व लगेच तो द्वारकेस आला. त्या द्वारकानगरांत फुललेल्या झाडांनीं भरलेल्या क्रीडोद्यानांत पक्ष्यांचें गायन व भुंग्यांचा गुंजारव चालला होता व त्यायोगें ती सारी नगरी नादमय झाली होती ॥ ३ ॥ तसेंच तींतील सरोवरांत निळीं, पांढरीं, तांबडीं इत्यादि विविध कमळें फुललेलीं असून त्यांनीं तीं सरोवरें अगदीं व्याप्त होतीं व त्यांत हंस, सारस इत्यादि पक्षी मोठ्यामोठ्यानें गायन करीत होते ॥ ४ ॥ तिच्यामध्यें पांढऱ्या स्फटिकांचे नऊ लक्ष वाडे असून त्यांवर मूल्यवान् पाचूचे मणि व सोनें आणि रत्नें यांचे ठिकठिकाणीं जडाव केले होते ॥ ५ ॥ तीमधील लहानमोठे सर्व रस्ते, चव्हाटे व पेठा अगदीं आंखीव असून नानाविध गृहें व देवालयें यांच्यामुळें तिला फार सौंदर्य आलें होतें. ते सर्व रस्ते, घरापुढील अंगणीं, त्यांवरील वाटा व दरवाज्यांपुढील भूमी हीं उत्तम प्रकारें सडासंमार्जन घालून स्वच्छ केलेलीं होतीं आणि जिकडेतिकडे पताका व ध्वज हे फडकत असल्यामुळें त्या नगरींतून फिरणाऱ्यांचें उन्हापासून सहजच रक्षण होत होतें ॥ ६ ॥ त्या द्वारकानगरींत सर्व लोकांना पूज्य असें श्रीकृष्णाचें सुंदर अंतःपुर बांधिलेलें असून तें बांधण्याच्या कामीं त्वष्ट्यानें आपलें परिपूर्ण कौशल्य प्रकट केलेलें होतें ॥ ७ ॥ त्या अंत:पुरांत श्रीकृष्णाच्या सोळा हजार स्त्रियांचीं सोळा हजार मंदिरें शोभा देत होतीं. नारद तेथें गेल्यावर त्यांतील एका मोठ्या मंदिरांत शिरला ॥ ८ ॥ त्या मंदिराला पोवळ्याचे खांब असून त्याचे कडीपाट वैडूर्य रत्नांच्या सुंदर फळ्यांचे केले होते. त्याच्या भिंती इंद्रनील मण्याच्या असून आंतील भूमीला इंद्रनीलाचीच फरशी केलेली होती व त्यामुळें तिचें तेज कधींच नष्ट होत नव्हतें ॥ ९ ॥ त्या मंदिराला त्वष्ट्यानें जीं छतें लाविलीं होतीं, त्यांना मोत्यांच्या घोसांच्या झालरी लाविल्या होत्या व त्या मंदिरांत उत्तम रत्नांनीं जडविलेलेलीं हस्तिदंताचीं आसनें व पलंग सर्वत्र ठेवलेले होते ॥ १० ॥ गळ्यांत पुतळ्यांच्या माळा घातलेल्या व सुंदर वस्त्रें परिधान केलेल्या दासी, तसेंच चिलखत, शिरस्त्राण, सुंदर वस्त्रें व रत्नजडित कुंडलें धारण केलेले सेवक, त्या मंदिरांत सर्वत्र उभे असल्यानें त्याला विशेष शोभा आली होती ॥ ११ ॥ हे परीक्षित् राजा, रत्नांच्या दिव्यांच्या रांगा त्यांत लाविलेल्या असून त्यांच्या प्रकाशानें त्यांतील अंधकार नाहींसा झाला होता. त्याच्या वळचणींवर चित्रविचित्र घरें करून त्यांत मोर ठेविले होते व मंदिरांत पेटविलेल्या

चंदनाचा धूर खिडक्यांतून बाहेर येऊं लागला म्हणजे, तो जणूं मेघच आहे असें वाटून ते मोर मोठ्यानें केकारव करीत होते ॥ १२ ॥ त्या मंदिरांत नारदमुनीनें प्रवेश केला, त्या वेळीं पट्टराणी रुक्मिणी सोन्याचा दांडा असलेल्या चवरीनें श्रीकृष्णाला सारखा वारा घालीत असून श्रीकृष्ण तिच्या सन्निध बसला आहे असें त्याच्या दृष्टीस पडलें. त्या रुक्मिणीबरोबर तिच्याच वयाच्या व तिच्याच सारखें रूप, गुण व सुंदर वस्त्र असलेल्या हजार दासी तिच्या सेवेंत तत्पर असलेल्याहि त्यानें पाहिल्या ॥ १३ ॥ नारद आलेला दृष्टीस पडतांच धर्मांप्रमाणें वर्तन करणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ असा तो भगवान् श्रीकृष्ण रुक्मिणीच्या पलंगावरून तत्काळ उठला आणि मुकुट घातलेलें आपलें मस्तक लववून त्यानें नारदास नमस्कार केला आणि हात जोडून त्याला आपल्या आसनावर आणून बसविलें ॥ १४ ॥ नंतर जगद्गुरूंत श्रेष्ठ व साधूंचा अधिपति अशा त्या श्रीकृष्णानें नारदाचे पाय धुतले आणि तें पाणी मस्तकीं धारण केलें. वस्तुत: श्रीकृष्णाचें पाय धुण्याचें पाणी सर्वांना पवित्र करणारें तीर्थ होय; परंतु ब्राह्मणांचें कल्याण करणारा देव हें जें त्याचें ब्रीद त्याला अनुरूप असा त्यानें नारदाचा सत्कार केला ॥ १५ ॥ याप्रमाणें नरसखा ( अर्जुनाचा मित्र ) अशा त्या पुराणपुरुष महर्षिरूपी श्रीकृष्णानें देवऋषींमध्यें श्रेष्ठ अशा त्या नारदाचें शास्त्रांत सांगितलेल्या विधीप्रमाणें पूजन केलें आणि अमृतासारख्या मधुर अशा थोडक्या शब्दांनीं त्याला कुशल प्रश्न करून ' हे समर्थ मुने, आपलें जें कोणतें कार्य आम्हांला करतां येण्यासारखें असेल तें सांगावें ' अशी विनंति केली ॥ १६ ॥

श्रीकृष्णाचा प्रश्न ऐकून नारद म्हणाला, ' हे प्रभो, तूं सर्वांचा आश्रयदाता असल्यामुळें सर्व लोकांशीं स्नेह ठेवणें व दुष्टांना शिक्षा करणें या तुझ्याकडून होण्याऱ्या गोष्टी कांहीं आश्चर्याच्या नव्हत. जगाची उत्पत्ति व रक्षण हीं करून लोकांचें कल्याण करावें म्हणूनच, हे परमेश्वरा, तूं स्वेच्छेनें अवतार घेत असतोस हें आम्हांला चांगलें ठाऊक आहे ॥ १७ ॥ हे श्रीकृष्णा, तुझीं पावलें सर्व लोकांना मोक्ष देणारीं असून अगाध ज्ञानी असे जे ब्रह्मादिक देव तेहि आपल्या हृदयांत त्यांचें ध्यान करितात. संसाररूप विहिरींत पडलेल्या प्राण्यांना वर येण्यासाठीं आधार म्हटला तर त्यांचाच असून त्यांचें ध्यान करीत मी फिरत असतां. यास्तव कृपा करून त्यांचें स्मरण मला नित्य राहील असें कर ! ' ॥ १८ ॥ हे राजा, याप्रमाणें रुक्मिणीच्या मंदिरांत श्रीकृष्णाला सांगितल्यावर तो नारद, महायोगेश्वर जो श्रीकृष्ण त्याची योगमाया कशी असते तें पाहण्याची इच्छा धरून दुसऱ्या एका स्त्रीच्या मंदिरांत गेला ॥ १९ ॥ त्या मंदिरांत श्रीकृष्ण आपल्या प्रिय पत्नीशीं व उद्धवाशीं पण लावून फांसे खेळत असलेला नारदाला दिसला. तेथेंहि श्रीकृष्णादि मंडळींनीं त्याला सामोरें जाऊन आसन दिलें आणि त्याचा मोठ्या भक्तिपूर्वक सत्कार केला ॥ २० ॥ मग पूर्वीचा वृत्तान्त जणूं ठाऊकच नाहीं असें दाखवून तेथील श्रीकृष्ण नारदाला म्हणाला, ' मुने, आपलें आगमन केव्हां झालें ? आपण पूर्णपणें निरिच्छ असून आम्हीं महत्त्वाकांक्षी आहों; तुमच्यासारख्यांचें आमच्या हातून काय कार्य होणार ?

॥ २१ ॥ तथापि हे मुने, कांहीं कार्य असल्यास सांगावें आणि या माझ्या जन्माचें साफल्य करावें.' कृष्णाचें हें भाषण ऐकून नारदाला विस्मय वाटला आणि कांहीं उत्तर न देतां तेथून तो दुसऱ्या एका मंदिरांत गेला ॥ २२ ॥ तेथेंहि श्रीकृष्ण आहेच असें त्यानें पाहिलें. या मंदिरांत तो आपल्या लहान पुत्रांना खेळवीत होता. तेथून पुढच्या मंदिरांत गेला तों तेथेंहि कृष्ण असून स्नानाच्या गडबडींत आहे असें पाहिलें ॥ २३ ॥ (अशा रीतीनें तो एकामागून एक अशा सर्व मंदिरांत गेला पण प्रत्येक ठिकाणीं श्रीकृष्ण असून कोणत्या तरी कृत्यांत तो गुंतला आहे असें नारदाला आढळलें. ) कोठें तो यज्ञाग्नीला आहुति देत होता, तर कोठें पंचमहायज्ञ करीत होता. कोठें तो ब्राह्मणांना भोजन घालीत होता, तर कोठें ब्राह्मणांचें भोजन उरकलें असून मागाहून श्रीकृष्ण जेवावयास बसला होता ॥ २४ ॥ कोठें त्याची संध्योपासना चालली होती, तर कोठें तो मौन व्रतानें गायत्रीजप करीत होता. एका मंदिरांत तर तो ढाल-तरवार घेऊन निरनिराळ्या हातांचा अभ्यास करीत होता ॥ २५ ॥ कोठें श्रीकृष्ण घोड्यावरून तर कोठे हत्तींवरून व कोठें रथांतून हिंडत असलेला नारदाच्या दृष्टीस पडला. कोठें तो पलंगावर निजलेला आढळला, तर कोठें त्याला उठविण्यासाठीं भाट त्याच्या स्तुतिपर गाणीं गात असलेले दिसले ॥ २६ ॥ एका मंदिरामध्यें उद्धव आदिकरून मंत्र्यांशीं तो गुप्त विचार करीत होता, तर दुसऱ्या एका मंदिरांत प्रमुख वारांगनांच्या घोळक्यांत तो जलक्रीडा करण्यांत दंग झाला होता ! ॥ २७ ॥ एका मंदिरांत तो उत्तम सजविलेल्या गाई थोर ब्राह्मणांना दान देत होता, तर दुसऱ्या मंदिरांत तो कल्याणकारक अशा इतिहासपुराणांतील कथा ऐकत होता ॥२८॥ एका पत्नीच्या मंदिरांत तो त्या प्रियेसह मौजेच्या गोष्टी सांगत हंसत होता, तर दुसऱ्या कांहींच्या मंदिरांत तो धर्म, अर्थ व काम या पुरुषार्थांचें सेवन करीत होता ॥ २९ ॥ एका ठिकाणीं तो एकान्तीं बसून प्रकृतीच्या पलीकडे असलेल्या परमात्म्याचें ध्यान करीत होता, तर दुसऱ्या ठिकाणीं आपल्या गुरूंना इष्ट त्या वस्तु अर्पण करून त्यांची भक्तीनें शुश्रूषा करीत होता ॥ ३० ॥ तिसऱ्या एका मंदिरांत श्रीकृष्ण कांहीं लोकांशीं कलह करीत होता, तर आणखी एका ठिकाणीं सज्जनांचें हित कसें होईल याचा बळरामासह विचार करीत बसला होता ॥३१॥ कांहीं मंदिरांत तो आपल्या पुत्रांचे व कन्यांचे विधिपूर्वक विवाहसंस्कार करून त्यांची योग्य अशा उत्तम स्त्रियांशीं व पतींशीं गांठ घालून देत होता ॥ ३२ ॥ त्या मुलांमुलींना सासरीं पाठविणें व तेथून परत माहेरीं आणणें; तसेंच त्या प्रसंगीं उचित ते उत्सव करणें इत्यादि गोष्टी योगेश्वर श्रीकृष्ण पद्धतशीर करीत असलेला पाहून लोकांना मोठा विस्मय वाटत होता ॥ ३३ ॥ असो. नारद एका मंदिरांतून दुसऱ्या मंदिरांत अशा प्रकारें फिरत असतां कोठें श्रीकृष्ण मोठमोठ्या यज्ञांनीं सर्व देवांची पूजा करीत आहे, तर कोठें धर्म म्हणून विहिरी, उपवनें, आश्रम इत्यादि बांधून ठेवण्याची व्यवस्था करीत आहे असें त्याला आढळलें ॥ ३४ ॥ एका मंदिरांत तो सिंधी घोड्यावर बसून मृगयेला निघत होता, तर दुसऱ्या एका मंदिरांत थोर यादवांचा घोळका भोंवतीं घेऊन तो यज्ञाला योग्य असे पशु मारीत होता ॥ ३५ ॥ कित्येक ठिकाणीं योगेश्वर श्रीकृष्ण लोकांचीं अंतःपुरें, घरें

इत्यादि ठिकाणीं काय चाललें आहे हें पाहण्यासाठीं गुप्त वेष घेऊन फिरत आहे असेंहि नारदाला आढळलें ॥ ३६ ॥ याप्रमाणें मनुष्यरूप घेतलेल्या श्रीहरीच्या योगमायेचा खेळ पाहिल्यावर नारदमुनि हंसत हंसत त्याला म्हणाला ॥ ३७ ॥ ' हे श्रीकृष्णा, योगेश्वर पुरुषांनाहि तुझ्या योगमायेचे हे खेळ दिसण्यासारखे नाहींत; पण तुझ्या चरणसेवेच्या प्रतापानें प्राप्त झालेल्या आत्मस्वरूपज्ञानाच्या योगें करून तुझे हे योगमायेचे खेळ आम्हांला कळतात ॥ ३८ ॥ हे परमात्म्या, आतां मला जावयास आज्ञा दे, तुझ्या कीर्तीनें भरून गेलेल्या या तीन्ही लोकांत जगाला पवित्र करणाऱ्या तुझ्या या लीला गात गात मी फिरत राहीन ॥ ३९ ॥

नारदाचें हें भाषण ऐकून भगवान् श्रीकृष्ण म्हणाला, ' हे ब्रह्मवेत्त्या नारदा, धर्म उत्पन्न करणारा, त्याला अनुमति देणारा, त्याचा प्रसार करणारा व त्याचें पालन करणारा असा सर्व मीच आहें आणि त्या धर्माचें शिक्षण लोकांना द्यावें या हेतूनेंच या भूलोकीं मीं अवतार घेतला आहे, तरी हे वत्सा, तूं मनांत कांहीं खेद करूं नको ! ' ॥ ४० ॥

शुकाचार्य सांगतात, हे परीक्षित् राजा, याप्रमाणें गृहस्थाश्रमी पुरुषांचें पवित्र धर्माचरण करीत असलेल्या त्या एकाच कृष्णाला नारदानें प्रत्येक मंदिरांत खरोखर वेगवेगळें पाहिलें ! ॥ ४१ ॥ आणि त्या अमितपराक्रमी श्रीकृष्णाच्या योगमायेचा तो अपूर्व प्रभाव वारंवार पाहून नारदमुनि आश्चर्यानें थक्क झाला आणि त्याच्या मनांत परमेश्वरलीलेचें मोठें कौतुक उत्पन्न झालें. नंतर धर्म, अर्थ आणि काम या पुरुषार्थांवर श्रद्धा ठेवून वागणाऱ्या श्रीकृष्णानें त्याची उत्तम संभावना केली असतां संतुष्ट झालेला तो नारद कृष्णाचे गुणानुवाद गात गात आपल्या मार्गाला लागला ॥ ४२ ॥ ४३ ॥ हे राजा, याप्रमाणें मनुष्याच्या आचरणाचें अनुकरण करीत, सर्व सृष्टीच्या कल्याणासाठीं प्रकृतीचा अवलंब केलेल्या श्रीकृष्णानें सोळा हजार सुंदर स्त्रियांच्या सलज्ज प्रेमाचा व हास्ययुक्त कटाक्षांचा अनुभव घेत गृहसौख्याचा उपभोग घेतला ॥ ४४ ॥ श्रीकृष्ण हा विश्वाची उत्पत्ति, रक्षण व संहार यांना कारणीभूत असून त्यानें जीं कृत्यें या भूतलावर केलीं, तीं दुसऱ्या कोणाला करतां येण्यासारखीं नव्हतीं. हे परीक्षित् राजा, जो कोणी कृष्णलीलांचें गायन करील, त्या ऐकेल किंवा दुसऱ्याला सांगेल त्याच्या मनांत त्या मोक्षदात्या भगवंताविषयीं भक्ति उत्पन्न झाल्यावांचून राहणारच नाहीं ॥ ४५ ॥

**एकुणसत्तरावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय ७० वा

दुसऱ्या दिवशीं पहाट होऊन कोंबडे आरवूं लागले, तेव्हां श्रीकृष्णाला आलिंगून झोंपीं गेलेल्या त्याच्या स्त्रियांना, आतां आपणांस श्रीकृष्णाचा विरह होणार असें मनांत येऊन वाईट वाटलें व त्या कोंबड्यांना शाप देऊं लागल्या ॥ १ ॥ मन्दारवृक्षाच्या राईवरून वाहणारा वायु अंगावरून वाहूं लागल्यामुळें भुंग्यांचा गुंजारव सुरू झाला आणि जागे झालेले पक्षी किलबिल शब्द करून जणूं भाटांसारखे श्रीकृष्णाला जागें करूं लागले. ॥ २ ॥ त्या वेळचा तो अत्यंत पवित्र असा ब्राह्ममुहूर्त खरा; परंतु आपल्या प्रिय पतीच्या मिठींत असलेल्या रुक्मिणीला, आतां ती मिठी सुटेल या भीतीमुळें तो पवित्र मुहूर्तहि आनंदाचा वाटला नाहीं ॥ ३ ॥ तथापि श्रीकृष्ण त्या ब्राह्म मुहूर्तावर शयनावरून उठला आणि उदकानें हात पाय धुऊन शांतचित्तानें तमोगुणाच्या पलीकडे असलेल्या आत्म-स्वरूपाचें ध्यान करूं लागला ॥ ४ ॥ तें आत्मस्वरूप एकच एक, स्वयंप्रकाश, निर्विकार व नित्य आपल्या रूपांत मग्न असल्यामुळें कोणत्याहि उपाधीपासून अलिप्त असून त्याला परब्रह्म असें म्हणतात. या जगाची उत्पत्ति, स्थिति व लय यांना कारणीभूत अशा ज्या त्याच्या शक्ति त्या शक्तींवरूनच त्याच्या आनंदमय अस्तित्वाचें ज्ञान होऊं शकतें ॥ ५ ॥ असो. ब्रह्मध्यानानंतर श्रीकृष्णानें निर्मळ पाण्यांत बुडी मारून शास्त्रनियमांनुसार स्नान केलें आणि वस्त्रें नेसून स्नानोत्तर करावयाचे संध्यावंदनादि सर्व विधि केल्यावर त्या पुरुषश्रेष्ठानें अग्नीला आहुति दिली आणि मौन व्रतानें गायत्री मंत्राचा जप केला ॥ ६ ॥ नंतर उगवत्या सूर्याला अर्घ्य समर्पण करून त्यानें आपलेच अंश असे जे देव, ऋषि व पितर त्यांचें तर्पण केलें आणि इंद्रियदमनपूर्वक वृद्ध ब्राह्मणांचें पूजन केलें. नंतर ज्यांच्या शिंगांना सोन्याचीं टोपणें असून, गळ्यांत मोत्यांच्या माळा घातलेल्या आहेत, ज्या स्वभावानें शांत असून पुष्कळ दूध देणाऱ्या आहेत व ज्या नुकत्याच व्यालेल्या आहेत, अशा सवत्स गाई वस्त्रालंकारांनीं मंडित करून दान दिल्या ॥ ७ ॥ ८ ॥ त्या गाईंच्या खुरांचीं टोकें रुप्यानें मढविलेलीं होतीं. त्या गाईंबरोबरच वस्त्रें, हरिणाजिनें व तीळ यांचेंहि दान श्रीकृष्णानें केलें. अशा प्रकारें एक एक बद्ध ( १३०८४ ) गाई तो प्रतिदिवशीं अलंकारांनीं भूषित करून ब्राह्मणांना दान देई ॥ ९ ॥ गोप्रदानाचा हा विधि झाल्यावर गाई, ब्राह्मण, देवता, वृद्ध मंडळी, गुरु व सर्व महाभूतें यांना श्रीकृष्णानें नमस्कार केला आणि आपले अंश असे जे कपिलागाय आदिकरून मंगल पदार्थ त्यांना स्पर्श केला ॥ १० ॥ श्रीकृष्ण हा मनुष्य-लोकाला भूषणभूत होता, तथापि पीतांबरादि वस्त्रें, कौस्तुभमणि आदिकरून भूषणें, उत्तम प्रकारच्या माळा व उट्या यांनीं त्यानें स्वतःला भूषविलें ॥ ११ ॥ नंतर त्यानें तुपांत व आरशांत आपलें प्रतिबिंब पाहून गाई, बैल, ब्राह्मण व देव यांचें दर्शन घेतलें आणि नगरींतील व आपल्या अंतःपुरांतील सर्व वर्णांच्या लोकांना व प्रजांना, त्यांना इष्ट असलेल्या

वस्तु देऊन संतुष्ट केलें ॥ १२ ॥ एवढें झाल्यावर त्यानें पहिल्यानें ब्राह्मणांना माळा, विडे व उश्या अर्पण केल्या व नंतर मित्र, मंत्री व स्त्रिया यांना ते पदार्थ देऊन शेवटीं आपण स्वतःच्या उपयोगासाठीं ते घेतले ॥ १३ ॥ हें सर्व होत आहे तों सारथ्यानें त्याच्या उत्तमोत्तम रथाला सुग्रीव आदिकरून घोडे जुंपून तो जवळ आणून उभा केला व स्वतः आपण श्रीकृष्णापुढें हात जोडून उभा राहिला ॥ १४ ॥ मग सारथ्याचे हात धरून सूर्य जसा उदयाचलावर चढतो, तसा श्रीकृष्ण त्या रथावर चढला. सात्यकि, उद्धव इत्यादि यादवांनाहि त्यानें बरोबर घेतलें ॥ १५ ॥ तो निघाला त्या वेळीं अन्तःपुरांतील स्त्रियांनीं त्याच्याकडे लाजत लाजत प्रेमानें पाहिलें व मोठ्या कष्टानें त्याला त्यांनीं अनुज्ञा दिली. अनुज्ञा मिळाल्यावर श्रीकृष्ण हंसत हंसत व त्यांचीं अंतःकरणें हरण करीत वाड्याच्या बाहेर पडला ॥ १६ ॥ थोड्या वेळानें समागमें असलेल्या यादवांसह तो आपल्या सुधर्मा-नामक राजसभेंत आला. या राजसभेंत बसणाऱ्या सभासदांना तहान, भूक इत्यादि विकारांची बाधा कधीं होत नाहीं ॥१७॥ राजसभेंत जाऊन श्रीकृष्ण आपल्या उच्चासनावर विराजमान झाला, तेव्हां त्याच्या तेजानें दाही दिशा प्रकाशित झाल्या. त्या वेळीं, आकाशांत तार-कांच्या मध्यभागीं जसा चंद्र शोभतो, तसा यादवांमधील थोर थोर मंडळींनीं परिवेष्टित असलेला तो श्रीकृष्ण त्या सभेंत शोभूं लागला ॥ १८ ॥ शुकाचार्य सांगतात, हे राजा, श्रीकृष्ण स्थानापन्न झाल्यावर विनोदप्रवीण लोक, त्या प्रभूला हास्योत्पादक कथा सांगून रिझवूं लागले आणि नट व नाचणाऱ्या वारांगनादि स्त्रिया आपल्या नृत्यादिकांनीं त्याची सेवा करूं लागल्या ॥ १९ ॥ मृदंग, वीणा, डमरू, मुरली, करताल, शंख इत्यादि वाद्यांच्या सुस्वरांत पुराणिकांचें पुराण, स्तुतिपाठकांचा स्तुतिपाठ, गवयांचें गाणें आणि नर्तकांचें नृत्य सुरू झालें ॥ २० ॥ त्या प्रसंगीं त्या ठिकाणीं बसलेले कांहीं ब्राह्मण वाद्यें वाजवून त्यावर सामगायन करीत होते आणि कित्येक श्रीकृष्णाच्या पवित्रकीर्ति अशा पूर्वज राजांच्या कथांचें वर्णन करीत होते ॥ २१ ॥ हे परीक्षित् राजा, असा हा सभेचा थाट चालला असतां तेथें पूर्वीं कधीं पाहण्यांत न आलेला असा एक पुरुष येऊन ठेपला आणि द्वाररक्षकांनीं त्याच्या येण्याची सूचना श्रीकृष्णाला दिली असतां त्याच्या आज्ञेनुरूप ते त्याला सभेंत घेऊन आले ॥ २२ ॥ आंत आल्यावर त्यानें परमात्मा श्रीकृष्णाला हात जोडून नमस्कार केला आणि जरासंधानें बंदींत टाकल्यामुळें राजांना जें दुःख होत होतें तें त्यानें निवेदन केलें ॥ २३ ॥ तो म्हणाला, ' जरासंधानें पूर्वीं दिग्विजय केला असतां, जे राजे त्याला नम्र होऊन शरण आले नाहींत, अशा वीस हजार राजांस गिरिव्रज नामक किल्ल्यांत बलात्कारानें कोंडून ठेविलें आहे ॥ २४ ॥ त्या राजांची आपणांला अशी विनंती आहे कीं, ' हे कृष्णा, तूं सर्वांचीं अंतःकरणें आपल्याकडे आकर्षण करणारा असून, तुझें स्वरूप जाणतां येणें फार कठीण आहे. तूं शरणागताचें दुःख नष्ट करणारा आहेस. भेदबुद्धीनें बद्ध झालेले असे आम्ही संसाराची भीति वाटत असल्यामुळें तुला शरण आलों आहों ॥ २५ ॥ हे लोक आपापल्या कर्मांत गढून जाऊन तूं सांगितलेल्या अशा तुझ्या पूजनरूप कल्याणकारक कर्माची हेळसांड करतात व अशी त्यांची हेळसांड चालली आहे,

तोंच बलिष्ठ असा काळस्वरूपी तूं त्यांच्या जीविताच्या आशेवर एकाएकीं घाव घालतोस; अशा तुला नमस्कार असो ।। २६ ।। तूं जगाचा स्वामी असून या मृत्युलोकांत आपल्या अंशानें जो अवतरला आहेस, तो सज्जनांचें रक्षण करावे व दुष्टांचें दमन करावें म्हणूनच होय. दुसरा त्यांत हेतु नाहीं. असें असतां, हे परमेश्वरा, कोणी तुझ्या आज्ञेचें उल्लंघन करीत असूनहि सुख पावतात आणि कोणी तुझ्या आज्ञेप्रमाणें वागत असतांहि पूर्व-कर्मानुसार दुःख भोगतात. तरी हें असें कां व्हावें हें आम्हांस समजत नाहीं ।। २७ ।। हे समर्थ श्रीकृष्णा, राज्यसुख हें परावलंबी असून स्वप्नाप्रमाणें क्षणिक आहे. तथापि तशा त्या राज्याचा भार आम्ही नित्य भयग्रस्त अशा मर्त्य शरीरानें धारण करितों आणि निष्काम पुरुषांना ज्या आत्मसुखाची तुजपासून प्राप्ति होते त्या आत्मसुखाला अंतरतों, आणि तुझ्या मायेनें मोहित झाल्यामुळें दीनवाण्यासारखे या लोकीं दुःख भोगीत असतों ।। २८।। यास्तव, हे प्रभो, जरासंधाच्या पाशांतून आम्हांला सोडव! तुझ्या चरणांचा आश्रय केल्यानें शरणागताच्या दुःखाचें निवारण होतें. तो जरासंध दहा सहस्र हत्तींच्या बळानें युक्त असून एखाद्या सिंहानें सहस्रावधि मेंढ्या अडवून धराव्या त्याप्रमाणें त्यानें एकट्यानें आम्हां इतक्या राजांना आपल्या किल्ल्यांत कोंडून ठेविलें आहे ।। २९ ।। हे सुदर्शनचक्रधारका श्रीकृष्णा, तुझा एकंदर अठरा वेळां जरासंधाशीं युद्धप्रसंग घडला, त्यांत तूं सदोदित त्याचा पराजय केलास; फक्त शेवटची एकच वेळ-तूं अपरिमित पराक्रमी असूनहि मनुष्यांचें अनुकरण करीत असल्यामुळें-त्यानें तुझा पराजय केला व त्यामुळें गर्वानें फुगून जाऊन तो, तुझ्या प्रजा असे जे आम्ही त्या आम्हांला दुःख देत आहे. यास्तव, हे अजिंक्य प्रभो, या प्रसंगीं जें करणें योग्य असेल तें तूं कर!' ।। ३० ।।

याप्रमाणें राजांचा निरोप सांगून दूत म्हणाला, 'हे भगवंता, जरासंधानें कोंडून ठेविलेले ते राजे याप्रमाणें तुझ्या दर्शनाची इच्छा करीत असून तुझ्या चरणांचा त्यांनीं आश्रय केला आहे. तरी त्या दीन झालेल्या राजांचें तूं कल्याण करावें!' ।। ३१ ।।

शुकाचार्य सांगतात, हे परीक्षित् राजा, तो राजदूत असें बोलत आहे इतक्यांत अत्यंत दैदीप्यमान्य व पिंगट जटा धारण करणारा असा देवर्षि नारद, सूर्य उगवावा त्याप्रमाणें त्या राजसभेंत उपस्थित झाला ।। ३२ ।। नारदाला पाहतांच सर्वलोकेश्वरेश्वर भगवान् श्रीकृष्ण आसनावरून उठला आणि मोठ्या आनंदानें सर्व सभासद व सेवक यांसह त्यानें त्याला साष्टांग नमस्कार घातला ।। ३३ ।। नंतर त्यानें त्याला बसावयाला आसन दिलें आणि नारद त्यावर स्थानापन्न झाल्यावर त्याची यथाविधि पूजा करून गोड शब्दांनीं त्याचें मन रिझवीत तो त्याला भक्तिपूर्वक विचारूं लागला ।। ३४ ।। तो म्हणाला, 'हे मुने, तिन्ही लोकांची प्रस्तुत सर्वतोपरी खुशाली आहे ना? खरोखर, तुम्ही या तिन्ही लोकांत जे फिरत असतां त्याचा फारच मोठा उपयोग आहे ।। ३५ ।। ईश्वरानें निर्माण केलेल्या या लोकांत तुम्हांला अज्ञात असें खरोखर कांहीं नाहींच, म्हणून तुम्हांला विचारितों कीं, सांप्रत पांडवांच्या मनांत काय करावयाचें आलें आहे?' ।। ३६ ।।

नारदानें उत्तर केलें, ' हे प्रभो श्रीकृष्णा, प्रत्यक्ष प्रजापतींनाहि मोह पाडणाऱ्या अशा तुझ्या मायेच्या विविध लीला मीं पाहिल्या आहेत. हे विश्वव्यापका, सर्व भूतमात्रांमध्यें आपल्या शक्तींसमवेत तूं वास करीत असूनहि अग्नीचें तेज जसें भस्माखालीं झांकून ठेवावें तसें तूं आपलें तेज मायेनें झांकून ठेविलें आहेस. यास्तव तुझा हा प्रश्न मला आश्चर्यकारक वाटत नाहीं * ॥ ३७ ॥ तुझ्या मनांतील गोष्ट नीट समजणें कोणाला बरें शक्य आहे ? हें सारें विश्व तूंच आपल्या मायेनें उत्पन्न करीत असून त्याचा लयहि तूंच करतोस. हें विश्व जें भासतें तें स्वतःच्या योगें भासत नसून त्याच्या अंतर्यामीं असलेला जो तूं परमात्मा त्या तुझ्या अस्तित्वामुळेंच तें भासतें. तुझ्या आत्मस्वरूपाहून निराळें असें हें विश्वरूप शरीर धारण करणाऱ्या तुला नमस्कार असो ॥ ३८ ॥ न जाणतां संसारांत पडलेल्या जीवाची या अनर्थावह देहबंधनापासून सुटका करणारा तूंच आहेस व लीलेनें अवतार घेऊन आपलें यश प्रचंड दीपाप्रमाणें तूं पाजळीत असतोस. अशा त्या तुला मी शरण आहें ॥ ३९ ॥ असें आहे तरी देखील मनुष्यलोकाचें अनुकरण करून तूं ज्या अर्थीं मला प्रश्न केलास, त्या अर्थीं, हे परब्रह्मस्वरूपी श्रीकृष्णा, तुझा आतेभाऊ व भक्त असा जो धर्मराजा त्याच्या मनांत काय विचार आला आहे हें तुला सांगतों, ऐक ॥ ४० ॥ हे भगवन्ता, यज्ञांमध्यें श्रेष्ठ असा जो राजसूय यज्ञ त्याच्या अनुष्ठानानें तुझें पूजन करावें अशी त्या धर्मराजाची इच्छा आहे. त्याला चक्रवर्तिपद मिळवावयाचें आहे व त्यासाठीं तुझी अनुमति त्याला मिळावी ॥ ४१ ॥ तो यज्ञश्रेष्ठ राजसूय चालू झाला असतां देव आदिकरून स्वर्गांत राहणारे आणि या लोकांतील कीर्तिमान् राजे हे तुझ्या दर्शनासाठीं तेथें जमतील ॥४२॥ हे समर्था श्रीकृष्णा, तूं ब्रह्मस्वरूप असून तुझ्या कीर्तिश्रवणानें, स्तुतिगायनानें व स्वरूप-चिंतनानें चांडाळ देखील पवित्र होतात. मग प्रत्यक्ष तुझें दर्शन करणारे व तुझ्याशीं हस्तस्पर्श करणारे पुरुष पवित्र होतील यांत काय नवल ? ॥ ४३ ॥ हे श्रीकृष्णा, तूं सर्व विश्वाला पवित्र करणारा आहेस. तुझें निष्कलंक यश स्वर्गांत, पाताळांत व भूलोकीं सर्वत्र पसरलें असून त्यानें दाही दिशा भरून गेल्या आहेत. तुझें पाय धुण्याचें पाणी स्वर्गांत मन्दाकिनी नांवानें व भूलोकीं गंगा नांवानें वाहत राहून विश्वाला पवित्र करीत आहे ' ॥ ४४ ॥

शुकाचार्य सांगतात, हे परीक्षित् राजा, नारदाचें हें भाषण श्रीकृष्णाच्या पक्षांतील यादवांना स्वीकारावें असें वाटलें नाहीं. कारण जरासंधाचा पराजय करावा अशी त्यांना उत्कंठा लागून राहिली होती व त्यामुळें धर्मराजाच्या राजसूय यज्ञाला साहाय्य करण्याकरतां जाण्याची गोष्ट यादवांना मानवली नाहीं. हें पाहून श्रीकृष्ण हंसत हंसत उद्धवाकडे वळला आणि मृदु शब्दांनीं त्याचें मत विचारूं लागला ॥ ४५ ॥

---

* सर्व ज्ञात असूनहि कृष्ण नारदाला पांडवांचा बेत विचारितो हें आश्चर्य; पण मनुष्याप्रमाणें तो वागत असल्यामुळें तसें करितो म्हणून आश्चर्य नाहीं, असा भाव.

श्रीकृष्ण म्हणाला, ' हे उद्धवा, तूं आमचा मित्र असून गुप्त विचारांचें रहस्य जाणणारा असल्यामुळें तूं आमचा श्रेष्ठ मार्गदर्शक आहेस. तरी आतां जो प्रश्न उत्पन्न झाला आहे, त्या संबंधानें काय करणें योग्य आहे हें तूंच सांग. तुझ्यावर आमचा विश्वास आहे व तूं सांगशील तसेंच आम्ही करूं ' ॥ ४६ ॥ याप्रमाणें स्वामी जो भगवान् श्रीकृष्ण त्याला सर्व ठाऊक असतांहि तो गुप्त गोष्टीविषयीं आपला विचार घेत आहे असें पाहून त्याची आज्ञा उद्धवानें शिरसामान्य केली आणि आपलें मत त्याला कळविलें ॥४७॥

**सत्तरावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय ७१ वा

शुकाचार्य म्हणतात, हे परीक्षित् राजा, नारदाचें भाषण ऐकून व त्या संबंधानें यादवसभासदांचें आणि कृष्णाचें मत समजून घेऊन महाबुद्धिवान् उद्धव उत्तर देऊं लागला ॥ १ ॥

तो म्हणाला, ' हे श्रीकृष्णा, नारदमुनीनें सांगितल्याप्रमाणें तुझा आतेभाऊ जो धर्मराजा त्याच्या मनांतून जर यज्ञ करावयाचा आहे, तर त्याला तूं साहाय्य करावें व शरण आलेल्या त्या राजांचेंहि रक्षण करावें असें मला वाटतें ॥ २ ॥ हे प्रभो, राजसूय यज्ञाचा अधिकार कोणाला प्राप्त होतो, तर जो सर्व दिशांचा दिग्विजय करतो त्याला. यास्तव जरासंधाचा वध केल्यानें आपलीं दोन्ही कार्यें साधतात म्हणून तो करणें मला अवश्य वाटतें ॥ ३ ॥ आमचें तर मोठें कार्य त्यानें होईलच; पण, हे श्रीकृष्णा, जरासंधाच्या अटकेंतून राजांना सोडविल्यानें तुझीहि मोठी कीर्ति होईल ॥ ४ ॥ तो जरासंध राजा दहा सहस्र हत्तींच्या बळानें युक्त असल्यामुळें इतर मोठमोठ्या बरिष्ठांना देखील अजिंक्य आहे; पण भीम त्याच्याशीं समबल असल्यामुळें भीमाला मात्र त्याचा वध साध्य आहे ॥ ५ ॥ त्याचा पराभव करणें तो द्वंदयुद्धांतच केला पाहिजे; कारण त्याच्याजवळ शंभर अक्षौहिणी सैन्य असल्यामुळें त्याच्याशीं उघड युद्ध करणें शक्य नाहीं; पण तो ब्राह्मणांविषयीं आदरशील असल्यामुळें ब्राह्मणांनीं जर त्यापाशीं कांहीं मागितलें तर तें मात्र तो कधीं नाहीं म्हणत नाहीं ॥ ६ ॥ यास्तव भीमसेनानें ब्राह्मणाचें रूप घेऊन त्याच्याकडे जावें व द्वंद्वयुद्धाची याचना करावी. हे श्रीकृष्णा, तूं सन्निध असलास म्हणजे भीमसेन त्याला द्वंद्वयुद्धांत ठार करील यांत शंका नाहीं ॥ ७ ॥ विश्वाची उत्पत्ति करणारा वस्तुत: तूंच असून ब्रह्मदेवाला जसा तूं केवळ निमित्तमात्र करतोस किंवा त्याचा लय करणारा रूपरहित असा काळस्वरूपी तूंच असून शंकराला जसा निमित्ताला पुढें करितोस, त्याप्रमाणें जरासंधाचा वध करणारा तूंच असून भीम उगाच निमित्ताला पुढें व्हावयास पाहिजे ॥ ८ ॥ तुझ्या हातून जरासंधाचा वध होईल आणि त्याच्या बंदींत पडलेल्या आपल्या पतींची सुटका होईल, अशी आशा धरून त्या राजांच्या स्त्रिया तुझी पवित्र कीर्ति गात आहेत. गोकुळांतील गोपी सुद्धां तूं केलेली त्यांच्या सुटकेची कथा अशीच गात असतात. त्याचप्रमाणें गजेन्द्राची नक्रापासून केलेली सुटका, सीतादेवीची रावणाच्या जाचांतून केलेली सुटका व आपल्या स्वत:च्या मातापित्यांची कंसाच्या बंदिगृहांतून केलेली सुटका असे हे तुझे पराक्रम मुनि व आम्ही तुला शरण येऊन नित्य गात असतों ॥ ९ ॥ हे श्रीकृष्णा, जरासंधाचा वध करण्यापासून हा असा फारच मोठा उपयोग आहे आणि शिवाय कृतकर्मांचें फळ देणारा म्हणून यज्ञ हा सामान्यत: तुला इष्टच आहे ' ॥ १० ॥

शुकाचार्य म्हणतात, हे परीक्षित् राजा, याप्रमाणें श्रीकृष्णाला उद्देशून उद्धवानें केलेलें सर्वतोपरि कल्याणकारक असें भाषण ऐकून, नारद, वृद्ध यादव आणि स्वतः कृष्ण यांना फार समाधान वाटलें ॥ ११ ॥ त्याप्रमाणें भगवान् श्रीकृष्णानें लगेच युधिष्ठिराकडे जाण्याचें ठरवून तशी सर्वांना आज्ञा केली आणि गुरूंची आज्ञा घेऊन दारुक, जैत्र इत्यादि सेवकांना त्या प्रभूनें निघण्याची सिद्धता करावयास सांगितलें ॥ १२ ॥ प्रथम त्यानें आपले पुत्र व साहित्य हीं समागमें देऊन अंत:पुरांतील स्त्रियांना पुढें पाठवून दिलें आणि नंतर हे परीक्षित् राजा, त्यानें बळराम व उग्रसेन यांची आज्ञा घेऊन सूतानें जोडून आणिलेल्या आपल्या गरुडचिन्हांकित रथांत आरोहण केलें ॥ १३ ॥ याप्रमाणें रथ, हत्ती, पायदळ व अश्वारूढ योद्धे यांच्या अधिपतींच्या सान्निध्यामुळें उग्र दिसणाऱ्या आपल्या सेनेसह मृदंग, भेरी, आनक, शंख, गोमुख इत्यादि वाद्यांच्या नादानें दाही दिशा दुमदुमत असतां श्रीकृष्णानें इन्द्रप्रस्थाकडे प्रयाण केलें ॥ १४ ॥ त्याच्या पतिव्रता स्त्रिया आपल्या मुलांना समागमें घेऊन मनुष्यांनीं वाहून न्यावयाच्या व तशाच घोड्यांनीं ओढावयाच्या अशा सोन्याच्या पालख्यांत बसून त्याच्या मागून जात होत्या. त्यांनीं उत्तम वस्त्रें परिधान केलीं असून उत्तम अलंकार घातले होते व सुगंधी उट्या अंगाला लावून गळ्यांत माळा घातल्या होत्या आणि त्यांच्या रक्षणासाठीं ढालतरवारींनीं सज्ज असलेले योद्धे त्यांच्याबरोबर चालत होते ॥ १५ ॥ त्यांच्या समागमें अनेक दासी व नटलेल्या वेश्यांचे थवे हेहि चालले होते. त्यांनीं आपल्या गवती घरांचे तट्टे, पांघरण्याचीं कांबळीं इत्यादि साहित्य, माणसें, उंट, रेडे, गाढवें, खेचरें व हत्तिणी यांवर चढविलें होतें ॥ १६ ॥ त्या सैन्यांत उंच पताका, छत्रें व चवऱ्या चमकत असून, उत्तम शस्त्रास्त्रें, उंची अलंकार, किरीट व चिलखतें यांच्या योगानें त्याला फार शोभा आली होती आणि सर्वत्र मोठा ध्वनि निघत होता. क्षुब्ध झालेल्या तिमिंगिलादि जलचरांमुळें लाटा उसळल्या असतां दिवसा सूर्यकिरणांत जशी समुद्राची शोभा दिसावी तशी त्या सैन्याची शोभा दिसत होती ॥ १७ ॥ असो. याप्रमाणें श्रीकृष्णाचें प्रयाण चालू झालें असतां पूर्वींच सत्कार करून निरोप दिलेला नारदमुनि त्याला नमस्कार करून त्याचे गुणानुवाद गात आकाशमार्गानें निघून गेला. श्रीकृष्णदर्शनानें त्याच्या सर्व इंद्रियांना शांति मिळाली होती आणि श्रीकृष्णाचा झालेला निश्चय व त्यानें केलेला सत्कार यायोगें त्याचें मन संतुष्ट झालें होतें ॥ १८ ॥ नारदमुनि निघून गेल्यावर भगवान् श्रीकृष्ण त्या राजदूताकडे वळला आणि त्याला गोड शब्दांनीं आश्वासन देऊन म्हणाला, 'हे दूता, तूं त्या राजांकडे परत जाऊन त्यांना सांग कीं भिऊं नका, तुमच्या मुक्ततेसाठीं व जरासंधाला मारण्यासाठीं मी प्रयत्न करीत आहें' ॥ १९ ॥ याप्रमाणें श्रीकृष्णानें सांगितलें असतां, तो दूत तेथून निघून राजांकडे आला आणि त्यानें घडलेला सर्व वृत्तान्त त्यांना जशाच्या तसा सांगितला. तो ऐकून आपली सुटका लवकरच होईल या इच्छेनें ते श्रीकृष्णाच्या भेटीची उत्कंठेनें वाट पाहात राहिले ॥ २० ॥ असो. श्रीकृष्ण द्वारकेहून जो निघाला तो आनर्त, सौवीर, मरु व कुरु हे देश ओलांडून आणि वाटेंत लागणारे पर्वत व नद्या उतरून, तसेच कित्येक गांव, नगरें, गौळवाडे आणि

खाणीचे प्रदेश हे टाकून पुढें आला ॥ २१ ॥ त्यानंतर लागणाऱ्या दृषद्वती व सरस्वती याहि नद्या त्यानें ओलांडल्या आणि वाटेंत पांचाल देश व मत्स्यदेश हे टाकून तो इंद्रप्रस्थास येऊन पोंचला ॥ २२ ॥ श्रीकृष्णाचें दर्शन सामान्य मनुष्याला होणें कठीण असें असल्यामुळें तो आलेला ऐकतांच राजा युधिष्ठिराला परमानंद झाला आणि आपले उपाध्याय व मित्रमंडळी समागमें घेऊन तो श्रीकृष्णाला सामोरा जाण्यासाठीं नगराबाहेर पडला ॥ २३ ॥ इंद्रियांना जसा प्राणांच्या संचारानें आनंद होतो, त्याप्रमाणें युधिष्ठिराला आनंद झाला. तो मोठ्या आदरानें गाण्यांचा ध्वनि, वाद्यांचा गजर आणि ब्राह्मणांचा वेदघोष यांच्या कडकडाटांत श्रीकृष्णाला सामोरा गेला ॥ २४ ॥ श्रीकृष्णाला पाहतांच धर्मराजाचें हृदय प्रेमानें थबथबून गेलें आणि आपला अत्यंत प्रियसखा फार दिवसांनीं भेटल्यामुळें तो त्याला वारंवार आलिंगन देऊं लागला ॥ २५ ॥ लक्ष्मीचें निष्कलंक वसतिस्थान जें श्रीकृष्णाचें शरीर त्याला त्यानें दोन्ही हातांनीं मिठी मारिली. श्रीकृष्णाच्या भेटीनें आपलें सर्व पाप नष्ट झालें असें त्याला वाटलें आणि जगाच्या सर्व व्यवहाराला विसरून त्याची वृत्ति कृष्णस्वरूपीं तल्लीन होत्साती आनंदमग्न झाली. त्याच्या नेत्रांतून आनंदाश्रु पाघळूं लागले. त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले ॥ २६ ॥ नंतर भीमानेंहि त्या आपल्या मामेभावाला हंसत हंसत आलिंगन देऊन सुखानुभव घेतला आणि प्रेमाच्या वेगामुळें त्याचेंहि शरीर भरून गेलें. तसेंच अर्जुन व नकुळ-सहदेव यांनाहि आपल्या प्रिय मित्राला पाहून आनंद वाटला आणि त्यांनींही आनंदाश्रूंनीं डोळे भरून गेले असतां त्या श्रीकृष्णाला आलिंगन दिलें ॥२७॥ अर्जुनानें त्याला आलिंगन दिल्यावर नकुळ–सहदेवांनीं त्याला नमस्कार केला. नंतर श्रीकृष्णानेंहि ब्राह्मणांना व वृद्ध मंडळीला त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें नमस्कार केला ॥ २८ ॥ याप्रमाणें बहुमान झाला असतां श्रीकृष्णानेंहि कुरु, संजय व कैकय या घराण्यांतील पुरुषांना, त्याचप्रमाणें सूत, मागध, गवई, भाट व हास्यरस उत्पन्न करणारे विनोदी जन यांनाहि बहुमान दिला ॥ २९ ॥ नंतर मृदंग, शंख, पडघम, वीणा, पणव, गोमुख इत्यादि वाद्यांचा घोष चालला असतां, ब्राह्मण त्या कमल-नयन भगवंताची स्तुति करीत गाऊं व नाचूं लागले ॥ ३० ॥ याप्रमाणें पुण्यश्लोक पुरुषांमध्यें श्रेष्ठ अशा त्या श्रीकृष्णाभोंवतीं प्रेमळ मित्रांचा गराडा पडला असतां व त्याच्या स्तुतीचा घोष चालला असतां तो त्या शृंगारलेल्या इंद्रप्रस्थ नगरांत प्रवेश करिता झाला ॥ ३१ ॥ त्या नगरांतील रस्ते हत्तींच्या सुगंधी मदजलानें शिंपलेले असून त्यांत ठिकठिकाणीं चित्रविचित्र पताका व सोनेरी तोरणें उभारून उदकानें भरलेले कुंभ जवळ ठेविलेले होते. सर्व स्त्रीपुरुष अंगाला उट्या लावून आणि नवीं रेशमी वस्त्रें, अलंकार व सुगंधी फुलांच्या माळा यांनीं आपलीं शरीरें नटवून इकडे तिकडे फिरत असल्यामुळें त्यांच्या योगानें तें शृंगारल्यासारखें दिसत होतें ॥ ३२ ॥ त्यांत घरोघर दिवे लाविलेले असून पूजेचें साहित्य सिद्ध करून ठेविलें होतें. प्रत्येक घरांतून सुगंधी धूपाचा धूर खिडक्यां-तून निघत असून सर्वत्र पताका फडकत होत्या. त्यांतील मोठमोठ्या वाड्यांचीं शिखरें

रुप्याचीं होतीं व त्या शिखरांवर मोठमोठे सोन्याचे कळस लाविलेले होते. असें तें कुरुराजाचें राजधानीचें नगर श्रीकृष्णानें आंत प्रवेश केला असतां त्याच्या दृष्टीस पडलें ॥ ३३ ॥ मनुष्याच्या डोळ्यांनीं पाहण्यासारखें जर कांहीं असेल तर ती एक श्रीकृष्णाची मूर्तिच होय, असें असल्यामुळें त्याचा नगरांत प्रवेश झाला असें ऐकतांच नगरांतील स्त्रिया त्याच्या दर्शनासाठीं उत्कंठित होऊन राजमार्गावर येऊन उभ्या राहिल्या. त्या वेळीं धांदलीमुळें कित्येकींच्या वेणीचे पेड सैल झाले तर कित्येकींचीं वस्त्रें शिथिल झालीं. सर्व जणींनीं हातांत असलेलीं घरकामें तशींच सोडून दिलीं आणि कित्येकींनीं तर आपल्या पतींनाहि शयनावरच सोडून दिलें ! ॥ ३४ ॥ तो राजमार्ग हत्ती, घोडे, रथ, पायदळ इत्यादिकांनीं खच्चून गेला होता. श्रीकृष्ण त्यावरून आपल्या स्त्रियांसह चालला असतां कित्येक स्त्रिया त्याला पाहण्यासाठीं घरांच्या छपरांवर चढल्या आणि त्याच्यावर फुलें उधळून व मनानें त्याला आलिंगन देऊन त्यांनीं कामयुक्त कटाक्षांनीं त्याचें स्वागत केलें ॥ ३५ ॥ चंद्राभोंवतीं जशा तारा असाव्या, तशा श्रीकृष्णाच्या समागमें असलेल्या त्याच्या स्त्रिया त्या राजमार्गांत पाहून इंद्रप्रस्थांतील स्त्रिया एकमेकींना म्हणूं लागल्या, ‘ अहो, या स्त्रियांनीं असें कोणतें पुण्य केलें होतें कीं, त्याच्या योगानें हा पुरुषश्रेष्ठ श्रीकृष्ण आपल्या मनोहर हास्ययुक्त लीला व कटाक्ष यांनीं त्यांच्या नेत्रांना आनंद देत आहे ! ’ ॥ ३६ ॥ वाटेंत ठिकठिकाणीं प्रमुख नागरिक लोक हातांत शुभ पदार्थ घेऊन श्रीकृष्णाच्या दर्शनासाठीं एकत्र जमले होते. त्याच्या दर्शनानें आपलें पाप नष्ट झालें असें समजून त्यांनीं श्रीकृष्णाची पूजा केली ॥ ३७ ॥ युधिष्ठिराच्या अन्तःपुरांतील स्त्रियासुद्धां श्रीकृष्णाच्या येण्यामुळें आनंदित झाल्या व प्रफुल्लित नेत्रांनीं मोठ्या लगबगीनें त्याला सामोऱ्या आल्या. अशा रीतीनें सर्वांनीं स्वागत केलेल्या श्रीकृष्णानें युधिष्ठिराच्या राजवाड्यांत प्रवेश केला ॥ ३८ ॥ त्रिभुवनाचा स्वामी असा आपला भाचा जो श्रीकृष्ण तो आलेला पाहून पृथेचें अन्तःकरण प्रेमानें भरून आलें. सुनेसह ती पलंगावरून उठली आणि तिनें त्याला आलिंगन दिलें ॥ ३९ ॥ देवांचाहि देव अशा श्रीकृष्णाला याप्रमाणें मोठ्या आदरानें आपल्या घरीं आणल्यावर पुढें त्याचा सत्कार कसा करावा हें आनंदाच्या भरांत युधिष्ठिराला सुचेनासें झालें ॥ ४० ॥ हे परीक्षित् राजा, मग श्रीकृष्णानें आपली आत्या कुंती व दुसऱ्या वडील स्त्रिया यांना नमस्कार केला आणि द्रौपदी व सुभद्रा यांनीं आपल्या भावाला नमस्कार केला ॥ ४१ ॥ नंतर कुंतीच्या सांगण्यावरून द्रौपदीनें रुक्मिणी, सत्यभामा, भद्रा, जांबवती, कालिंदी, मित्रविन्दा, शैब्या, नाग्नजिती यांची व इतर श्रीकृष्णस्त्रियांची पूजा केली व त्यांना वस्त्रें, माळा व इतर शृंगार अर्पण केले ॥ ४२ ॥ ४३ ॥ याप्रमाणें धर्मराजानें श्रीकृष्णाची, त्याच्या सैन्याची, सेवकांची, अमात्यांची व स्त्रियांची यथायोग्य व्यवस्था लावून त्यांना प्रतिदिवशीं नवें नवें वाटेल असें आतिथ्य केलें ॥ ४४ ॥ पुढें कांहीं दिवसांनीं श्रीकृष्णानें अर्जुनाच्या साहाय्यानें अग्नीला खांडववन अर्पण करून तृप्त केलें. त्या प्रसंगीं मयासुराचें त्यानें अग्नीपासून रक्षण केल्यामुळें त्या असुरानें युधिष्ठिर राजाला अत्यंत

सुंदर अशी राजसभा बांधून दिली ॥ ४५ ॥ याप्रमाणें राजा युधिष्ठिराचें प्रिय करावें म्हणून श्रीकृष्ण तेथें कांहीं महिने राहिला व त्या अवधींत अर्जुन व आपले योद्धे यांच्यासह रथांत बसून त्यानें विहार केला ॥ ४६ ॥

**एकाहत्तरावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय ७२ वा

शुकाचार्य सांगतात, हे परीक्षित् राजा, एकदां युधिष्ठिर राजा सभेमध्यें बसला होता. सभोंवतीं ऋषि, ब्राह्मण, सैनिक, व्यापारी इत्यादि मंडळी असून त्याचे धाकटे भाऊहि जवळ होते ॥ १ ॥ तसेच आचार्य, कुळांतील वडील माणसें, ज्ञातिबांधव, इष्टमित्र व इतर नात्याचीं माणसें अशीं सर्व तेथें असून तीं ऐकत असतां युधिष्ठिर कृष्णाला हांक मारून त्याच्याशीं बोलूं लागला ॥ २ ॥

तो म्हणाला, 'हे श्रीकृष्णा, माझ्या मनांत राजसूय नांवाचा मोठा यज्ञ करून तुझ्या पवित्र विभूति अशा ज्या इंद्रादि देवता त्यांचें पूजन करावें असें आहे. तरी हे समर्था, हा आमचा मनोरथ तूं पूर्ण कर ! ॥ ३ ॥ पापनाशक अशा तुझ्या पायांची जे नित्य सेवा करतात आणि पवित्र मनानें जे त्यांचें ध्यान करितात त्या पुरुषांची, हे कमलनाभ श्रीकृष्णा, या संसारचक्रापासून सुटका होते व जर त्यांना सुखोपभोगांची इच्छा असेल तर तेहि त्यांना प्राप्त होतात; पण इतरांना हा लाभ घडत नाहीं ॥ ४ ॥ यास्तव, हे देवाधिदेवा, तुझ्या चरणकमलाच्या सेवेचा केवढा प्रभाव आहे हें पाहण्याची संधि लोकांना या प्रसंगानें प्राप्त होवो. हे प्रभो, जे तुला भजतात आणि जे भजत नाहींत असे दोन्ही प्रकारचे पुरुष कुरु व सृंजय यांच्या या घराण्यांत आहेत. तेव्हां त्या दोघांची स्थिति कशी काय होते हेंहि या प्रसंगानें तूं सर्वांना दाखवून दे ! ॥ ५ ॥ हे श्रीकृष्णा, तूं प्रत्यक्ष ब्रह्मस्वरूप असून सर्वांचा नियन्ता, सर्वांवर समान दृष्टि ठेवणारा व नित्य आत्मसुखाचा अनुभव घेणारा असल्यामुळें तुझ्यापाशीं 'हा आपला व हा परक्याचा' असा भावच नाहीं. कल्पतरूची सेवा करणारांना ज्याप्रमाणें तो त्या सेवेला अनुरूप असें फल देतो, त्यांत कधींहि उलटापालट होत नाहीं, तसाच प्रकार तुझाहि आहे' ॥ ६ ॥

युधिष्ठिराची ही विनंति ऐकून श्रीकृष्णानें उत्तर दिलें, 'हे शत्रुनाशका युधिष्ठिरा, तूं जो विचार मनांत आणिला आहेस तो फार चांगला आहे. त्याच्या योगानें तुझी उत्कृष्ट कीर्ति लोकांमध्यें पसरेल ॥ ७ ॥ हा जो राजसूय नांवाचा मोठा यज्ञ आहे, तो ऋषि, पितर, देवता, सर्व भूतमात्र, तसेच इष्टमित्र असे आम्ही, या सर्वांना इष्टच आहे ॥ ८ ॥ यास्तव सर्व राजांना जिंकून तूं पृथ्वी आपल्या नियंत्रणांत आण आणि सर्व प्रकारचें साहित्य गोळा करून या थोर यज्ञाचें तूं अनुष्ठान कर ॥ ९ ॥ हे युधिष्ठिरा, हे तुझे भाऊ इंद्रादि लोकपालांचे अंश आहेत आणि इंद्रियदमन न केलेल्या पुरुषाला प्राप्त होण्यास अशक्य असा जो मी, त्या मलाहि तूं आत्मसंयमनानें जिंकलें आहेस ॥ १० ॥ जो कोणी माझ्या भजनीं लागला त्याचा–तेज, कीर्ति, संपत्ति अथवा वैभव ह्या गोष्टींत–पाडाव करणें हें एखाद्या देवालाहि शक्य नाहीं, मग पृथ्वीवरील राजांची कथा काय ?' ॥ ११ ॥

शुकाचार्य सांगतात, हे परीक्षित् राजा, हें श्रीकृष्णाचें भाषण ऐकून युधिष्ठिराचें मुखकमल प्रफुल्लित झालें आणि विष्णूच्या तेजानें बलवान् झालेल्या आपल्या भावांना त्यानें चारी दिशांचे प्रदेश जिंकण्याच्या कामीं लावून दिलें ॥ १२ ॥ त्यानें संजयाचें साहाय्य देऊन सहदेवाला दक्षिण दिशेकडे पाठविलें, पश्चिम दिशेकडे नकुलाची योजना केली, उत्तर दिशा जिंकण्याचें काम अर्जुनाकडे सोंपविलें आणि मत्स्य, केकय आणि मद्र या राजांच्या साह्यानें पूर्व दिशेकडे जाण्यास भीमाला सांगितलें ॥१३॥ त्याप्रमाणें त्या पराक्रमी भावांनीं सामर्थ्यानें अनेक राजांना जिंकून अपार द्रव्य चोहोंकडून मिळवून आणिलें आणि हे परीक्षित् राजा, तें त्यांनीं यज्ञ करूं इच्छिणाऱ्या युधिष्ठिराच्या स्वाधीन केलें ॥ १४ ॥ पण एवढें झालें तरी जरासंध मात्र जिंकतां आला नाहीं व त्यामुळें युधिष्ठिराच्या मनाला चिंता लागली आहे असें जेव्हां श्रीकृष्णानें पाहिलें, तेव्हां त्या जरासंधाला जिंकण्याची जी युक्ति पूर्वी उद्धवानें सुचविली होती, तीच या वेळीं श्रीकृष्णानें युधिष्ठिराला सांगितली ॥ १५ ॥ त्याप्रमाणें, हे परीक्षित् राजा, भीमसेन, अर्जुन व कृष्ण हे तिघे ब्राह्मणांचीं रूपें घेऊन बृहद्रथपुत्र जारसंधाचें राहण्याचें ठिकाण जें गिरिव्रज तेथें गेले ॥ १६ ॥ क्षत्रिय असून ब्राह्मणवेष घेतलेले ते तिघेजण अतिथिसत्कार करण्याच्या वेळीं जरासंधाच्या वाड्यांत गेले आणि गृहस्थधर्म पाळणाऱ्या व ब्राह्मणांना नित्य अनुकूल असणाऱ्या त्या जरासंधापाशीं त्यांनीं दानाची याचना केली ॥ १७ ॥ ते म्हणाले, ‘ हे जरासंध राजा, आम्ही अतिथि फार लांबून आलों असून कांहीं मागण्याची आमची इच्छा आहे. यास्तव आम्ही मागतों तें तूं आम्हांला दे. तुझें कल्याण होईल ! ॥ १८ ॥ तुझ्यासारख्या उदाराला न देतां येण्यासारखें काहींच नाहीं. असें पाहा कीं, सहनशील लोकांना न सोसण्यासारखें कांहीं असतें काय ? उलट दुष्ट लोकांना करावयास वाईट असें काय असणार ? तसेंच सर्वांवर समदृष्टि ठेवणाऱ्या पुरुषाला परका असा कोण वाटणार ? ॥ १९ ॥ हें शरीर क्षणभंगुर असल्यामुळें तें वेंचून चिरस्थायी व सज्जनांना गावयास योग्य असें यश मिळविण्याला स्वतः समर्थ असतां जो तें मिळवीत नाहीं, तो पुरुष निंद्य होय. त्याची कींव करावी तितकी थोडीच ॥ २० ॥ हरिश्चंद्र, रंतिदेव, उञ्छवृत्ति मुद्गल ब्राह्मण, शिबिराजा, बळि, व्याध, कपोत इत्यादि अनेकजणांनीं क्षणभंगुर अशा शरिराचा त्याग करून शाश्वत पदाची प्राप्ति करून घेतलेली आहे ’ ॥ २१ ॥ शुकाचार्य म्हणतात, राजा, याप्रमाणें श्रीकृष्णप्रभृति या तिघांनीं याचना केली असतां जरासंधानें त्यांचा स्वर, त्यांची शरीरयष्टि, आणि त्यांच्या तळहातावर पडलेले धनुष्याच्या दोरीचे घट्टे यांच्या निरीक्षणावरून ते क्षत्रिय होत असें ओळखिलें व त्यांना आपण पूर्वीं पाहिलें असावें असेंहि त्याला वाटलें ॥ २२ ॥ तेव्हां तो मनांत म्हणाला, ‘ हे खरोखर क्षत्रियच आहेत, परंतु यांनीं वेष मात्र ब्राह्मणांचा घेतला आहे. तथापि त्यांनीं मागितलेली गोष्ट मी त्यांना देतों. फार काय सांगावें ? देण्यास कठीण असें हे शरीर देखील मी त्यांना देईन ॥ २३ ॥ विष्णूनें ब्राह्मणाच्या रूपानें येऊन बळीला ऐश्वर्यापासून भ्रष्ट केलें, तथापि त्या बळिराजाची

निष्कलंक कीर्ति दाहि दिशांमध्यें पसरलेली ऐकूं येतच आहे ॥ २४ ॥ विष्णु ब्राह्मणाचा वेष घेऊन इंद्राचें ऐश्वर्य त्याला परत मिळवून देण्यासाठीं आला आहे, हें ठाऊक झालें असतांहि व कुलगुरु शुक्राचार्य त्याला नको नको म्हणत असतांहि त्या दैत्यराज बळीनें विष्णूला पृथ्वीदान दिलेंच ! ॥ २५ ॥ देह हा केव्हां तरी पडणारच आहे. यास्तव या देहाच्या योगानें विपुल कीर्ति मिळविण्याचा जर क्षत्रिय प्रयत्न करणार नाहीं, तर मग त्याच्या जगण्याचा उपयोग तरी काय ? ॥ २६ ॥ असा विचार करून त्या उदारबुद्धि जरासंधानें श्रीकृष्ण, अर्जुन व भीम यांना म्हटलें, ' हे ब्राह्मणहो, तुमची काय इच्छा असेल ती मागून घ्या. मी तुम्हांला हें आपलें मस्तकहि देण्यास सिद्ध आहें ! ' ॥ २७ ॥

जरासंधाचें उत्तर ऐकून श्रीकृष्ण म्हणाला, 'हे महाराजा, जर आम्ही मागतों तें देण्याची तुझी इच्छा आहे, तर आम्हांला द्वंद्वयुद्धच दे. आम्ही क्षत्रिय असून युद्धाची भिक्षा मागण्यासाठीं तुझ्याकडे आलों आहों. अन्नाची इच्छा धरून आलेले नाहीं ॥२८॥ हा भीमसेन असून, हा दुसरा त्याचा भाऊ अर्जुन होय आणि मी या उभयतांचा मामेभाऊ व तुझा शत्रु जो कृष्ण तो आहें; समजलास ? ' ॥ २९ ॥ याप्रमाणें कृष्णानें त्याला सांगितलें असतां मगधराज जरासंध मोठ्यानें हंसला आणि रागानें म्हणाला, ' हे मूढांनो, तुम्हांला द्वंद्वयुद्ध पाहिजे आहे तर तें मी देतों ॥ ३० ॥ पण हे कृष्णा, तूं भित्रा असून चंचल स्वभावाचा आहेस. तुझ्याशीं द्वंद्वयुद्ध करून मी लढणार नाहीं. कारण तूं आपलें मूळचें मथुरा नगर सोडून समुद्राचा आश्रय केलेला आहेस ॥ ३१ ॥ आणि हा अर्जुन म्हणशील तर, तो माझ्याशीं वयानें समान नाहीं आणि शक्तीविषयीं बोलावयाचें तर तो माझ्याहून अधिक तर नाहींच; पण माझ्या बरोबरीचाहि नाहीं. यास्तव अर्जुन माझा द्वंद्वयुद्धांतील प्रतिस्पर्धी होऊं शकत नाहीं. भीमसेन मात्र माझ्या बरोबरीचा आहे; त्याच्याशीं मी लढतों ' ॥ ३२ ॥ असें बोलून जरासंधानें भीमाच्या हातीं एक मोठी गदा दिली आणि स्वत: आपणहि तसलीच दुसरी गदा घेऊन तो नगराच्या बाहेर आला ॥ ३३ ॥ तेथें सपाट भूमि पाहून तीवर ते दोघे वीर एकमेकांना भिडले आणि युद्धाचा मद अंगांत संचरल्यामुळें आपल्या वज्रासारख्या गदांचा प्रहार एकमेकांवर करूं लागले ॥ ३४ ॥ ते डाव्या उजव्या अशा दोन्ही बाजूंनीं अद्भुत रीतीनें चक्राकार फिरत एकमेकांवर चाल करीत असतां रंगभूमीवर आलेल्या नटांच्या हालचालींप्रमाणें त्यांच्या हालचाली नीटनेटक्या दिसत होत्या ॥ ३५ ॥ हे परीक्षित् राजा, हत्तींनी जसे आपले सुळे एकमेकांच्या सुळ्यांवर मारावे त्याप्रमाणें भीम व जरासंध हे आपल्या गदांनीं एकमेकांवर मारा चालवीत असतां गदेवर गदा आपटून वज्राघातासारखा त्यांचा कडकड ध्वनि होऊं लागला ॥ ३६ ॥ एकमेकांच्या बाहूंनीं मोठ्या वेगानें एकमेकांवर टाकिलेल्या गदांचे आघात त्यांच्या खांद्यांवर, कमरेवर, पायांवर, मांड्यांवर, हातांवर व सांध्यांवर पडून त्या गदांचें चूर्ण झालें ! संतापून गेलेले दोन हत्ती एकमेकांशीं लढत असतां त्यांच्यामध्यें सांपडलेल्या रुईच्या फांद्यांचें जसें चूर्ण होतें तसाच हा प्रकार होता ॥ ३७ ॥ याप्रमाणें त्या दोन्ही गदा भंगून गेल्या असतां उभयतां वीरांनीं क्रोधाविष्ट

होऊन लोखंडासारख्या आपल्या मुठींचे प्रहार एकमेकांवर करण्यास आरंभ केला. तेव्हां दोन हत्ती एकमेकांशीं भांडतांना ताडाच्या झाडांवर त्यांच्या दातांचा प्रहार होऊन जसा वज्राघातासारखा कर्कश ध्वनि होतो, त्याप्रमाणें जरासंध व भीम यांच्याहि मुठींचे प्रहार एकमेकांवर होऊन कर्कश शब्द होऊं लागला ॥ ३८ ॥ हे परीक्षित राजा, जरासंध व भीम हे दोघेहि सारखे शिकलेले होते व त्या दोघांचें बळ व तडफ हीं सुद्धां समसमान होतीं. असे ते दोन योद्धे एकमेकांवर प्रहार करीत असतां कोणाचाहि आवेश उणा-अधिक झाला नाहीं किंवा त्या उभयतांच्या युद्धांत कांहीं भेदहि दिसला नाहीं ॥ ३९ ॥ हे राजा, असें त्यांचें तें द्वंद्वयुद्ध सत्तावीस दिवस चाललें होतें. ते दिवसा युद्ध करीत आणि रात्र झाली म्हणजे मित्राप्रमाणें राहात ॥ ४० ॥ असें चाललें असतां एक दिवस भीमसेन श्रीकृष्णाला म्हणाला, ' कृष्णा, या द्वंद्वयुद्धामध्यें मी जरासंधाला जिंकू शकेन असें वाटत नाहीं ! ' ॥ ४१ ॥ भीमाचें हें भाषण ऐकिल्यावर श्रीकृष्ण विचार करूं लागला. जरासंधाचा जन्म कसा झाला व त्याचा मृत्यु कसा घडून येईल हें त्याला ठाऊक होतें. जरा राक्षसीनें शरिराचीं दोन समान शकलें एकत्र जुळवून जरासंधाचें शरीर रचिलें होतें. तेव्हां आपलें तेज भीमाच्या शरिरांत घालून त्यानें भीमाचें सामर्थ्य वाढविलें ॥ ४२ ॥ आणि जरासंधाच्या मृत्यूचा उपाय मनांत आणून त्या अमोघदर्शन श्रीकृष्णानें तो भीमाला सुचविण्यासाठीं एक फांदी घेऊन ती खुणेसाठीं फाडून दाखविली ॥ ४३ ॥ ती खूण पाहतांच महासमर्थ व गदाप्रवीण भीमाच्या लक्षांत तो प्रकार आला आणि त्यानें जरासंधाचे पाय धरून त्याला भूमीवर पाडिलें ॥ ४४ ॥ मग त्यानें त्याचा एक पाय आपल्या पायानें दाबून आणि दुसरा पाय दोन्ही हातांनीं धरून झाडापासून खांदी वेगळी करावी तसें त्याचें शरीर गुदद्वारापासून दुभंग केलें ! ॥ ४५ ॥ जरासंधाच्या शरिराचीं जीं दोन शकलें झालीं त्यांतील प्रत्येकाला एक पाय, एक मांडी, एक वृषण, एक कुल्ला, एक पाठीची बाजू, एक स्तन, एक खांदा, एक हात, एक डोळा, एक भुवई व एक कान अशीं आहेत असें प्रेक्षकांना आढळून आलें ! ॥ ४६ ॥ मगधराज जरासंधाचा वध झाला असतां त्या नगरांत मोठा हाहा:कार झाला. अर्जुन व कृष्ण यांनीं भीमाला आलिंगन देऊन त्याचें अभिनंदन केलें ॥ ४७ ॥ नंतर सर्व प्राणिमात्रांचें हित करणाऱ्या त्या परमसमर्थ भगवान् प्रभु श्रीकृष्णानें जरासंधाचा पुत्र जो सहदेव त्याला मगध देशाचा राजा म्हणून राज्याभिषेक केला आणि जरासंधानें बंदींत टाकिलेल्या राजांची मुक्तता केली ॥ ४८ ॥

**बहात्तरावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय ७३ वा

शुकाचार्य सांगतात, हे परीक्षित् राजा, जरासंधानें युद्धांत सहज जिंकिलेले ते वीस हजार आठशें राजे पर्वताच्या दरींत बंदींत ठेविलेले होते. त्यांचीं शरीरें अगदीं मलिन झालीं असून वस्त्रेंहि मळलीं होतीं. श्रीकृष्णानें त्यांची मुक्तता केल्यावर ते दरीच्या बाहेर आले ॥ १ ॥ त्यांचीं शरीरें अन्न न मिळाल्यामुळें कृश झालीं होतीं. त्यांचीं तोंडें सुकून गेलीं होतीं व बंदिवासाच्या दुःखामुळें ते व्याकूळ झाले होते. अशा स्थितींत तो घननीळ पीतांबरधारी श्रीकृष्ण त्यांच्या दृष्टीस पडला ॥ २ ॥ ज्याच्या वक्षःस्थलावर श्रीवत्सचिन्ह असून ज्याला चार बाहु व चार हात आहेत, ज्याचे नेत्र कमळाच्या गाभ्याप्रमाणें रक्तवर्ण असून ज्याचें मुख प्रसन्न व रमणीय आहे, ज्याच्या कानांत मकराकार कुंडलें तळपत आहेत ॥ ३ ॥ ज्याच्या एका हातांत कमळ असून दुसऱ्या हातांत गदा, शंख व चक्र हीं शोभत आहेत. ज्याच्या मस्तकावर किरीट, कंठांत हार, हातांत कडीं, कमरेंत कटदोरा असून बाहूंना अंगदांनीं भूषविलें आहे ॥ ४ ॥ ज्याच्या कंठांत कौस्तुभमणि चकाकत असून त्याच्यावरून लांब वनमाला लोंबत आहे, अशा त्या श्रीकृष्णाला पाहतांच ते राजे त्याला आपल्या नेत्रांनीं जणूं पिऊन टाकूं लागले व जिभांनीं जणूं चाटूं लागले ! ॥ ५ ॥ त्यांनीं नाकांनीं त्याला जणू हुंगिलें व बाहूंनी जणूं आलिंगन दिलें आणि त्याच्या दर्शनानें आपलीं पापें नष्ट झालीं असें समजून, मस्तकें लववून त्यांनीं श्रीकृष्णाच्या पायांना नमस्कार केला ॥ ६ ॥ श्रीकृष्णाच्या दर्शनामुळें त्यांना जो आनंद झाला त्या आनंदाच्या योगानें त्यांचें बंदिवासाचें दुःख नष्ट झालें आणि हात जोडून ते सर्व राजे श्रीकृष्णाची मोठ्यानें स्तुति करूं लागले ॥ ७ ॥

ते राजे म्हणाले, 'हे देवांच्या देवा, तूं शरणागतांचें दुःख नाहींसें करणारा असून निर्विकार आहेस. आम्ही या भयंकर संसारामुळें उद्विग्न झालों असून तुला शरण आलों आहों. आमचें रक्षण कर ! ॥ ८ ॥ हे जगन्नाथा, हे मधुसूदना, या मगधराज जरासंधाला आम्ही कांहीं दोष देत नाहीं. कारण हे समर्था, राजांना राज्यभ्रष्ट करणें म्हणजे त्यांच्यावर तुझी मोठी कृपाच होय ॥ ९ ॥ जो राजा राज्य व ऐश्वर्य यांच्या अभिमानानें फुगून गेलेला असतो, त्याचें कधीं कल्याण होत नाहीं ! तुझ्या मायेनें मोहून गेल्यावर तो चंचल अशा संपत्तीला नित्य अशी मानितो ॥ १० ॥ सपाट भूमीवर उष्णतेनें मृगजळ दिसूं लागलें म्हणजे मुलें ज्याप्रमाणें त्याला खऱ्या पाण्याचें सरोवर समजूं लागतात, त्याप्रमाणें निरनिराळे भेद उत्पन्न करणारी माया म्हणजेच सत्य वस्तु होय असें अज्ञानी लोक मानितात ॥ ११ ॥ हे प्रभो श्रीकृष्णा, पूर्वीं आमचीहि दृष्टि संपत्तीच्या मदामुळें अंध झाली होती. ही पृथ्वी जिंकण्याच्या इच्छेनें आम्हीं एकमेकांशीं युद्धें केलीं आणि मदोन्मत्त

होऊन काळस्वरूपी तूं पुढें उभा असलेला पाहात असतांहि अति निर्दयपणें आपल्याच प्रजेच्या वधाला कारण झालों ॥ १२ ॥ हे श्रीकृष्णा, तेच आम्ही आजहि आहों खरे; पण आतां नित्य वेगानें धांवणाऱ्या व अत्यंत पराक्रमी अशा काळानें आम्हांला वैभवापासून भ्रष्ट केलें आहे. हा काळ म्हणजे तुझेंच स्वरूप असून मोठ्या कृपेनें त्यानें आमचा गर्व नाहींसा केला आणि म्हणून तुझ्या चरणांचें आम्हीं स्मरण करतों ॥ १३ ॥ आतां आम्हांला या मृगजलासमान असणाऱ्या राज्याची इच्छा राहिली नाहीं. हा देह केव्हां पडेल याचा नियम नाहीं, कारण तो रोगांचें माहेरघर आहे. यास्तव या देहानें राज्य करावें अशी आतां आमची इच्छा नाहीं. त्याप्रमाणेंच मोठमोठे यज्ञ करून मरणानंतर परलोकीं प्राप्त होणारें व म्हणून आतां कानाला गोड लागणारें असें जें त्या कर्माचें फल त्याचीहि आम्हांला आतां इच्छा नाहीं. करितां आतां तूं आम्हांला असा कांहीं मार्ग सांग कीं, जेणेंकरून आम्हीं या संसारांत धडपड करीत असतांहि तुझ्या चरणकमलाची आमची स्मृति नष्ट होणार नाहीं ॥ १४ ॥ १५ ॥ विश्वाचें दुःख हरण करणारा, शरणागताचे क्लेश नष्ट करणारा असा जो परमात्मा वसुदेवपुत्र श्रीकृष्ण त्या तुला आमचा वारंवार नमस्कार असो !' ॥ १६ ॥

शुकाचार्य सांगतात, हे परीक्षित् राजा, बंधनांतून मुक्त झालेल्या राजांनीं याप्रमाणें भगवान् श्रीकृष्णाची स्तुति केली असतां तो करुणमूर्ति शरणागत प्रतिपालक प्रभु त्यांना मधुर शब्दांनीं उत्तर देऊं लागला ॥ १७ ॥

भगवान् म्हणाला, 'हे राजे हो, तुम्ही आतां जी इच्छा दर्शविली तीप्रमाणें आजपासून मी जो सर्व विश्वाचा स्वामी त्या माझ्याविषयींची तुमची भक्ति निःसंशय सुदृढ होईल ॥ १८ ॥ हे राजे हो, तुम्हीं केलेला निश्चय खरोखर फार चांगला आहे. तुम्हीं जें आतां बोललां तेंहि अगदीं सत्य आहे. संपत्ति व वैभव यांच्या मदामुळें मनुष्य कसा मानगलित व उच्छृंखल होतो पाहा ॥ १९ ॥ हैहयांचा राजा सहस्रार्जुन, तसेच नहुष, वेन, रावण, नरकासुर आणि दुसरे अनेक देव, दैत्य व राजे हे संपत्तीच्या अभिमानामुळें आपल्या स्थानापासून भ्रष्ट झालेले आहेत ॥ २० ॥ यास्तव देह आदिकरून या विश्वांत उत्पन्न होणारी प्रत्येक वस्तु विनाशी आहे हें समजून तुम्ही माझ्या ठिकाणीं मन लावा आणि यज्ञादिकांनीं माझी पूजा करून न्यायानें प्रजेचें पालन करा ॥ २१ ॥ प्रजा वाढवून तुम्हीं वंशविस्तार करा आणि दैवयोगानें जें जें प्राप्त होईल तें तें सुख, दुःख, जन्म, मरण इत्यादि सर्व सेवन करीत माझ्या ठिकाणीं चित्त ठेवून वागा ॥ २२ ॥ देहादि वस्तूंवर आसक्ति ठेवूं नका, आत्मस्वरूपांत आनंद माना आणि व्रताचरण करा. तुम्हीं माझ्या ठिकाणीं मन नीट लाविलें म्हणजे परब्रह्म अशा माझी तुम्हांला शेवटीं प्राप्ति होईल !' ॥ २३ ॥

शुकाचार्य सांगतात, हे राजा, विश्वाचा स्वामी अशा श्रीकृष्णानें त्या राजांना असा उपदेश केल्यावर त्यांना स्नान घालण्याची दासदासी यांना आज्ञा केली ॥ २४ ॥ मग

त्यानें जरासंधपुत्र सहदेवाकडून त्यांची पूजा करविली आणि राजांना उचित अशीं वस्त्रें, भूषणें, माळा व उट्या त्यांना अर्पण करविल्या ॥ २५ ॥ याप्रमाणें त्यांना स्नान घालून अलंकृत केल्यावर त्यांना उत्तम प्रकारचें भोजनहि श्रीकृष्णानें देवविलें आणि राजांना उचित अशा नाना प्रकारच्या भोग्य वस्तु म्हणजे विडा, पानगुलाब आदि देववून त्यांना संतुष्ट केलें ॥२६॥ अशा रीतीनें संकटांतून सोडवून सत्कार केला असतां, चकचकीत कुंडलें धारण केलेले ते सर्व राजे पावसाळा संपल्यावर आकाशांतील ग्रह जसे चमकूं लागतात, तसे चमकूं लागले ॥ २७ ॥ मग श्रीकृष्णानें सोनें व रत्नें यांनीं सजविलेल्या घोड्यांवर व रथांवर त्यांना बसविलें आणि गोड शब्दांनीं त्यांची पाठवणी करून त्यांना आपआपल्या देशीं धाडून दिलें ॥ २८ ॥ याप्रमाणें महात्म्या श्रीकृष्णानें संकटांतून सोडविलेले ते राजे त्याचें ध्यान करीत व त्या जगन्नाथाचे पराक्रम गात तेथून निघून देशीं गेले ॥ २९ ॥ तेथें गेल्यावर त्यांनीं श्रीकृष्णपरमात्म्याचे सारे पराक्रम आपल्या प्रजांना सांगितले आणि भगवानानें जसा उपदेश केला होता त्याप्रमाणें ते सर्व सावधानपणें वागूं लागले ॥ ३० ॥ असो. भीमसेनाकडून जरासंधाचा वध करविल्यावर त्याचा पुत्र जो सहदेव त्यानें केलेल्या सत्काराचा स्वीकार करून श्रीकृष्ण, अर्जुन व भीम यांच्यासह तेथून निघून इंद्रप्रस्थास परत आला ॥ ३१ ॥ नगराच्या सीमेवर येतांच त्या विजयी वीरांनीं आपले शंख फुंकिले. ते ऐकून त्यांच्या मित्रमंडळीला आनंद झाला व त्यांच्या विरोधकांना अर्थातच दुःख झालें ॥ ३२ ॥ तो शंखांचा शब्द ऐकल्यावर इंद्रप्रस्थांतील लोकांना हर्ष झाला. जरासंधाचा वध झाल्याची ती खूण होय असें त्यांनीं ओळखिलें व धर्मराजाला आपला मनोरथ पूर्ण झाला असें वाटलें ॥ ३३ ॥ राजसभेशीं आल्यावर भीम, अर्जुन व कृष्ण यांनीं धर्मराजाला नमस्कार केला आणि आपण केलेल्या सर्व पराक्रमाचें वृत्त त्याला निवेदन केलें ॥ ३४ ॥ श्रीकृष्णाच्या कृपेमुळेंच ही गोष्ट सिद्धीस गेली हें पाहून धर्मराजाच्या डोळ्यांतून प्रेमामुळें आनंदाश्रूंचा प्रवाह वाहूं लागला व त्यामुळें तो कांहीं न बोलत थोडा वेळ स्तब्धच राहिला ॥ ३५ ॥

**त्र्याहात्तरावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय ७४ वा

शुकाचार्य सांगतात, हे परीक्षित् राजा, याप्रमाणें जरासंधाच्या वधाचें वृत्त व भगवान् श्रीकृष्णाचें माहात्म्य ऐकून संतुष्ट झालेला तो युधिष्ठिर श्रीकृष्णाशीं बोलूं लागला ॥ १ ॥

तो म्हणाला, ' हे श्रीकृष्णा, या त्रैलोक्यामध्यें ज्यांना मोठे म्हणून म्हणतात व जे लोकांमध्यें महासमर्थ म्हणून गणिलेले आहेत, ते सर्व पुरुष दुर्लभ अशा तुझ्या उपदेशाला मिळवून तो शिरसावंद्य मानितात ॥ २ ॥ हे विश्वव्यापका, अशा प्रकारें तूं कमलनयन भगवान् सर्वश्रेष्ठ असतांहि, वस्तुतः क्षुद्र असून खोट्या अभिमानामुळें स्वतःला समर्थ समजणाऱ्या अशा आम्हां राजांची आज्ञा तूं मानितोस ही मोठी विटंबना नव्हे काय? ॥ ३ ॥ एकच एक ब्रह्मस्वरूप अशा परमात्म्याचें तेज कोणत्याहि कर्मांनीं वाढत नाहीं किंवा ऱ्हासहि पावत नाहीं. सूर्य उगवतो म्हणून त्याचें तेज वाढतें असें नाहीं किंवा तो मावळतो म्हणून त्यांत वैगुण्यहि येत नाहीं, तसाच तुझ्या तेजाचा प्रकार होय ॥ ४ ॥ हे रमारमणा, हे अजिंक्य श्रीकृष्णा, तुझे जे भक्त आहेत त्यांच्या ठिकाणीं सुद्धां मी व माझें अशी भेदबुद्धि नाहीं. मग ती तुझ्या ठिकाणीं कोठून असणार? ती भेदबुद्धि मायाकृत असून पशूंसारख्या अज्ञ प्राण्यांतच आढळून येते ॥ ५ ॥

शुकाचार्य म्हणतात, हे परीक्षित् राजा, याप्रमाणें श्रीकृष्णाशीं भाषण केल्यावर यज्ञाला उचित असा वसंतऋतूचा काळ प्राप्त झाला. तेव्हां युधिष्ठिरानें कृष्णाच्या अनुमतीनें योग्य अशा वेदनिष्णात ब्राह्मणांची ऋत्विज म्हणून निवड केली ॥ ६ ॥ द्वैपायन व्यास, भरद्वाज, सुमन्तु, गौतम, असित, वसिष्ठ, च्यवन, कण्व, मैत्रेय, कवष, त्रित, विश्वामित्र, वामदेव, सुमति, जैमिनि, क्रतु, पैल, पराशर, गर्ग, वैशंपायन, अथर्वा, कश्यप, धौम्य, भार्गवराम, आसुरि, वीतिहोत्र, मधुच्छंद, वीरसेन आणि अकृतव्रण अशा पुरोहितांची योजना त्यानें केली ॥ ७ ॥ ८ ॥ ९ ॥ त्याचप्रमाणें त्यानें दुसऱ्याहि अनेकांना निमंत्रण दिलें व त्याला अनुसरून द्रोण, भीष्म, कृप आदिकरून योद्धे, तसाच सर्व पुत्रांसहित धृतराष्ट्र, महाबुद्धिमान् असा विदुर हे सर्व तेथें आले ॥ १० ॥ त्याशिवाय ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र या चारी वर्णांचे अनेक लोक आणि सर्व राजे व त्यांचे मंत्री हेहि तो राजसूय यज्ञ पाहण्यासाठीं इंद्रप्रस्थाला आले ॥ ११ ॥ सर्व मंडळी आल्यावर यज्ञासाठीं नियोजित केलेली भूमि सोन्याच्या नांगरांनीं ब्राह्मणांनीं नांगरिली आणि तीवर युधिष्ठिराला वेदविहित मार्गानें राजसूयाची दीक्षा दिली ॥ १२ ॥ असें म्हणतात कीं, पूर्वी वरुणाच्या राजसूयाच्या प्रसंगीं जशीं सर्व पात्रें सोन्याचीं होतीं आणि ब्रह्मदेव व शंकर यांसह इंद्र आदिकरून सारे लोकपाल त्या यज्ञाला उपस्थित झाले होते, तसाच सर्व थाट

या युधिष्ठिराच्या राजसूयप्रसंगीं जमला होता ॥ १३ ॥ सिद्ध, गंधर्व, विद्याधर, मोठे नाग, ऋषि, यक्ष, राक्षस, पक्षी, किन्नर, चारण हे सर्व आपआपल्या परिवारासह तेथें आले होते ॥ १४ ॥ सर्व देशांचे राजे व त्यांच्या राण्या यांना निमंत्रण दिलें असून तीं सर्व त्या यज्ञासाठीं उपस्थित झालीं होतीं. युधिष्ठिराची सामग्री परिपूर्ण आहे असें पाहून त्या राजांना आश्चर्य वाटलें नाहीं; कारण युधिष्ठिर हा कृष्णभक्त असल्यामुळें तशी सिद्धता असणें स्वाभाविकच असें त्यांना वाटलें ॥ १५ ॥ सर्व सिद्धता झाल्यावर देवांप्रमाणें तेजस्वी अशा पुरोहितांनीं महाराज युधिष्ठिराकडून यथाशास्त्र असें राजसूय यज्ञाचें अनुष्ठान करविलें. पूर्वी वरुणाकडून देवांनीं असाच विधियुक्त राजसूय करविला होता ॥ १६ ॥ त्या यज्ञांत सोमरस काढण्याच्या दिवशीं पुरोहित व सभेंतील सन्मान्य पुरुष या थोर मंडळींचें युधिष्ठिरानें आस्थेनें यथाविधि पूजन केलें ॥ १७ ॥ त्या वेळीं सभासदांमधील कोणत्या पुरुषाला अग्रपूजेचा मान द्यावा म्हणून सर्वजण विचार करूं लागले. पण तेथें अनेक थोर पुरुष असल्यामुळें ही निवड कोणाला करितां येईना. त्या वेळीं सहदेव पुढें झाला आणि सर्वांना उद्देशून म्हणाला ॥ १८ ॥ ' अहो, यादवांचा संरक्षक असा जो हा भगवान् श्रीकृष्ण तोच या अग्रपूजेच्या मानाला पात्र आहे. तो सर्व देवतास्वरूपी असून देश, काल, धन इत्यादिहि त्याचींच स्वरूपें आहेत ॥ १९ ॥ हें सारें विश्व श्रीकृष्णात्मक असून यज्ञहि कृष्णरूपच होत. तसेंच अग्नि, आहुति, मंत्र हीं कृष्णरूपच असून सांख्य व योग हीं शास्त्रेंही श्रीकृष्णस्वरूपाचेंच प्रतिपादन करतात ॥ २० ॥ हा श्रीकृष्ण एक परमेश्वर असून दुसरें या विश्वांत कांहींच नाहीं. हे सभासद हो, तो आपल्या स्वरूपानें आपलाच आश्रय करितो व स्वतः जन्मरहित असून या विश्वाची उत्पत्ति, रक्षण व लय करितो ॥ २१ ॥ प्रत्येक मनुष्य जीं नाना प्रकारचीं कर्मे करितो, तीं त्या श्रीकृष्णाच्याच कृपेमुळें असून धर्म, अर्थ, काम व मोक्ष या चार पुरुषार्थरूपी कल्याणाची इच्छाहि त्याच्याच कृपेनें करीत असतो ॥ २२ ॥ यास्तव या महात्म्या श्रीकृष्णालाच अग्रपूजेचा मान देणें अवश्य आहे. असें झालें तरच भूतमात्राचें व आत्म्याचें पूजन केलें असें होणार आहे ॥ २३ ॥ श्रीकृष्ण हा सर्व भूतांचा अंतर्यामी आत्मा आहे. तो समदृष्टि, शांत व परिपूर्ण असल्यामुळें, दिलेल्या वस्तूंचें फल अनंतपटीनें मिळावें अशी इच्छा करणारांनीं जें काय द्यावयाचें असेल तें त्यालाच द्यावें ' ॥ २४ ॥ याप्रमाणें बोलून कृष्णाचें माहात्म्य जाणणारा सहदेव स्वस्थ राहिला. त्याचें भाषण ऐकून सर्व थोर मनाचे सभासद ' फार चांगलें, उत्तम ! ' असें म्हणून त्याची स्तुति करूं लागले ॥ २५ ॥ नंतर ब्राह्मणांची त्या भाषणाला अनुमति मिळालेली पाहून व सभासदांचें मतहि तसेंच आहे असें समजून संतुष्ट झालेल्या राजा युधिष्ठिरानें मोठ्या प्रेमानें त्या हृषीकेश श्रीकृष्णाची उत्तम प्रकारें पूजा केली ॥ २६ ॥ त्यानें श्रीकृष्णाचे पाय धुतले व तें सर्व लोकांना पवित्र करणारें पाणी आपल्या मस्तकावर, तसेंच आपल्या स्त्रियांच्या, बंधूंच्या, मंत्र्यांच्या व कुटुंबांतील इतर सर्वांच्या मस्तकांवर आनंदानें शिंपलें ॥ २७ ॥ नंतर रेशमी पीतांबर आणि मूल्यवान् अलंकार त्याला अर्पण करून त्यानें षोडशोपचार-

युक्त त्याची पूजा केली. त्या प्रसंगीं धर्मराजाचें हृदय आनंदानें इतकें उचंबळून आलें कीं, त्याच्या डोळ्यांतून आनंदाश्रु वाहूं लागले व त्याच्यानें त्या श्रीकृष्णमूर्तीकडे पाहवेना ॥ २८ ॥ याप्रमाणें श्रीकृष्णाचा सत्कार झाला असतां सर्व लोकांनीं त्याला हात जोडले व नमस्कार करीत त्यांनीं त्याचा जयजयकार केला आणि आकाशांतून त्याजवर पुष्पवृष्टि झाली ॥ २९ ॥ श्रीकृष्णाचें गुणवर्णन ऐकून दमघोषाचा पुत्र जो शिशुपाल त्याला आधींच मोठा राग आला होता. त्यांत आणखी त्याचा जयजयकार झालेला जेव्हां त्यानें ऐकिला, तेव्हां तो तत्काल आपल्या आसनावरून उठला. त्यानें हात वर केले आणि मोठ्या रागानें त्या सभेंत तो भगवान् श्रीकृष्णाला उद्देशून निंदात्मक कठोर शब्द निर्धास्तपणें बोलूं लागला ॥ ३० ॥ तो म्हणाला, 'अहो, काळाचें उल्लंघन करणें कठीण आहे असें जें वेदवचन आहे तें अगदीं खरें आहे. कारण वृद्ध पुरुषांच्याहि बुद्धीला पोरांच्या बोलण्यानें मोह पडला आहे. ॥ ३१ ॥ हे सभासदहो, तुम्हीं पात्रापात्रविचार करण्यांत अत्यंत कुशल आहां, तरी या पोराच्या बोलण्याकडे तुम्ही लक्ष देऊं नका आणि अग्रपूजेचा मान कृष्णाला द्यावा म्हणून जी तुम्हीं संमति देत आहां ती देऊं नका ॥ ३२ ॥ अहो, तपस्वी, विद्वान्, व्रताचरणी व ज्यांनीं ज्ञानाच्या योगानें आपल्या पातकांचा क्षय केला आहे व इंद्रादि लोकपालांनींहि ज्यांची पूजा केली आहे, असे अनेक ब्रह्मनिष्ठ ऋषिवर्य सभाध्यक्ष होण्यास पात्र असलेले येथें असतां, त्यांना वगळून, जसा कावळ्याला पुरोडाश द्यावा, त्याप्रमाणें अग्रपूजेचा मान या कुलांगार गवळ्याला देतां हें अनुचित नव्हे काय ? ॥ ३३ ॥ ३४ ॥ हा कृष्ण वर्ण, आश्रम. कुळाचा उच्चपणा यांना पारखा असून सर्व धर्मांनीं त्याला बाहेर टाकिलेलें आहे. त्याचें वर्तन स्वैर असून त्याच्यांत कसलाहि गुण नाहीं. असें असतां त्याला अग्रपूजा काय म्हणून मिळावी ? ॥ ३५ ॥ अहो, या यादवांच्या कुळाला ययातीचा शाप असून सज्जनांनीं त्याला बहिष्कृत केलेलें आहे व निष्कारण मद्यप्राशन करून ज्यांतील पुरुष उन्मत्त झाले आहेत अशा कुळांतील पुरुषाला अग्रमान कसा योग्य होईल ? ॥ ३६ ॥ हे यादव ब्रह्मर्षींनीं सेवन केलेल्या देशाचा त्याग करून, जेथें ब्रह्मतेजाचा अगदीं अभाव आहे अशा समुद्रांतील बिकट स्थानाचा आश्रय करून राहिले आहेत व तेथून ते चोराप्रमाणें आमच्या प्रजांना उपद्रव देत आहेत !' ॥ ३७ ॥ शुकाचार्य सांगतात, राजा, याप्रमाणें शिशुपाल श्रीकृष्णाला उद्देशून अनेक प्रकारचीं दुरुत्तरें बोलला. कारण त्याचें पुण्य संपुष्टांत आलें होतें. परंतु कोल्हीच्या कुईला ज्याप्रमाणें सिंह कांहीं उत्तर देत नाहीं त्याप्रमाणें श्रीकृष्णानेंहि शिशुपालाच्या निंदात्मक भाषणाला कांहीं उत्तर दिलें नाहीं ॥ ३८ ॥ पण ती श्रीकृष्णाची दुःसह निंदा पुष्कळ सभासदांना न रुचल्यामुळें ते कानांवर हात ठेवून रागानें शिशुपालाला शाप देत सभास्थान सोडून गेले ॥ ३९ ॥ भगवंताची किंवा त्याची भक्ति करणाऱ्या पुरुषांची निंदा ऐकूं येत असतां जो कोणी तेथून निघून जात नाहीं, तोहि निंदा करणाऱ्याप्रमाणेंच अधोगतीला जातो व त्याचें सर्व पुण्य नष्ट होतें ॥ ४० ॥ असो. हा प्रकार पाहून पांडव संतापून गेले व ते आणि मत्स्य, कैकय व संजय असे सर्वजण आपलीं शस्त्रें उभारून शिशुपाला ठार

करण्यासाठीं उभे राहिले ॥४१॥ हे परीक्षित् राजा, इकडे शिशुपालानेंहि न डगमगतां आपली ढाल व तरवार उचलली आणि त्या राजसभेंत श्रीकृष्णानें पक्षांतील राजाची तो निर्भर्त्सना करूं लागला ॥ ४२ ॥ तेव्हां मात्र भगवान् श्रीकृष्णानें पुढें होऊन आपल्या मंडळीला मागें घेतलें आणि स्वतः क्रुद्ध होऊन आपल्या तीक्ष्ण धारेच्या सुदर्शनाने आपल्यावर चाल करणाऱ्या शिशुपालाचा शिरच्छेद केला ॥ ४३ ॥ अशा रीतीनें, शिशुपालाचा वध झाला असतां त्या सभेंत मोठा गोंगाट झाला आणि शिशुपालाचे अनुयायी असलेले राजे आपल्या जीवाच्या भीतीनें तेथून पळून गेले ॥ ४४ ॥ शिशुपालाच्या देहांतून, आकाशांतून भूमीवर तुटून पडलेल्या ताऱ्याप्रमाणें एक तेज निघालें आणि सर्व पाहत असतां तें श्रीकृष्णाच्या शरिरांत शिरलें ॥ ४५ ॥ अशा रीतीनें तीन जन्मांत वाढलेल्या वैरामुळें बुद्धि मोहित होऊन शिशुपाल श्रीकृष्णाचें नित्य ध्यान करीत असल्यामुळें तो अंतीं श्रीकृष्णमयच झाला. कारण त्याच्या जन्माला तरी त्याचा श्रीकृष्णाचा वैरभावच कारण झलेला होता ॥ ४६ ॥ असो. नंतर चक्रवर्ति युधिष्ठिरानें ऋत्विज आणि सभासद या सर्वांची यथाशास्त्र पूजा करून त्यांना विपुल दक्षिणा दिली आणि मग अवभृथ स्नान केलें ॥ ४७ ॥ याप्रमाणें राजा युधिष्ठिराचा यज्ञ परिपूर्ण करून दिल्यावर तो योगेश्वर भगवान् श्रीकृष्ण मित्रांच्या विनंतीरून आणखी कांहीं महिने इन्द्रप्रस्थांत राहिला ॥ ४८ ॥ त्याला जावयाला अनुज्ञा देण्याचें युधिष्ठिराच्या मनांत येईना; तथापि भगवान् श्रीकृष्णानें ती अनुज्ञा मिळविली आणि आपल्या स्त्रिया व मंत्री यांना घेऊन तो आपल्या द्वारकानगरीला गेला ॥ ४९ ॥ शुकाचार्य म्हणतात, राजा, याप्रमाणें वैकुंठलोकीं राहणाऱ्या जय-विजयांना ब्राह्मणांचा शाप होऊन त्यामुळें त्यांना वारंवार जन्म कसा घ्यावा लागला त्याची सविस्तर कथा मीं तुला सांगितली आहे ॥ ५० ॥ असो. राजसूय यज्ञाच्या शेवटीं युधिष्ठिरानें अवभृथस्नान केल्यावर ब्राह्मण व क्षत्रिय यांच्या सभेमध्ये तो देवराज इंद्राप्रमाणें शोभूं लागला ॥ ५१ ॥ नंतर त्या युधिष्ठिर राजानें केलेल्या सत्काराचा स्वीकार करून देव, मनुष्य, प्रमथगण इत्यादि सर्वजण आनंदानें श्रीकृष्णाची व त्या राजसूय यज्ञाची प्रशंसा करीत आपआपल्या स्थानीं निघून गेले ॥ ५२ ॥ त्यांत कुरुकुलाला जडलेला रोगच असा कलिपुरुष दुर्योधन मात्र अपवाद होता. पांडुपुत्र युधिष्ठिराचें तें वाढलेलें वैभव पाहून त्याला मात्र तें सहन झालें नाहीं ॥ ५३ ॥ राजा, जो कोणी शिशुपालवधरूपी हा श्रीकृष्णाचा पराक्रम, तशीच त्यानें केलेली राजांची सुटका व राजसूय यज्ञाची पूर्णता, यांचें वृत्त गाईल तो सर्व पापांपासून मुक्त होईल ॥ ५४ ॥

**चौऱ्याहत्तरावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय ७५ वा

परीक्षित् राजा शुकाचार्यांना म्हणतो, 'हे मुने, राजसूय यज्ञाच्या निमित्तानें दृष्टीस पडलेलें तें युधिष्ठिराचें मोठें वैभव पाहून तेथें जमलेले देव, मनुष्यें इत्यादि सर्वांना आनंद झाला ॥ १ ॥ दुर्योधनाशिवाय सर्व राजे, ऋषि व देव या सर्वांना त्यामुळें बरें वाटलें असें तुम्हीं सांगितले तें मीं ऐकिलें; पण हे मुने, दुर्योधनाला त्याविषयीं विषाद कां वाटला याचें कारण काय तें कृपा करून सांगा' ॥ २ ॥

शुकाचार्य म्हणाले, 'हे राजा, तुझा आजोबा जो महात्मा युधिष्ठिर त्याचा राजसूय यज्ञ चालला असतां जमलेल्या लोकांचें आदरातिथ्य करण्याच्या कामीं प्रेमबद्ध अशा आपल्या बांधवांचीच योजना त्यानें केलेली होती ॥ ३ ॥ भीमाला स्वयंपाकाच्या कामावर अध्यक्ष नेमिलें होतें, दुर्योधनाकडे भांडाररक्षणाचें काम सोंपविलें होतें, लोकांचें स्वागत करण्याकडे सहदेवाची योजना होती व सामग्री जमविण्याचें काम नकुलाला सांगितलें होतें ॥ ४ ॥ वडील माणसांची शुश्रूषा अर्जुनाला सांगितली होती व पाय धुण्याचें काम कृष्णाकडे दिलें होतें. द्रौपदीची नेमणूक वाढण्याच्या कामीं केली होती व उदार मनाच्या कर्णाला दानें देण्याच्या कामावर योजिलें होतें ॥ ५ ॥ त्याचप्रमाणें युयुधान, विकर्ण, हार्दिक्य, विदुर, बाल्हीकाचे भूरि आदिकरून पुत्र, तसेंच संतर्दन इत्यादिकांना त्या राजसूय यज्ञामध्यें निरनिराळ्या कामांवर नेमिलें होतें. हे परीक्षित् राजा, ते सर्वजण युधिष्ठिराच्या मनाप्रमाणें मन:पूर्वक वागत होते ॥ ६ ७ ॥ अशा त्या यज्ञांत पुरोहित, सभासद, विद्वान् पुरुष व प्रेमळ स्नेही यांचीं गोड भाषणें, आहेर व दक्षिणा यांनीं पूजा झाल्यावर आणि शिशुपाल श्रीकृष्णाच्या चरणीं लीन होऊन गेल्यावर पांडवांनीं गंगानदींत अवभृथ स्नान केलें ॥ ८ ॥ त्यांचा तो अवभृथस्नानाचा समारंभ चालला असतां मृदंग, शंख, पणव, धुंधुरि, आनक, गोमुख इत्यादि चित्रविचित्र वाद्यें वाजत होतीं, नाचणाऱ्या स्त्रिया आनंदानें नाचत होत्या व गायकांचे ताफे गात होते. त्यांचीं वीणा, वेणु, ताल इत्यादि वाद्यें वाजत असून त्यांचा नाद आकाशाला जाऊन भिडत होता ॥ ९ ॥ १० ॥ ज्यांत यजमान युधिष्ठिर अग्रस्थानीं आहे आणि यादव, सृंजय, कांबोज, कौरव, कैकय व कोसल हे राजे ज्यांत प्रमुखत्वानें आहेत, असे सोन्याचे अलंकार धारण केलेले राजे, तसेंच अलंकारांनीं मंडित असलेले योद्धे, ज्यांवर चित्रविचित्र पताका व ध्वज चढविले आहेत असे मोठमोठे हत्ती, रथ, घोडे यांसह नगराबाहेर निघाले, त्या वेळीं त्यांच्या सैन्यभारानें पृथ्वी कंपायमान झाली होती ॥ ११ ॥ १२ ॥ वाटेंत सभासद, पुरोहित व उत्तम उत्तम ब्राह्मण यांचा मोठा वेदघोष चालला होता व देव, ऋषि, पितर व गंधर्व हे फुलांचा वर्षाव करून युधिष्ठिराची स्तुति करीत होते ॥ १३ ॥ उट्या लावून व माळा, अलंकार वस्त्रें लेवून नटलेलीं स्त्री-पुरुषें एकमेकांना उट्यांचा लेप देत व एकमेकांवर निरनिराळ्या रंगांचें पाणी शिंपीत विहार

करीत होतीं ॥ १४ ॥ पुरुषांनीं वेश्यांना तेल, दूध, दहीं, उटण्या, हळद व केशराचें पाणी यांचा लेप केला व त्यांनींही उलट त्या पुरुषांना तसाच लेप केला आणि अशा रीतीनें उभयतां क्रीडा करूं लागलीं ॥ १५ ॥ त्या वेळीं तो उत्सव पाहण्याकरितां जशा देवांगना उत्तम विमानांत बसून आल्या होत्या, तशाच राजस्त्रियाहि—रक्षणासाठीं सेवक समागमें घेऊन नगराबाहेर नदीकांठीं आल्या होत्या. त्या राजस्त्रिया तेथें गेल्यावर त्यांचीं मामेभावंडें व मैत्रिणी यांनीं त्यांच्यावर पाणी उडवून त्यांस भिजविलें असतां सलज्ज हास्यानें त्यांचीं मुखकमलें फारच शोभूं लागलीं ॥ १६ ॥ आणि त्या राजस्त्रियाही आपले दीर व मित्र यांच्यावर भांड्यांनीं पाणी शिंपूं लागल्या. त्यांचीं स्वतःचीं वस्त्रें भिजून गेल्यामुळें त्यांचे अवयव, स्तन, मांड्या व कमरेचे भाग स्पष्ट दिसूं लागले. त्या गडबडींत त्यांच्या वेण्या सुटल्या व त्यांतून फुलें गळूं लागलीं आणि त्यांचे ते मनोहर विहार पाहून कामी पुरुषांच्या मनाची मोठी चलबिचल उडाली ! ॥ १७ ॥ सार्वभौम युधिष्ठिर उत्तम घोडे जोडलेल्या व सोन्यानें मढविलेल्या रथांत बसून आपल्या स्त्रियांसह चालला असतां, राजसूय यज्ञ ज्याप्रमाणें आपल्या प्रयाज, अनुयाज इत्यादि अंगांनीं शोभतो तसा शोभत होता ॥ १८ ॥ असो. ऋत्विजांनीं पत्नीसंयाज व अवभृथस्नानविषयक विधि युधिष्ठिराकडून करविल्यावर गंगेमध्यें आचमन करवून त्याला द्रौपदीसह स्नान घातलें ॥ १९ ॥ त्या वेळीं आकाशांत देवांच्या दुंदुभि वाजूं लागल्या व पृथ्वीवर माणसांचे चौघडे वाजूं लागले. देव, ऋषि, पितर, मनुष्य यांनीं युधिष्ठिरावर फुलें उधळलीं ॥ २० ॥ युधिष्ठिराचें स्नान झाल्यावर ब्राह्मण—क्षत्रियादि चारी वर्णांच्या व ब्रह्मचर्यगृहस्थादि चारी आश्रमांच्या सर्व लोकांनीं तेथें स्नान केलें. कारण अशा ठिकाणीं स्नान केल्यानें महापातकी मनुष्यही सर्व पापांपासून मुक्त होतो ॥ २१ ॥ नंतर राजा युधिष्ठिरानें स्वतः नवीन रेशमी वस्त्रें परिधान करून अलंकार धारण केले आणि पुरोहित, सभासद, ब्राह्मण इत्यादिकांना वस्त्रें व अलंकार देऊन त्यांची बोळवण केली ॥ २२ ॥ सर्व नारायणस्वरूपीच आहेत असें मानणाऱ्या त्या धर्मराजानें, बांधव व संबंधी राजे, त्याचप्रमाणें मित्र व स्नेही अशा सर्वांचा वारंवार सत्कार केला ॥ २३ ॥ त्या वेळीं तेथें सर्वच पुरुषांच्या अंगांवर रत्नांचीं कुंडलें, माळा, शिरस्त्राणें, कवचें, रेशमीं वस्त्रें व मूल्यवान् हार असल्यामुळें ते सगळे देवांसारखे तेजस्वी दिसूं लागले आणि कानांतील कुंडलें, व मस्तकावरील कुरळे केंस यामुळें ज्यांच्या मुखांस शोभा आली आहे अशा स्त्रिया, सोन्याच्या कमरपट्ट्यानें अधिकच खुलत होत्या ॥ २४ ॥ असो. हे परीक्षित् राजा, अशा रीतीनें यज्ञ समाप्त झाल्यावर महाशीलवान् पुरोहित, तत्ववेत्ते सभासद, ब्राह्मणादि चारी वर्णांचे इतर लोक, निमंत्रणावरून आलेले राजे, तसेंच देव, ऋषि, पितर, भूतें, आणि आपआपल्या अनुयायांसह इंद्रादि लोकपाल हे सर्व युधिष्ठिराच्या अनुज्ञेनें आपापल्या स्थानीं निघून गेले ॥ २६ ॥ वाटेनें जात असतां ते, श्रीकृष्णभक्त अशा त्या राजर्षि युधिष्ठिराच्या राजसूयाच्या वैभवाची प्रशंसा करीत होते. मरणशील प्राण्याला अमृत मिळालें असतां तें कितीहि प्याल्यानें जशी त्याची तृप्ति होत नाहीं, तशी त्या प्रशंसेनें त्यांची तृप्ति झाली नाहीं ॥ २७ ॥ याप्रमाणें मंडळी

आपआपल्या घरीं जाऊं लागली असतां, आपल्याला प्रिय बांधवांचा—विशेषत: कृष्णाचा-विरह होणार म्हणून धर्माला वाईट वाटलें व त्यानें श्रीकृष्णासहित कित्येकांना आणखी कांहीं दिवस राहून घेतलें ॥ २८ ॥ हे परीक्षित् राजा, श्रीकृष्णहि धर्मराजाच्या मनासारखें करावें म्हणून कांहीं दिवस तेथें राहिला आणि सांब आदिकरून यादवांना त्यानें पुढें पाठवून दिलें ॥२९॥ याप्रमाणें श्रीकृष्णाचें साहाय्य मिळाल्यामुळें यमधर्माचा पुत्र असा तो युधिष्ठिर, मनांत असलेली अत्यंत कठीण अशी गोष्टहि करण्यास समर्थ होऊन निश्चित झाला ॥ ३० ॥ असो. एकदां असें घडलें कीं, श्रीकृष्णावर आसक्तचित्त झालेल्या युधिष्ठिराचा राजसूय यज्ञ चालला असतां त्याच्या अंत:पुरांतील वैभव व यज्ञसमारंभाचा प्रचंडपणा पाहून दुर्योधनाच्या मनांत मत्सर उत्पन्न झाल्यामुळें तो दु:खी झाला ॥ ३१ ॥ त्या अंत:पुरामध्यें मनुष्यलोकींचे राजे, दैत्यांचे राजे व देवांचे राजे यांना प्राप्त होणारें नानाविध वैभव मयासुराच्या कल्पकतेमुळें सर्वत्र चमकत होतें, व त्या वैभवसंपन्न परिस्थितींत द्रुपदकन्या राणी द्रौपदी आपल्या पतींची सेवा करीत असे. अशा त्या द्रौपदीकडे दुर्योधनाची दृष्टि गेली व तिच्यावर त्याचें मन अत्यंत आसक्त होऊन तो कष्टी झाला ॥ ३२ ॥ राजसूय यज्ञाचा समारंभ चालला असतां त्या अंत:पुरांत श्रीकृष्णाच्या सहस्रावधि स्त्रिया गजगतीनें मिरवत असतां त्यांच्या पायांतील नूपुरांचा रुणझुण ध्वनि ऐकूं येत होता. त्या स्त्रिया सर्वांगसुंदर असून त्यांच्या स्तनांवरील केशराच्या उटींमुळें त्यांच्या गळ्यांतील हार रक्तवर्ण दिसत व कानांतील एकसारखीं हलणारीं कुंडलें व मस्तकावरील कुरळे केश यांनीं युक्त असलेलीं त्यांचीं मुखकमलें फारच रमणीय दिसत ॥३३॥ मयासुरानें रचिलेल्या त्या युधिष्ठिराच्या सभागृहामध्यें चक्रवर्ति युधिष्ठिर एक दिवस बसला असतां त्याचे धाकटे भाऊ आणि इतर बांधव जवळ बसले होते व कृष्णानेंहि कृपादृष्टीचें छत्र त्याच्यावर धरिलें होतें ॥ ३४ ॥ अशा थाटांत मूर्तिमान इंद्राप्रमाणें युधिष्ठिर सुवर्णाच्या सिंहासनावर बसला असतां त्याचें सार्वभौम वैभव खुलून दिसत होतें, आणि जवळ उभे राहिलेले भाट तदनुरूप त्याचें वर्णन करीत होते ॥३५॥ इतक्यांत अभिमानी असा दुर्योधन राजा, ज्यानें मस्तकावर मुकुट धारण करून हातांत तरवार घेतली आहे असा, रागानें द्वारपाळांना वेडेवांकडे शब्द बोलत आपल्या भावांसह तेथें आला ॥ ३६ ॥ त्या ठिकाणीं मयासुराच्या कौशल्यामुळें असा चमत्कार घडला कीं, दुर्योधन आंत येऊन चालूं लागला असतां भूमीच्या ठिकाणीं त्याला पाणी आहे असें वाटलें व त्यामुळें आपल्या वस्त्राचे ओंचे वर उचलून तो जो चालूं लागला, तों भूमीला अडखळून खालीं पडला आणि जेथें खरोखर पाणी होतें तेथें गेला असतां पाण्याच्या ठिकाणीं त्याला भूमि आहे असें वाटून सहज चालूं लागला असतां तेथेंहि पुन: पडला ! ॥ ३७ ॥ तो प्रकार पाहतांच भीमाला हसूं आलें व स्त्रिया आणि इतर राजे यांनाही हसूं आलें. हे परीक्षित् राजा, युधिष्ठिरानें त्यांचा निषेध केला असतांहि कृष्णानें अनुमोदन दिल्यामुळें त्यांनीं आपलें हसें दाबिलें नाहीं ॥ ३८ ॥ तेव्हां दुर्योधनानें लाजेनें मान खालीं घातली व रागानें जळफळत तो तसाच

त्या सभेंतून बाहेर पडून कांहीं न बोलतां हस्तिनापुरास चालता झाला. त्या वेळीं विचारी लोकाच्या तोंडून ' हाय ! हाय, आतां कांहीं तरी घात होणार ! ' असे शब्द मोठ्यानें निघाले व युधिष्ठिराच्याहि मनाला धक्का बसला; पण ज्याच्या दृष्टिमात्रानें हें संचारचक्र फिरत आहे त्या भगवान् श्रीकृष्णाच्या मनांतून पृथ्वीचा भार नष्ट करावयाचा असल्यामुळें तो मात्र शांत राहिला ॥ ३९ ॥ शुकाचार्य म्हणतात, हे परीक्षित् राजा, राजसूय यज्ञामध्यें दुर्योधनाचा दुष्टपणा कसा प्रकट झाला म्हणून जें तूं मला विचारलेंस त्याचें हें उत्तर आतां मीं तुला सांगितलें ॥ ४० ॥

## पंचाहत्तरावा अध्याय समाप्त

# अध्याय ७६ वा

शुकाचार्य म्हणतात, हे परीक्षित् राजा, श्रीकृष्णाचा आणखीहि एक अद्‍भुत पराक्रम तुला सांगतों तो ऐक. हा पराक्रम करून लीलेसाठीं मनुष्यरूप धारण केलेल्या त्या भगवंतानें सौभनामक विमानाचा स्वामी जो शाल्व त्याचा वध केला ॥ १ ॥ हा शाल्व राजा शिशुपालाचा मित्र असून रुक्मिणीच्या विवाहाला आलेला होता. त्या वेळीं त्याचा व जरासंधादिकांचा यादवांनीं युद्धांत पाडाव केला होता ॥ २ ॥ त्या वेळीं सर्व यादवांच्या समक्ष त्या शाल्वानें अशी प्रतिज्ञा केली कीं, ' मी पृथ्वी निर्यादव करणार ! माझा पराक्रम पाहा ! ' ॥३॥ याप्रमाणें प्रतिज्ञा केल्यावर त्या मूर्खानें भगवान् शंकराची आराधना केली. हे परीक्षित् राजा, ती आराधना करितांना तो केवळ मूठभर पीठ मात्र प्रतिदिवशीं एकदां खात असे ॥ ४ ॥ भगवान् शंकर हा लवकर संतुष्ट होणारा असल्यामुळें एका वर्षांतच तो शाल्वाला प्रसन्न झाला आणि शरण आलेल्या त्या शाल्वास त्यानें वाटेल तो वर मागून घेण्यास सांगितलें ॥ ५ ॥ त्या वेळीं आपल्या इच्छेनुसार जाणारें व देव, असुर, मनुष्यें, गंधर्व, सर्प किंवा राक्षस यांतील कोणाकडूनहि भंग न होणारें आणि यादवांना त्यापासून भीति उत्पन्न करणारें असें विमान शाल्वानें त्याजपाशीं मागितलें. ॥ ६ ॥ भगवान् शंकरानें ' ठीक आहे ' असें म्हटलें व शत्रूंचीं नगरें जिंकणाऱ्या मयासुराला आज्ञा करून त्याच्याकडून लोखंडाचें सौभ नांवाचें विमान करविलें व तें शाल्वाला दिलें ॥ ७ ॥ इतरांना दुष्प्राप्य असून काळोखाचें माहेरघर असलेलें तें विमान मिळाल्यावर तो शाल्व, यादवांनीं आपल्याशीं केलेल्या वैराची आठवण करीत द्वारकानगरीवर गेला ॥ ८ ॥ हे परीक्षित् राजा, आपलें मोठें सैन्य घेऊन शाल्वानें द्वारकानगरीला वेढा दिल्यावर तेथील उपवनें, क्रीडावनें इत्यादिकांचा सर्वतोपरि नाश केला ॥ ९ ॥ तसेंच नगरीच्या वेशी, दारें, वाडे, माड्या व त्यांच्या भिंती हीं देखील त्यानें मोडून टाकिलीं ! त्याच्या त्या मोठ्या विमानांतून अस्त्रांचा, तसेंच पाषाण, वृक्ष, सर्प, गारा इत्यादींचा वर्षाव सारखा होऊं लागला ॥ १० ॥ त्यायोगें विजेच्या कडकडाटासारखी वावटळ होऊन ती कृष्णाची द्वारकापुरी त्रस्त झाली. त्रिपुरासुरानें पृथ्वीला गांजिलें असतां, जसें तिला झालें होतें, तसेंच या वेळीं द्वारकानगरीला झालें ॥ ११ ॥ १२ ॥ सौभ विमानानें आपल्या लोकांस त्रस्त केलेलें पाहतांच कीर्तिवान् वीर भगवान् प्रद्युम्न रथांत बसून पुढें झाला आणि ' भिऊं नका ! ' असें म्हणून त्यांना त्यानें आश्वासन दिलें ॥ १३ ॥ त्याच्या मागोमाग सात्यकि, चारुदेष्ण, सांब, अक्रूर व त्याचे धाकटे बंधु, हार्दिक्य, भानुविन्द, गद, शुक, सारण, तसेंच दुसरे मोठे वीरांचे नायक आपलीं मोठमोठीं धनुष्यें घेऊन व अंगांत चिलखतें घालून आणि आपल्या रक्षणासाठीं रथ, हत्ती, घोडे व पायदळ असें चतुरंग सैन्य बरोबर घेऊन निघाले ॥ १४ ॥ १५ ॥ त्याप्रसंगीं देव आणि दैत्य यांमधील युद्ध

ज्याप्रमाणें मोठें भयंकर व अंगावर शहारे आणणारें होतें, त्याप्रमाणेंच हें शाल्व आणि यादव यांचें युद्धहि महाभयंकर असें चालू झालें ॥ १६ ॥ युद्ध चालू होतांच, सूर्याच्या किरणांनीं रात्रीच्या काळोखाचा जसा नाश करावा, त्याप्रमाणें प्रद्युम्नानें आपल्या तेजस्वी अस्त्रांनीं सौभपति शाल्वाच्या सर्व युक्ति–प्रयुक्तींचा नाश केला ॥ १७ ॥ त्यानें सपाट पेराचे, सोन्याच्या दांड्यांचे व लोखंडी पात्यांचे असे पंचवीस बाण टाकून शाल्वाच्या ध्वजरक्षकाला विद्ध केलें ॥ १८ ॥ प्रत्यक्ष शाल्वावर त्यानें शंभर बाणांचा मारा केला व त्याच्या सैनिकांना एकेका बाणानें घायाळ केलें. शाल्वाच्या सारथ्यावर त्यानें दहा दहा बाण मारिले व घोड्यांना तर प्रत्येकीं तीन तीन बाणांनीं चीत केलें ॥ १९ ॥ महात्मा प्रद्युम्नाचा तो अद्‌भुत पराक्रम पाहून दोन्ही सैन्यांतील वीर त्याची प्रशंसा करूं लागले ॥ २० ॥ पण शाल्वाचें तें सौभ विमान मोठें अद्‌भुत होतें. केव्हां त्याचीं अनेक रूपें दिसत तर केव्हां एकच दिसे ! तसेंच तें केव्हां केव्हां दिसे, तर केव्हां केव्हां अगदींच दिसेनासें होई ! ! असें तें मयानें अत्यंत कुशलतेनें केलेलें विमान शत्रूंना आपला कांहींच ठावठिकाणा लागू देत नसे ॥ २१ ॥ तें एखादे वेळीं अगदीं भूमीवर येई, तर पुन: आकाशांत उंच जाई. केव्हां पर्वताच्या शिखरावर दिसे, तर केव्हां पाण्यांत गेलेंसें वाटे. असें तें सौभ विमान गरगर फिरणाऱ्या कोलिताप्रमाणें फिरत होतें. एका ठिकाणीं कधींच स्थिर राहात नसे ॥ २२ ॥ तथापि आपल्या सैनिकांसह सौभ विमानांत बसलेला तो शाल्व यादववीरांना जेथें जेथें दिसे, तेथें तेथें ते त्याजवर बाणांचा मारा करीत ॥ २३ ॥ त्यांचे ते बाण अग्नीच्या किंवा सूर्याच्या तेजासारखे कडक होते व त्यांचा मारा सर्पाच्या चाव्याप्रमाणें तीव्र होता. असे ते बाण शत्रूंकडून येऊन आपल्या विमानाला व सैनिकांना त्रस्त करून सोडीत आहेत असें पाहून शाल्वाला पुढें काय करावें हें समजेना ॥ २४ ॥ उलट शाल्वाच्या सैनिकांनीं केलेल्या शस्त्रांच्या माऱ्यानें यादवहि अगदीं जर्जर झाले; पण इहपर दोन्ही लोक जिंकण्याच्या ईर्षेमुळें ते आपआपली रणांगणांतील जागा मात्र सोडून गेले नाहींत ॥ २५ ॥ शाल्वाचा एक द्युमान् नांवाचा बलाढ्य अमात्य–ज्याला पूर्वी प्रद्युम्नानें वेगानें प्रहार केला होता–त्यानें हातांत लोखंडी गदा घेऊन प्रद्युम्नावर प्रहार केला आणि मोठ्यानें गर्जना केली ॥ २६ ॥ प्रद्युम्न शत्रूला चीत करणारा खरा; पण त्या गदेच्या प्रहारानें त्याचें वक्ष:स्थळ जर्जर झालें. तेव्हां कृष्णाच्या दारुक नामक सारथ्याचा पुत्र जो त्याचा सारथी होता, त्यानें काळवेळ पाहून योग्य तें करावें या बुद्धीनें प्रद्युम्नाला रणांगणांतून दूर नेलें ॥ २७ ॥ थोड्या वेळानें प्रद्युम्न सावध झाला आणि सूताला म्हणाला, ' हे सूता, तूं मला रणांगणांतून दूर आणिलेंस ही मोठी वाईट गोष्ट केलीस ॥ २८ ॥ यदूंच्या कुळांत उत्पन्न झालेला आणि रणांतून पळून गेलेला असा कोणी वीर आजवर ऐकण्यांत नव्हता; पण भ्याड मनाच्या सारथ्यानें माझ्यावर तसला पापी प्रसंग आणिला आणि मी मात्र त्याला अपवाद झालों ! ॥ २९ ॥ माझा पिता श्रीकृष्ण आणि चुलता बळराम, हे मला भेटले म्हणजे मला युद्धाची वार्ता विचारतील त्या वेळीं मला शोभेल असें मीं त्यांना काय सांगूं ? मीं रणांगणांतून सुखरूप पळून आलों असें सांगूं काय ! ॥ ३० ॥ माझ्या भावजया मला हंसतील आणि माझ्या

भ्याडपणाचें वर्णन करून 'अहो पराक्रमी भावोजी, शत्रूंशीं युद्ध करीत असतां आणखी काय काय झालें तें आम्हांला सांगाल काय ?' म्हणून विचारतील' ॥ ३१ ॥

प्रद्युम्नाचें भाषण ऐकून सारथ्यानें उत्तर केलें, 'बालमहाराज, प्रसंगाला काय करणें उचित आहे हें जाणूनच मीं तुम्हांला रणांगणांतून दूर आणण्याचें हें कृत्य केलें आहे. कारण योद्धा जर संकटग्रस्त झाला, तर सारथ्यानें त्याला सांभाळावें व सारथ्यावर प्रसंग आला तर योद्ध्यानें त्याचें रक्षण करावें, असा धर्मच आहे ॥ ३२ ॥ हा धर्म मला ठाऊक असल्यामुळें शत्रूच्या गदेचा प्रहार होऊन तुम्ही पीडित झालां व तुम्हांला मूर्च्छा आली आहे हें पाहतांच मी तुम्हांला रणांगणांतून दूर घेऊन आलों ॥ ३३ ॥

**शहात्तरावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय ७७ वा

शुकाचार्य म्हणतात, हे परीक्षितू राजा, सारथ्याचें भाषण ऐकल्यावर जलसिंचनानें सावध झालेला तो प्रद्युम्न, चिलखत घालून व हातांत धनुष्य घेऊन सारथ्याला म्हणाला, ' हे सूता, आतां मला त्या पराक्रमी द्युमानाच्या जवळ घेऊन चल ! ' ॥ १ ॥ त्याप्रमाणें सूतानें त्याला द्युमानाजवळ नेलें असतां, तो द्युमान् यादवसैन्याचा धुव्वा उडवीत आहे असें त्याच्या दृष्टीस पडलें ! तेव्हां त्या प्रद्युम्नानें त्याला प्रतिबंध करून उलट त्याच्यावर हंसत हंसत आठ बाणांचा मारा केला ॥ २ ॥ चार बाण मारून त्यानें द्युमानाच्या चारहि घोड्यांना चीत केलें व एका बाणानें त्याच्या सारथ्याला घायाळ केलें. नंतर दोन बाण मारून त्यानें द्युमानाचें धनुष्य व ध्वज हीं छेदिलीं व आणखी एक बाण मारून त्याचें शिर विद्ध केलें ! ॥ ३ ॥ इकडे गद, सात्यकि, सांब इत्यादि यादवांनीं शाल्वाच्या सैन्याचा फडशा पाडण्याचें काम चालविलें. त्यांच्या माऱ्यानें सौभ विमानांतील सारे सैनिक माना तुटून समुद्रांत पडले ! ॥ ४ ॥ याप्रमाणें यादव व शाल्व यांचीं सैन्यें एकमेकांवर मारा करीत असतां त्यांचें तें महाभयंकर युद्ध सत्तावीस दिवस चाललें होतें ॥ ५ ॥ असो. यात्र प्रसंगीं युधिष्ठिराच्या बोलावण्यावरून श्रीकृष्ण इंद्रप्रस्थाला गेलेला होता. तेथें त्यानें धर्मराजाचा राजसूय पूर्ण करून दिला व त्या प्रसंगानें शिशुपालाचा बध केला ॥ ६ ॥ आणि नंतर कुरुघराण्यांतील वृद्ध माणसें, ऋषि, पांडव व कुंती यांचा निरोप घेऊन तो द्वारकेस जावयास निघाला. त्या वेळीं द्वारकेत पोंचेपर्यंत त्यास मार्गांत अनेक दुश्चिन्हें दिसलीं ॥ ७ ॥ 'मी बळरामदादांसह येथें आलों खरा; पण तिकडे शिशुपालाचे पक्षपाती राजे माझ्या द्वारकानगरीचा कदाचित् नाश करितील ' असे विचार त्याच्या मनांत घोळूं लागले ॥ ८ ॥ द्वारकेस येतांच आपल्या लोकांचा होत असलेला नाश त्याच्या दृष्टीस पडला. तेव्हां बळरामाला नगराचें रक्षण करण्यास ठेवून तो युद्धभूमीकडे वळला, तों सौभ विमानांत बसलेला शाल्व त्याच्या दृष्टीस पडला. त्याला पाहतांच श्रीकृष्ण दारुक सारथ्याला म्हणाला ॥ ९ ॥ दारुका, माझा रथ शाल्वाच्या जवळ नेऊन लवकर उभा कर ! तुला घाबरण्याचें कांहीं कारण नाहीं. हा सारा त्या शाल्वाच्या मायावी विद्येचा खेळ आहे ' ॥ १० ॥ अशी आज्ञा होतांच दारुकानें रथांत बसून घोडे हांकिले. रथ रणांगणीं येतांच, त्यावरील गरुडाचें चिन्ह दोन्ही पक्षांतील सैन्यांच्या दृष्टीस पडलें ॥ ११ ॥ या वेळीं शाल्वाचें बहुतेक सैन्य नष्ट होऊन त्याचे सेनापतीहि मरून गेले होते. अशा स्थितींत कृष्ण आपल्यावर चालून येतो आहे असें पाहतांच, शाल्वानें भयंकर शब्द करणारी अशा आपली मोठी शक्ति दारुकावर फेंकिली ॥ १२ ॥ आकाशांत जशी तुटलेली तारका चमकावी, त्याप्रमाणें ती शक्ति सर्व दिशा प्रकाशित करीत मोठ्या वेगानें चाल करून येऊं लागली असतां कृष्णानें तिच्यावर बाण टाकून तिचे शेंकडों तुकडे तुकडे करून टाकिले ॥ १३ ॥ नंतर श्रीकृष्णानें

सोळा बाण टाकून आकाशांत भ्रमण करणाऱ्या त्या सौभ विमानाचा विध्वंस केला आणि अगणित बाणांचा वर्षाव करून सूर्य जसा आपल्या किरणांनीं आकाश व्यापून टाकितो, त्याप्रमाणें कृष्णानें त्या शाल्वाला बाणांनीं सर्व बाजूंनीं विद्ध केलें ॥ १४ ॥ तेव्हां शाल्वानें श्रीकृष्णाच्या ज्या हातात शार्ङ्ग धनुष्य होतें तो त्याचा हात विद्ध केला. त्याबरोबर श्रीकृष्णाच्या त्या हातांतील शार्ङ्ग धनुष्य खालीं पडलें ! ॥ १५ ॥ हा अपूर्व आश्चर्यजनक प्रकार पाहून सर्वांनीं मोठा हाहाःकार केला आणि शाल्व मोठी गर्जना करून श्रीकृष्णाला उद्देशून बोलूं लागला ॥ १६ ॥ तो म्हणाला, ‘ हे मूर्खा कृष्णा, आम्ही पाहत असतां आमच्या देखत आमचा मित्र व तुझा आतेभाऊ असा जो शिशुपाल त्याची पत्नी तूं हरण केलीस आणि भरसभेमध्यें उन्मत्तपणानें त्या माझ्या मित्राचा तूं वध केलास ॥ १७ ॥ तूं आपल्याला अजिंक्य समजतोस; पण आज जर तूं माझ्यापुढें उभा राहिलास, तर माझ्या तीक्ष्ण बाणांनीं मीं तुला जगांतून नाहींसा करून टाकीन ! ’ ॥ १८ ॥

शाल्वाचे शब्द ऐकून श्रीकृष्णानें उत्तर केलें, ‘ अरे मूर्खा शाल्वा, तुझा मृत्यु तुझ्याजवळ उभा आहे हें तुला दिसत नाहीं ! तूं व्यर्थ वल्गना करीत आहेस ! अरे, जे शूर असतात ते आपला पराक्रम प्रत्यक्षच करून दाखवितात. पुष्कळ बडबड करीत सुटणाऱ्यांच्या हातून कांहींच घडत नाहीं ! ’ ॥ १९ ॥ असें बोलून क्रोधाविष्ट भगवान् श्रीकृष्णानें आपल्या भयंकर वेगाच्या गदेनें शाल्वाच्या खांद्यावर प्रहार केला. त्यासरसा तो शाल्व भडभड रक्त ओकत थरथर कांपूं लागला ! ॥ २० ॥ शाल्वाला ताडन करून श्रीकृष्णाची गदा परत आली, इतक्यांत शाल्व एकाएकीं गुप्त झाला आणि थोड्या वेळानें एक पुरुष श्रीकृष्णाजवळ आला. त्यानें मान वांकवून कृष्णाला नमस्कार केला आणि रडत रडत तो म्हणाला, ‘ महाराज, मला देवकीमातेनें पाठविलें आहे ॥ २१ ॥ तिचा निरोप असा आहे कीं, ‘ हे समर्थ कृष्णा, तूं ज्याच्यावर अत्यंत प्रेम करितोस असा तुझा पिता जो वसुदेव, त्याला खाटीक जसा पशूला बांधून नेतो त्याप्रमाणें शाल्वानें बांधून दूर नेलें ! ’ ॥ २२ ॥ ही अनिष्ट गोष्ट ऐकतांच, मनुष्यस्वभावाचा ज्यानें अंगीकार केला आहे असा तो श्रीकृष्ण पितृप्रेमानें विव्हल होत्साता एखाद्या सामान्य माणसाप्रमाणें खिन्न अंतःकरणानें बोलूं लागला ॥ २३ ॥ श्रीकृष्ण म्हणाला, ‘ अहो, अत्यंत सावधानपणानें कार्य करणारा, देव किंवा मानव यांनाहि ज्याला पराजय करणें शक्य नाहीं, अशा बळरामाला जिंकून, क्षुद्र असा शाल्व आमच्या पित्याला घेऊन गेला, तेव्हां प्रारब्धच एकूण बलवत्तर म्हणावयाचें ! ’ ॥ २४ ॥ श्रीकृष्ण असें बोलत आहे तों, प्रत्यक्ष वसुदेवासारखें हुवेहूब चित्र घेऊन शाल्व तेथें येऊन उभा राहिला आणि श्रीकृष्णाला म्हणाला ॥ २५ ॥ ‘ हे पोरकट कृष्णा, ज्याच्यावर विसंबून तूं जिवंत राहूं पाहातोस, तो हा तुला जन्म देणारा तुझा पिता पाहा. तुझ्या देखत मी आतां याला ठार करतों ! तुला सामर्थ्य असेल तर कर याचें रक्षण ! ’ ॥ २६ ॥ अशी कृष्णाची निंदा करून त्या मायावी शाल्वानें त्या वसुदेवाच्या आकृतीचें मस्तक तरवारीनें छेदिलें आणि तें घेऊन तो आकाशांत

असलेल्या आपल्या विमानांत जाऊन बसला ॥ २७ ॥ महात्मा श्रीकृष्ण वस्तुतः आत्मज्ञानस्वरूपी असतांहि, आपल्या आप्तेष्टांच्या संगतीला अनुसरून पित्याचे वधामुळें घटकाभर दुःखमग्न झाला; पण ती सारी मयासुराच्या शिकवणीवरून शाल्वानें पसरलेली माया आहे, असें लवकरच त्याला कळून आलें ॥ २८ ॥ हें ज्ञान होतांच, देवकीचा निरोप घेऊन म्हणून आलेला तो दूत, तसेंच वसुदेवाचें म्हणून दाखविलेलें तें मृत शरीर, हीं त्या रणभूमीवर अर्थातच दिसेनाशीं झालीं आणि पूर्वी पाहिलेला प्रकार केवळ स्वप्नासारखा वाटला. इतक्यांत आकाशांतून सौभ विमानांतून फिरणारा तो शाल्व त्याच्या दृष्टीस पडला. त्यास पाहतांच श्रीकृष्ण त्याला ठार मारावयास उद्युक्त झाला ॥ २९ ॥ शुकाचार्य म्हणतात, हे राजा, ही जी गोष्ट मीं आतां तुला सांगितली तशी ती कित्येक ऋषींनीं पूर्वापार संबंध लक्षांत न आणितां सांगितलेली आहे. आपण पूर्वी जें सांगितलें त्याच्या विरुद्ध ही गोष्ट आहे हें त्यांच्या लक्षांत आलें नाहीं * ॥ ३० ॥ कारण असें पाहा कीं, अज्ञ मनुष्याच्याच मनांत उत्पन्न होणारे जे शोक, मोह, प्रेम इत्यादि विकार ते कोणीकडे आणि अखंड अशा ज्ञानविज्ञानाचें ऐश्वर्य भोगणारा सनातनस्वरूपी श्रीकृष्ण कोणीकडे ? ॥ ३१ ॥ अनादि अशा आत्म्यासंबंधाच्या विपरीत समजुती, ज्या श्रीकृष्णाच्या पायांची सेवा केल्यानें प्राप्त होणाऱ्या आत्मज्ञानामुळें नष्ट करतां येतात व अनंत असें परमात्मपद व परमेश्वरी ऐश्वर्य प्राप्त करून घेतां येतें, त्या सज्जनांचा आश्रयभूत अशा परमात्म्या श्रीकृष्णाला मोह उत्पन्न झाला हें म्हणणें कसें जुळेल ? ॥ ३२ ॥ असो. शाल्व आपल्या अंगावर नाना शस्त्रास्त्रें घेऊन चाल करून येत आहे असें पाहतांच, ज्याचा पराक्रम कधींहि व्यर्थ जाणारा नाहीं अशा त्या श्रीकृष्णानें आपल्या बाणांनीं त्या शाल्वाचें चिलखत, धनुष्य व त्याच्या मस्तकावरील रत्न हीं विद्ध करून टाकिलीं आणि गदेनें त्या विमानाचें चूर्ण केलें. ॥ ३३ ॥ अशा रीतीनें श्रीकृष्णाच्या हातानें मारलेल्या गदेनें अगदीं चुरून गेलेलें तें सौभ विमान शेंकडों तुकडे होऊन पाण्यांत पडलें; तेव्हां शाल्व तें सोडून भूमीवर उतरला आणि आपली गदा उचलून तो श्रीकृष्णाच्या अंगावर धांवून गेला ॥ ३४ ॥ तो आपल्यावर चाल करून येत आहे असें पाहतांच कृष्णानें आपल्या भाल्यानें त्याचा गदा धरलेला हातच तोडून टाकिला आणि आपलें अद्भुत सामर्थ्याचें असें सुदर्शन चक्र शाल्वाचा वध करण्याकरितां वर उचलिलें. त्या वेळीं प्रलयकालीन सूर्याप्रमाणें तेजस्वी असें तें चक्र धारण करणारा श्रीकृष्ण, सूर्यबिंबानें युक्त अशा उदयगिरीप्रमाणें शोभला ॥ ३५ ॥ त्यानें सुदर्शन चक्राच्या योगानें, मोठ्या मायावी अशा त्या शाल्वाचें किरीटकुंडलांनीं युक्त असें मस्तक, पूर्वी इंद्रानें जसें वृत्रासुराचें शिर तोडिलें होतें, त्याप्रमाणें तोडिलें. त्याबरोबर 'वाहवा ! वाहवा !' असा साऱ्या लोकांत मोठा शब्द निघाला ॥ ३६ ॥ याप्रमाणें शाल्व

---

* हा विरोध म्हणजे कृष्णानें पूर्वी ८ व्या श्लोकांत म्हटल्याप्रमाणें तो इंद्रप्रस्थाला बळरामासह गेलाच नव्हता.

मरून पडला व त्याचें सौभ विमान गदेनें चूर्ण झालें असें पाहतांच आकाशांत देवगणांच्या दुंदुभि मोठ्यानें वाजूं लागल्या. हे परीक्षित् राजा, शाल्वाच्या मृत्यूचें हें वर्तमान जेव्हां दंतवक्राला कळलें, तेव्हां तो दंतवक्र आपल्या मित्राच्या उपकाराची फेड करण्याकरिता रागारागानें तेथें धांवतच आला ॥ ३७ ॥

## सत्त्याहत्तरावा अध्याय समाप्त

---

# अध्याय ७८ वा

शुकाचार्य म्हणतात, हे परीक्षित् राजा, शिशुपाल, शाल्व आणि पौड्रक हे मृत्युवश झाले असतां त्यांचा मित्र जो दुष्टबुद्धि दंतवक्र त्यानें त्यांचें परलोकसंबंधाचें कृत्य मित्रभावानें केलें ॥ १ ॥ नंतर तो एकटाच हातांत गदा घेऊन रागानें पायींच चालत रणभूमीवर आला. हे राजा, त्याच्या चालण्यामुळें भूमि हालूं लागली, इतका तो महाबलाढ्य होता ॥ २ ॥ अशा प्रकारचा तो दंतवक्र गदा घेऊन त्वरेनें आपल्यावर चाल करून येतो आहे असें जेव्हां कृष्णानें पाहिलें, तेव्हां तो तसाच रथांतून उतरला आणि समुद्राच्या लाटेला बांध जसा अटकाव करतो, तसा त्यानें त्या दंतवक्राला पुढें येण्याला प्रतिबंध केला ॥ ३ ॥ तेव्हां तो करुष देशाचा राजा दंतवक्र, आपली गदा उभारून मोठ्या गर्वानें श्रीकृष्णाला म्हणाला, ' अरे कृष्णा, आज तूं मोठ्या सुदैवानें माझ्या दृष्टीसमोर आला आहेस ॥ ४ ॥ कृष्णा, तूं आमचा मामेभाऊ असतांहि आमच्या मित्राचा वध केलास आणि आतां मलाहि मारूं पाहतो आहेस ! यास्तव, हे मूर्खा, या वज्रासारख्या गदेनें मी तुला ठार करितों ॥ ५ ॥ हे मूर्खा कृष्णा, असें करीन तरच माझ्या मित्रांच्या ऋणांतून मी मुक्त होईन ! तूं बंधु असलास तरी देहांतील रोगासारखा शत्रु असल्यामुळें तुझा वध होणेंच योग्य आहे ! ' ॥६॥ हत्तीला अंकुशांनीं टोंचावें त्याप्रमाणें कठोर शब्दांनीं कृष्णाची निंदा करून त्यानें श्रीकृष्णाच्या मस्तकावर गदेचा प्रहार केला आणि सिंहाप्रमाणें प्रचंड गर्जना केली ॥ ७ ॥ यादवकुलभूषण श्रीकृष्णाला तो तडाखा बसला; परंतु तो त्या रणभूमीवरून किंचित् देखील हालला नाहीं, तर उलट त्यानें दंतवक्राच्या छातीवर मधोमध आपल्या कौमोदकी गदेचा प्रहार केला ॥ ८ ॥ तो गदेचा तडाखा मिळतांच दंतवक्राचें हृदय फुटून गेलें व मुखांतून रक्त ओकत, केस, हात व पाय अस्ताव्यस्त पसरून तो पृथ्वीवर गतप्राण होऊन पडला ॥ ९ ॥ या वेळीं एक अत्यंत सूक्ष्म असें अद्भुत तेज त्याच्या शरिरांतून निघालें, व हे परीक्षित् राजा, पूर्वी शिशुपालाच्या वधप्रसंगीं जसें झालें, तसें आतांहि तें तेज सर्व लोकांसमक्ष श्रीकृष्णाच्या स्वरूपांत जाऊन मिळालें ॥ १० ॥ दंतवक्राचा वध झाल्यावर त्याचा भाऊ विदूरथ त्याच्या दुःखांत बुडून गेला आणि श्रीकृष्णाला मारण्यासाठीं ढाल-तरवार घेऊन धापा टाकीत रणभूमीवर आला ॥ ११ ॥ तो असा चाल करून येत आहे, तोंच, हे राजा, वस्तऱ्यासारख्या तीक्ष्ण धारेच्या सुदर्शन चक्रानें श्रीकृष्णानें त्याचें किरीटकुंडलांनीं युक्त असें मस्तक तोडून टाकिलें ! ॥ १२ ॥ याप्रमाणें सौभ विमानाचा नाश करून शाल्व, दंतवक्र व त्याचा भाऊ, तसेच दुसरे जे लोकांना असह्य झालेले दुष्ट पुरुष त्यांचा श्रीकृष्णानें वध केला असतां देव, मनुष्यें व इतरहि सर्व त्याची स्तुति करूं लागले ॥ १३ ॥ तसेंच ऋषि, सिद्ध, गंधर्व, विद्याधर, नागश्रेष्ठ, अप्सरा, पितृगण, यक्ष, किन्नर,

चारण हे श्रीकृष्णाचा पराक्रम गाऊन त्यावर फुलांचा वर्षाव करूं लागले. त्यांचा तो स्तुतिघोष चालला असतां यादववीरांनीं वेष्टिलेला असा तो श्रीकृष्ण शृंगारिलेल्या द्वारकानगरींत प्रविष्ट झाला ॥ १४ ॥ १५ ॥ याप्रमाणें योगेश्वर भगवान् श्रीकृष्ण विश्वाचा नियंता व नित्य जयशाली असतांहि अज्ञानी लोकांना तो पराजित झाला असें वाटतें ॥ १६ ॥ असो. यानंतर काहीं काळानें कौरवांचा व पांडवांचा युद्धप्रसंग उद्भवला तेव्हां आपण कोणत्याच पक्षाला मिळणें योग्य नाहीं असें ठरवून बळराम तीर्थयात्रा करण्याच्या निमितानें तेथून दूर निघून गेला ॥ १७ ॥ प्रथम तो प्रभास तीर्थास गेला आणि तेथें देव, ऋषि, पितर व मानव यांचें त्यानें तर्पण केलें. नंतर बरोबर असलेल्या ब्रह्मवृंदांच्या परिवारासह त्यानें सरस्वतीच्या उगमाकडच्या मार्गानें पुढें प्रयाण केलें ॥ १८॥ त्यानें पृथूदक, बिंदुसर, त्रितकूप, सुदर्शन, विशाल ब्रह्म व चक्र इत्यादि तीर्थें केलीं व सरस्वतीचें पूर्वतीर, तसेंच यमुना व गंगा यांच्या कांठांवर जीं तीर्थें होतीं त्यांचेंहि दर्शन घेतलें. हे परीक्षित् राजा, हीं तीर्थें केल्यावर ज्या ठिकाणीं नैमिषारण्यांत शौनकादि ऋषींनीं सत्र चालविलें होतें तेथें तो जाऊन पोंचला ॥ १९ ॥ २० ॥ तेथें दीर्घावधीच्या सत्रांत गुंतलेल्या त्या ऋषींना जेव्हां बळराम आल्याचें समजलें, तेव्हां त्यांनीं विधिपुरस्सर उभें राहून त्याला नमस्कार केला आणि अभिनंदनपूर्वक त्याची पूजाहि केली ॥ २१ ॥ त्याची व त्याच्या समागमें असलेल्या ब्राह्मणांची पूजा झाल्यावर, बळराम हा ऋषींनीं दिलेल्या आसनावर बसला असतां व्यासमहर्षींचा शिष्य रोमहर्षण हा तेथें बसलेला त्याच्या दृष्टीस पडला ॥ २२ ॥ बळराम तेथें गेला त्या वेळीं रोमहर्षण उठून उभा राहिला नाहीं व त्यानें नम्र होऊन बळरामाला नमस्कारहि केला नाहीं. इतकेंच नव्हे तर स्वत: सूत* जातीचा असतां तो ब्राह्मणांच्याहून उच्च आसनावर बसला आहे असें पाहून बळरामाला त्याचा राग आला ॥ २३ ॥ तो म्हणाला, 'हा प्रतिलोम विवाहापासून झालेला सूत, या ब्राह्मणांपेक्षां, त्याप्रमाणें धर्मसंरक्षक जे आम्ही त्या आमच्यापेक्षां उच्च अशा आसनावर काय म्हणून बसला आहे ? हा गर्विष्ठ बुद्धीचा असल्यामुळें याचा वध करणेंच योग्य होय ! ॥ २४ ॥ हा भगवान् व्यासमुनींचा शिष्य म्हणविलो व त्यांच्यापासून नाना प्रकारचे इतिहास, पुराणें व धर्मशास्त्रें यांचें यानें सर्व प्रकारें अध्ययनहि केलें आहे ॥ २५ ॥ याला अद्यापि इंद्रियांचें नियमन करतां आलेलें नाहीं, नम्रताहि याच्या अंगीं आलेली नाहीं. अर्थात् हा आपल्याला पंडित म्हणवीत असला तरी तें सारें व्यर्थ आहे. यानें अध्ययन केलेल्या शास्त्रांचा स्वैरवर्तनी नटाप्रमाणें यालाहि कांहीं उपयोग नाहीं ॥ २६ ॥ अशा ढोंगी लोकांच्या नाशासाठींच तर मीं हा अवतार घेतला आहे. मला मुख्यत्वेंकरून धर्माचें ढोंग करणाऱ्यांचा नाश करावयाचा आहे. कारण ते धर्महीनांपेक्षांहि फारच मोठे पातकी होत !' ॥ २७ ॥ भगवान् बळरामानें या वेळीं यात्रेकरूचा मार्ग स्वीकारून दुष्टांनाहि मारण्याचें काम वस्तुत: बंद ठेविलेलें होतें; पण होणार गोष्ट ती चुकत नाहीं, या न्यायानें या प्रसंगीं असें भाषण केल्यावर त्या प्रभूनें आपल्या हातांतील दर्भानें रोम-

* ब्राह्मण स्त्रीला क्षत्रिय पतीपासून झालेल्या संततीला सूत म्हणतात.

हर्षणाचा प्राण घेतला ! ॥ २८ ॥ तो प्रकार पाहतांच सगळे ऋषि 'हाय हाय, ! काय हा अनिष्ट प्रसंग !' असें म्हणून दुःख करूं लागले आणि खिन्न अंतःकरणानें बळरामाला म्हणाले, 'हे प्रभो, तुझ्या हातून हें अधर्माचें कृत्य घडलें आहे ॥ २९ ॥ हे यदुनंदना बळरामा, या रोमहर्षणाला आम्हीच हें ब्रह्मासन दिलें होतें व आमचें हें सत्र समाप्त होईपर्यंत त्याच्या शरीरास क्लेश होऊं नयेत व त्याला मृत्युहि येऊं नये अशी व्यवस्थाहि केली होती ॥ ३० ॥ असें असतां ज्या अर्थी तूं या गोष्टी समजून न घेतांच या ब्राह्मणाचा वध केलास, त्या अर्थी योगेश्वर अशा तुझ्यावर वेदाचेंहि नियंत्रण नाहीं असें तुला वाटतें काय ? ॥ ३१ ॥ हे लोकांना पवित्र करणाऱ्या बळरामा, आतां या ब्रह्महत्येचें जर तूं कोणी न सांगतां आपणच प्रायश्चित करशील, तर त्यामुळें लोकांना सन्मार्ग लागणारा आहे.' ॥ ३२ ॥

ब्राह्मणांचें भाषण ऐकून बळरामानें उत्तर केलें, "ऋषि हो, लोकांना सन्मार्ग दाखविण्याच्या इच्छेनें मीं या ब्रह्महत्येचें प्रायश्चित्त करीन. तरी या प्रायश्चित्तासाठीं पहिल्या प्रतीचा जो कांहीं उपाय असेल तोच केला पाहिजे ॥ ३३ ॥ या रोमहर्षणाला दीर्घ आयुष्य, बल, इंद्रियांची स्थिरता इत्यादि जें कांहीं तुमच्या इच्छेप्रमाणें पाहिजे असेल तें सांगा, तें मीं आपल्या योगशक्तीनें देण्यास सिद्ध आहें." ॥ ३४ ॥

हें ऐकून ऋषि म्हणाले, 'हे बळरामा, तुझ्या या दर्भास्त्राचा पराक्रम, याचा मृत्यु व आम्हीं याला दिलेलें वचन, हीं सर्व जेणेंकरून सत्य होतील असें कांहीं तरी तूं आतां कर !' ॥ ३५ ॥

बळराम म्हणाला, 'ऋषि हो, पुरुष आपण स्वतःच पुत्ररूपानें जन्मास येतो असें श्रुतिवचन * आहे. यास्तव याचा पुत्र दीर्घायुषी, स्थिर इंद्रियशक्तीचा व बलवान् होऊन तोच तुम्हांला पुराणकथा सांगणारा होईल[1] ॥ ३६ ॥ हे श्रेष्ठ मुनि हो, याशिवाय मी आतां तुमचें दुसरें इष्ट कार्य काय करूं तें सांगा. तुम्ही सुज्ञ आहांत. तरी माझ्या हातून न जाणतां घडलेल्या पापाची निष्कृति कशी होईल हें विचार करून सांगा !' ॥ ३७ ॥

ऋषींनीं उत्तर दिलें, 'बळरामा, इल्वल दानवाचा बल्वल नांवाचा दानवपुत्र असून तो महाभयंकर आहे. प्रत्येक पर्वणीच्या दिवशीं येथें येऊन तो आमच्या सत्राला विघ्न उत्पन्न करितो ॥ ३८ ॥ हे यादवश्रेष्ठा, तूं त्याचा जर वध करशील, तर ती आमची मोठीच सेवा होईल. कारण तो आमच्या यज्ञभूमीवर पू, रक्त, विष्ठा, मूत्र, मद्य, मांस इत्यादि टाकून घाण

---

* 'आत्मा वै पुत्र नामासि स जीव शरदः शतम्' हें श्रुतिवचन.

[1]बळरामाच्या म्हणण्याचा आशय असा कीं, रोमहर्षण आतां मृत झाला आहे; तो तसाच असूं द्या. श्रुतिवचनाप्रमाणें त्याच्या पुत्रालाच आपण त्याच्या ठिकाणीं समजूं व रोमहर्षणाला जें द्यावयाचें तें त्याच्या मुलाला देऊं म्हणजे झालें.

करीत असतो ॥ ३९ ॥ त्याचा प्रथम तूं वध कर आणि स्वस्थ अंतःकरणानें सर्व भरतखंडाला प्रदक्षिणा करून बारा महिने कृच्छ्रचांद्रायणव्रत करीत तीर्थांत स्नान कर, म्हणजे तुझी या पातकापासून शुद्धि होईल !' ॥ ४० ॥

**अठ्ठ्याहत्तरावा अध्याय समाप्त**

---

# अध्याय ७९ वा

शुकाचार्य म्हणतात, हे परीक्षित् राजा, याप्रमाणें त्या ऋषींनीं बळरामाला सांगितल्यावर जेव्हां पर्वणीचा दिवस आला, तेव्हां मोठा प्रचंड वारा सुटला व धुळीचा वर्षाव होऊं लागून जिकडे तिकडे घाण सुटली ॥ १ ॥ इतक्यांत बल्वलानें सोडिलेल्या अपवित्र वस्तूंचा वर्षाव यज्ञभूमीवर होऊं लागला आणि थोड्या वेळानें स्वत: बल्वल देखील हातांत शूळ घेऊन तेथें उपस्थित झाला ॥ २ ॥ त्याचें शरीर प्रचंड असून वर्ण काजळाच्या अस्ताव्यस्त राशीप्रमाणें काळा होता. त्याच्या मस्तकावरील केश व दाढीमिशा तापलेल्या तांब्याप्रमाणें लाल असून, त्याच्या दाढा, भुंवया व तोंड हीं भयंकर दिसत होतीं. ॥ ३ ॥ त्याला पाहतांच शत्रुसैन्याचा नाश करण्याच्या कामीं कुशल अशा मुसळाचें व दैत्यांचा वध करणाऱ्या नांगराचें बळरामानें स्मरण केलें व तीं दोन्ही तत्काळ त्याच्या पुढें येऊन उभीं राहिलीं ॥ ४ ॥ मग आकाशांत संचार करणाऱ्या त्या बल्वलाला समर्थ बळरामानें नांगराच्या टोंकानें खालीं ओढिलें व त्या ब्रह्मघातकी असुराच्या मस्तकावर मुसळाचा प्रहार केला ॥ ५ ॥ त्या प्रहारामुळें बल्वलाचें मस्तक फुटून गेलें व तो रक्त ओकत भूमीवर पडला ! त्याचें सर्व अंग रक्तानें माखून लाल झालें व मोठ्यानें आक्रोश करीत, वज्रानें ताडिलेल्या पर्वताप्रमाणें तो खालीं पडला ॥ ६ ॥ हें पाहून ऋषींना आनंद झाला. त्यांनीं बळरामाची स्तुति करून त्याला परिणामकारक असे शुभ आशीर्वाद दिले आणि देवांनीं पूर्वी जसा इंद्रावर अभिषेक केला होता, तसा त्या भाग्यशाली ऋषींनीं बळरामावर केला ॥ ७ ॥ त्यांनीं त्याला वैजयंती नांवाची माळ अर्पण केली. त्या माळेंतील कमळें अत्यंत शोभिवंत असून कधींहि कोमेजत नसत. त्याचप्रमाणें त्यांनीं त्याला तेजस्वी वस्त्रें व अलंकारहि दिले ॥ ८ ॥ मग त्यांचा निरोप घेऊन समागमें असलेल्या ब्राह्मणांसह बळराम विश्वामित्री नदीवर आला. तेथें सर्वांनीं स्नानें केलीं व पुढें ते सर्वजण सरयू नदी जेथून उगम पावते त्या सरोवरापाशीं गेले ॥ ९ ॥ तेथून सरयू नदीच्या प्रवाहाच्या दिशेनें बळराम प्रयागक्षेत्राला गेला आणि तेथें स्नान करून व देवादिकांचें तर्पण करून तो पुलह ऋषींच्या आश्रमास गेला ॥ १० ॥ मग गोमती, गंडकी व विपाशा या नद्यांत आणि त्याचप्रमाणें शोण नदींत स्नान करून तो गयेस गेला. तेथें गंगा व समुद्र यांच्या संगमावर त्यानें पितरांचें पूजन केलें ॥ ११ ॥ तेथून तो महेंद्र पर्वतावर गेला. त्या ठिकाणीं त्यानें परशुरामाचें दर्शन घेऊन त्याला वंदन केलें. त्यानंतर सप्त गोदावरी, वेणा व पंपा हीं तीर्थें करून तो भीमरथीस गेला ॥ १२ ॥ तेथें कार्तिकस्वामीचें दर्शन घेऊन बळराम श्रीशंकराचें स्थान जें श्रीशैल पर्वत तेथें गेला. नंतर द्रविड देशीं जाऊन त्या समर्थ बळरामानें महापवित्र अशा वेंकटगिरीचें दर्शन घेतलें ॥ १३ ॥ तेथून तो पुढें कामकोष्णी तीर्थ, कांची नगरी व कावेरी नांवाची श्रेष्ठ नदी यांचें दर्शन घेऊन श्रीरंगपूर येथें गेला. तें

क्षेत्र अत्यंत पवित्र असून तेथें श्रीहरीचें नित्य वास्तव्य असतें ॥ १४ ॥ नंतर श्रीहरीचें पवित्र स्थान असा जो ऋषभाद्रि नामक पर्वत तेथें गेला व दक्षिण मथुरेचें दर्शन घेऊन समुद्राजवळील सेतुरामेश्वरास गेला. हें क्षेत्र महापातकांचाहि नाश करणारें आहे ॥ १५ ॥ तेथें बळरामानें दहा सहस्र गाई ब्राह्मणांस दिल्या. तेथून तो कृतमाला व ताम्रपर्णी या नद्यांवरील क्षेत्रें व प्रलयनामक कुल पर्वत यांच्या दर्शनास गेला ॥ १६ ॥ तेथें बसून तप करणाऱ्या अगस्त्य मुनींचें दर्शन घेऊन बळरामानें त्यांना वंदन केलें. अगस्त्य मुनींनीं त्याला आशीर्वाद दिले त्यांचा स्वीकार करून व त्यांचा निरोप घेऊन तो पुढें दक्षिण समुद्राशीं गेला. तेथें कन्या नांवाची दुर्गादेवी आहे तिचें त्यानें दर्शन घेतलें ॥ १७ ॥ तो तेथून फाल्गुन किंवा अनंतनामक क्षेत्रास गेला व नंतर पञ्चाप्सरस नांवाचें तीर्थ आहे तेथें जाऊन त्यानें स्नान करून दहा सहस्र गाई दान केल्या. या क्षेत्रांतहि श्रीहरीचें नित्य वास्तव्य असतें ॥ १८ ॥ त्यानंतर भगवान् बळराम केरल देशास गेला व तेथून त्रिगर्त देशांस जाऊन पुढें जेथें शंकराचा वास नित्य असतो अशा गोकर्णनामक क्षेत्राचें दर्शन घेण्यासाठीं तेथें गेला ॥ १९ ॥ यानंतर बळराम द्वैपायनी आर्यादेवीचें दर्शन करून शूर्पारक येथें गेला. तेथें तापी, पयोष्णी व निर्विंध्या या नद्यांचें स्नान करून तो दंडकारण्यांत गेला ॥ २० ॥ तेथून नर्मदेच्या प्रांतांत शिरून तो माहिष्मती नगरीस गेला व मनुतीर्थांत स्नान करून पुन: प्रभास येथें आला ॥ २१ ॥ तेथें आल्यावर पांडव व कौरव यांच्या युद्धाची कहाणी त्याला ब्राह्मणांनीं सांगितली. तेव्हां त्या युद्धांत सर्व राजांचा नाश झाला हें ऐकून भूमीचा भार हरण झाला असेंच त्याला वाटलें ॥ २२ ॥ हा वृत्तान्त ऐकून तो कुरुक्षेत्रावर भीम व दुर्योधन यांचें गदायुद्ध चाललें होतें तेथें गेला. बळरामाच्या मनांतून तें युद्ध टाळतां आल्यास पाहावें असें होतें ॥ २३ ॥ पण त्याला आलेला पाहतांच युधिष्ठिर, नकुल, सहदेव, कृष्ण व अर्जुन हे सर्व नमस्कार करून स्वस्थ बसले. बळराम काय सांगण्यासाठीं तेथें आला असावा याविषयीं त्यांना संशय उत्पन्न झाला ॥ २४ ॥ बळराम तेथें गेला तों भीम व दुर्योधन हे दोघे हातांत गदा घेऊन मोठ्या रागानें एकमेकांवर विजय मिळविण्याच्या ईर्षेनें रणभूमीवर निरनिराळ्या चमत्कारिक रीतींनीं फेर घेत होते. त्यांना पाहून बळराम म्हणाला ॥ २५ ॥ ' हे भीमा, हे दुर्योधना, तुम्ही दोघेहि पराक्रमी असून सारख्याच सामर्थ्याचे आहां; पण त्यांत, भीमा, तूं शक्तीनें वरचढ आहेस आणि दुर्योधना, तुझें शिक्षण अधिक चांगलें झालें आहे असें मला वाटतें ॥ २६॥ अशा रीतीनें तुम्हां दोघांचेंहि सामर्थ्य समसमान असल्यामुळें अमुक एकाचा जय होईल व दुसऱ्याचा पराजय होईल असें कांहीं दिसत नाहीं. यास्तव हें निरर्थक होणारें द्वंद्वयुद्ध थांबवाल तर बरें होईल ! ' ॥ २७ ॥ शुकाचार्य म्हणतात, हे राजा, बळरामाचें बोलणें कांहीं वावगें नव्हतें; परंतु भीम व दुर्योधन यांनीं तें मानिलें नाहीं. त्यांचें वैर फार दिवसांचें होतें. ते एकमेकांना मागें दुरुत्तरें बोललेले होते व एकमेकांची आगळीकही त्यांनीं केलेली होती. त्या मागील सर्व गोष्टी ते या वेळीं आठवूं लागले ॥ २८ ॥ तेव्हां प्रारब्धानुसार काय व्हावयाचें तें होणारच असें म्हणून बळराम तेथून द्वारकेस निघून गेला. त्याला पाहतांच

उग्रसेनादि ज्ञातिबांधवांना फार आनंद झाला व सर्वजण त्याच्या जवळ आले ॥ २९ ॥ तेथून बळराम पुनः नैमिषारण्यांत गेला. तेथें सर्व ऋषींनीं आनंदानें त्याची पूजा केली. तो या वेळीं तीर्थदर्शनानें शांतचित्त झाला असून सर्व प्रकारच्या कलहांपासून निवृत्त झाला होता. यास्तव त्याला प्रत्यक्ष यज्ञाची मूर्ति समजून ऋषींनीं त्याची अनेक प्रकारें पूजा केली ॥ ३० ॥ तेव्हां भगवान् बळरामानें त्या ऋषींना अत्यंत पवित्र अशा ज्ञानाचा उपदेश केला. त्यामुळें त्यांना हें विश्व आत्मस्वरूपांत दिसून, आत्मा सर्वविश्वव्यापी आहे असें समजून आलें ॥ ३१ ॥ मग आपल्या पत्नीसह त्यानें अवभृथ स्नान केलें आणि सुंदर वस्त्रें परिधान करून उत्तम अलंकारहि धारण केले. नंतर ज्ञातिबांधव व इष्टमित्र यांनीं वेष्टिलेला तो, चंद्र जसा आपल्या प्रभेच्या योगानें शोभतो तसा शोभूं लागला ॥ ३२ ॥ हे राजा, याप्रमाणें त्या बलाढ्य बळरामाचे असे किती तरी पराक्रम आहेत. तो शेषाचा अवतार असून त्याचें सर्वतोपरि ज्ञान होणें कोणालाहि शक्य नाहीं. त्यानें केवळ मायेनें हें मनुष्यस्वरूप धारण केलें होतें ॥ ३३ ॥ अद्‌भुत पराक्रम करणाऱ्या व अपार सामर्थ्याच्या बळरामाचे हे पराक्रम जो कोणी प्रत्यहीं सकाळ-संध्याकाळ पठण करील तो श्रीविष्णूला प्रिय होईल ॥ ३४ ॥

## एकुणऐंशींवा अध्याय समाप्त

---

# अध्याय ८० वा

परीक्षित् राजा म्हणतो, 'हे मुने, अपार शक्तीच्या महात्म्या श्रीकृष्णाचे आणखीहि जे कांहीं पराक्रम आहेत तेहि ऐकण्याची माझी इच्छा आहे ॥ १ ॥ हे मुने, श्रीकृष्णाच्या सुंदर कथा एकदां ऐकल्या म्हणजे त्यांचें तत्त्व जाणणारा कोणता पुरुष विषय-भोगाच्या आशेनें दुःखित होऊन त्या कथांपासून परावृत्त होईल बरें ? ॥ २ ॥ वाणीनें त्याच्या गुणांचें वर्णन केलें तरच ती खरी वाणी; हात त्याची सेवा करतील तरच ते हात; स्थावर जंगम अशा सर्व वस्तूंत अंतर्यामी स्वरूपानें असणाऱ्या त्या भगवंताचें मन जर नित्य स्मरण करील तरच तें मन व त्याच्या पुण्यकारक कथा जर कान ऐकतील तरच ते कान होत ॥ ३ ॥ सर्व चराचर वस्तु हें त्या भगवंताचें स्वरूप होय, असें समजून जें मस्तक त्याच्यापुढें वांकेल तेंच खरें मस्तक व असें स्वरूप जो पाहील तीच खरी दृष्टि होय. तसेंच श्रीविष्णूच्या व त्याच्या भक्तांच्या पायांचें तीर्थ जें नित्य आपल्यावर धारण करील तेंच शरीर या नांवाला खरें पात्र समजावें ! ' ॥ ४ ॥

सूत शौनकादि ऋषींना सांगतात हे ऋषि हो, याप्रमाणें परीक्षित् राजानें व्यासपुत्र शुकाचार्यांना प्रश्न केला असतां, शुकाचार्यांचें हृदय भगवान् श्रीकृष्णाच्या ठिकाणीं गढून जाऊन ते त्याला उत्तर देऊं लागले ॥ ५ ॥

शुकाचार्य म्हणाले, हे राजा, कोणी एक ब्रह्मवेत्ता ब्राह्मण * श्रीकृष्णाचा मित्र होता. तो इंद्रियें व त्यांचे विषय यांच्याविषयीं अगदीं विरक्त असून त्याचें अंतःकरण नित्य प्रसन्न होतें व इंद्रियें त्याच्या अगदीं कह्यांत असत ॥ ६ ॥ त्याला सहजगत्या जें कांहीं प्राप्त होई, त्यावर तो आपल्या गृहस्थाश्रमाला अनुसरून निर्वाह करी. त्याचीं वस्त्रें अगदीं मलिन असून तो नित्य भुकेनें पीडिलेला असे. त्याची स्त्री सुद्धां त्याच्याप्रमाणेंच मलिन वस्त्रें नेसलेली असून नित्य क्षुधेनें व्याकुळ असे. अशा प्रकारें दारिद्र्यानें पीडिलेली ती पतिव्रता साध्वी, जिचें मुख म्लान झालें आहे व जिचें शरीर थरथर कांपत आहे अशी, एके दिवशीं पतीजवळ येऊन त्याच्याशीं बोलूं लागली ॥७॥८॥ ती म्हणाली, 'महाराज, आपला मित्र व प्रत्यक्ष लक्ष्मीपति असा जो भगवान् यादवश्रेष्ठ श्रीकृष्ण, तो ब्राह्मणांविषयीं अत्यंत दयाळु व शरणागताचें रक्षण करणारा आहे ॥ ९ ॥ तसेंच महाराज, तो श्रीकृष्ण साधूंचाही मोठा आश्रय आहे, तरी आपण त्याच्याकडे जा ! आपण कुटुंबवत्सल असून कष्टांत आहां असें समजल्यावर तो आपल्याला बरेंच द्रव्य देईल ॥ १० ॥ भोज, वृष्णि व अंधक या लोकांचा अधिपति असा तो श्रीकृष्ण सांप्रत द्वारकेंत राहात आहे. त्याच्या पदकमलांचें स्मरण करणारास तो आत्मस्वरूपहि देतो. मग तो जगद्गुरु आपलें भजन

* या ब्राह्मणाचें नांव श्रीदामा किंवा सुदामा असें होतें.

करणारास अर्थ आणि काम देईल यांत नवल काय ? ते तर मोठेसे इष्ट असतात असें नाहीं ( कारण अंतीं ते कष्टप्रद होतात ) ' ॥ ११ ॥ याप्रमाणें पत्नीनें अनेक प्रकारें गोड शब्दांनीं त्याची विनवणी केली असतां, 'श्रीकृष्णाकडे गेल्यानें दुसरा कांहीं लाभ न झाला तरी त्या उत्तमश्लोकाचें दर्शन होईल हा कांहीं सामान्य लाभ नव्हे ' असा विचार मनांत आणून त्यानें जावयाचें ठरविलें आणि तो स्त्रीला म्हणाला, 'हे पाहा, त्या श्रीकृष्णाला भेट म्हणून नेण्यासारखें घरांत कांहीं असेल तर दे ! ' ॥ १२ ॥ १३ ॥ हें ऐकून त्या साध्वीनें दुसऱ्या ब्राह्मणांच्या घरीं जाऊन चार मुठी पोहे मागून आणिले आणि ते एका फडक्याच्या धांदोटींत बांधून श्रीकृष्णाला भेट म्हणून देण्यास पतीच्या स्वाधीन केले ॥ १४ ॥ मग ते पोहे घेऊन तो अत्यंत सच्छील ब्राह्मण द्वारकेस गेला. वाटेंत जातांना श्रीकृष्णाचें दर्शन आपल्याला कसें काय घडेल याचा तो सारखा विचार करीत होता ॥ १५ ॥ द्वारकेस पोंचल्यावर नगररक्षक सैन्याचीं तीन ठाणीं व त्यानंतर तीन चौक ओलांडून गेल्यानंतर तो ब्राह्मण श्रीकृष्णाचे परमभक्त असे जे अंधक व वृष्णि यांचे वाडे जेथें होते तेथें गेला. त्या वाड्यांत वाटेल त्याला जाणें शक्य नव्हतें ॥ १६ ॥ तेथें श्रीकृष्णाच्या सोळा हजार स्त्रियांच्या घरांपैकीं एका सुंदरशा घरांत तो ब्राह्मण शिरला व तेथें गेल्यावर त्याला जणूं ब्रह्मानंद झाल्यासारखा वाटला ॥ १७ ॥ ब्राह्मण येत आहे असें दुरून दृष्टीस पडतांच, श्रीकृष्ण आपल्या प्रियपत्नीच्या पलंगावर बसला होता तेथून तत्काल उठला आणि त्याच्याजवळ जाऊन त्यानें त्याला दोन्ही हातांनीं घट्ट मिठी मारिली ! ॥ १८ ॥ आपला प्रिय मित्र असा तो ब्राह्मण भेटल्यामुळें त्याच्या प्रेमालिंगनानें श्रीकृष्णाला अतिशय सुख वाटलें आणि त्याच्या नेत्रांतून घळघळ आनंदाचे अश्रु वाहूं लागले ॥ १९ ॥ मग कृष्णानें आपल्या त्या प्रिय मित्राला पलंगावर बसविलें आणि त्याची स्वत: पूजा करून त्यांचे पाय धुतले व तें पाणी, हे परीक्षित् राजा, सर्व लोकांना पवित्र करणाऱ्या त्या भगवंतानें आपल्या मस्तकावर प्रोक्षिलें. एवढें झाल्यावर त्यानें त्या ब्राह्मणाच्या अंगाला उत्तम वासाची अशी चंदन, अगुरु व केशर यांची उटी लाविली ॥ २० ॥ २१ ॥ सुगंधी धूप व दिवे यांनीं त्या मित्राची पूजा करून त्याला विडा व गाय दिली आणि 'मित्रा, आलास, फार चांगलें झालें ' असें म्हटलें ॥ २२ ॥ त्या ब्राह्मणाच्या अंगावर फाटकीं वस्त्रें होतीं, त्याचें अंग मलिन होतें व तो अगदीं कृश झाला असून त्याच्या शरिरावर सर्वत्र सुरकुत्या पडल्या होत्या; तथापि श्रीकृष्णाच्या त्या पट्टराणीनें त्याला चवरीनें वारा घालून त्याची शुश्रूषा केली ॥ २३ ॥ निर्मळ कीर्तीच्या श्रीकृष्णानें अशा प्रकारें त्या निष्कांचन ब्राह्मणाचा सत्कार मोठ्या संतोषानें केलेला पाहून त्या अंत:पुरांतील स्त्रियांना मोठें आश्चर्य वाटलें ॥ २४ ॥ त्या म्हणूं लागल्या, 'ह्या निष्कांचन भिक्षुक ब्राह्मणानें असें काय पुण्य केलें होतें कळत नाहीं. हा निस्तेज, लोकांमध्यें निंदास्पद झालेला व हीन वृत्तीचा असतांहि त्रैलोक्याचा गुरु अशा लक्ष्मीपतीनें याचा सन्मान केला आणि पलंगावर बसलेल्या प्रत्यक्ष लक्ष्मीला सोडून, वडील भावाला जशी मिठी मारावी तशी त्यानें या ब्राह्मणाला मिठी मारिली ! ' ॥ २५ ॥ २६ ॥ असो. अशा प्रकारें योग्य सत्कार केल्यानंतर श्रीकृष्णानें

त्या ब्राह्मणाचे दोन्ही हात आपल्या हातांत धरले आणि पूर्वीं गुरुगृहीं असतांना त्या वेळच्या परस्परांमधील प्रेमाच्या गोष्टी आठवून तो त्याच्याशीं बोलूं लागला ॥ २७ ॥

श्रीकृष्ण म्हणाला, " काय रे मित्रा, गुरूला दक्षिणा दिल्यावर व तेथून ब्रह्मचर्याश्रमाची समाप्ति करून घरीं गेल्यावर त्वां अनुरूप अशा स्त्रीशीं विवाह केलास कीं नाहीं ? तूं धर्म जाणणारा असल्यामुळें योग्य तें सर्व केलें असशीलच ॥ २८ ॥ तूं ज्ञानी असल्यामुळें बहुधा घरादारामध्यें तुझें मन निरिच्छ बुद्धीनेंच असतें; द्रव्यावर तुझें फारसें प्रेम नाहीं असें मला कळलें आहे ॥ २९ ॥

तुझ्यासारखे ज्ञानी पुरुष कर्मे करीत असले तरी वासनांनीं त्याचें मन व्यापिलेलें नसतें. मायेनें निर्माण केलेल्या सर्व वासना सोडून ते केवळ लोककल्याणासाठींच तीं कर्मे करीत असतात. याविषयीं माझेंच उदाहरण आहे ॥ ३० ॥ असो. मित्रा, आपण गुरुगृहीं राहात होतों, तेव्हांची तुला आठवण आहे काय ? त्या गुरूपासून ज्ञान प्राप्त करून घेऊन ज्ञाते पुरुष संसाररूप अंधःकाराच्या पलीकडे गेले आहेत ॥ ३१ ॥ मित्रा, या लोकांत तीन प्रकारचे गुरु असतात. ज्याच्यापासून जन्म प्राप्त होतो तो पिता हा पहिला गुरु होय. त्यानंतर उपनयनद्वारा कर्मांचा अधिकार प्राप्त करून देणारा वेदाध्यापक आचार्य हा दुसरा गुरु होय आणि चारी आश्रमांतील पुरुषांना अध्यात्मज्ञान देणारा माझ्यासारखा जो गुरु तो तिसरा होय ॥ ३२ ॥ मित्रा, मला गुरु करून माझ्या उपदेशानें जे हा संसारसमुद्र तत्काल तरून जातात, तेच पुरुष चारी वर्ण व चारी आश्रम यांत खरा पुरुषार्थ जाणणारे समजावे ॥ ३३ ॥ म्हणून सर्व प्राण्यांचा अंतर्यामी असा मी, गुरूची शुश्रूषा केल्यानें जसा संतुष्ट होतों, तसा ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ व संन्यास या आश्रमांतील कर्मांनीं संतुष्ट होत नाहीं ॥ ३४ ॥ मित्रा, आपण त्या गुरुगृहीं असल्या वेळची एक गोष्ट तुला आठवते काय ? एकदां आपल्याला गुरुपत्नीनें जळण आणण्यासाठीं पाठविलें ॥ ३५ ॥ तेव्हां आपण एका मोठ्या रानांत शिरलों असतां, भलत्याच वेळीं मोठा वारा सुटून सपाट्यानें पाऊस पडूं लागला ॥ ३६ ॥ इतक्यांत सूर्य मावळला, काळोखानें साऱ्या दिशा व्याप्त झाल्या, सारा प्रदेश पाण्यानें भरून गेला व उंचसखल कांहींच कळेनासें झालें ॥ ३७ ॥ आणि मोठा वादळ व पाऊस यांचा सारखा मारा आपल्याला सहन करावा लागला. पाण्याच्या पुरांत वाट चुकली व मग आपण एकमेकांचे हात धरून कष्टानें त्या रानांत डोकींवर सर्पणाच्या मोळ्या घेऊन हिंडत राहिलों ॥ ३८ ॥ हा प्रकार घडून आल्यानंतर दुसरे दिवशीं सूर्य उगवल्यावर आपले आचार्य गुरु सांदीपनी आपल्या शोधार्थ निघाले आणि आपण दोघे शिष्य तसल्या कष्टमय स्थितींत असलेले त्यांच्या दृष्टीस पडलों ॥ ३९ ॥ तेव्हां ते आपल्याला म्हणाले, ' बाळांनो, तुम्हांला आमच्यासाठीं फारच कष्ट पडले. प्राण्यांना आपला जीव अत्यंत प्रिय असतो; पण त्याचाहि अनादर करून तुम्हीं माझ्यावर निष्ठा ठेविली ॥ ४० ॥ उत्तम शिष्यानें खरोखर गुरूच्या उपकाराची फेड करावयाची म्हणजे शुद्ध अंतःकरणानें सगळ्या पुरुषार्थांचें मूळ असें जें आपलें शरीर; तें त्या गुरूला अर्पण करावयाचें ॥ ४१ ॥ हे बाळांनों, तुम्हीं आतां उत्तम द्विज झालां

मी तुमच्यावर संतुष्ट झालों आहें. तुमचे सर्व मनोरथ पूर्ण होतील. तुमचें वेदाचें अध्ययन नित्य उज्वलित राहील आणि इहपरलोकीं तुमच्या तें उपयोगीं पडेल !' ॥ ४२ ॥ याप्रमाणें आपण गुरुगृहीं राहात असतां आणखीहि कित्येक गोष्टी घडून आल्या. गुरूच्या कृपेनेंच मनुष्याचे मनोरथ पूर्ण होऊन तो शांति मिळविण्यास पात्र होतो " ॥ ४६ ॥

श्रीकृष्णाच्या भाषणानंतर सुदाम म्हणाला, ' हे देवाधिदेवा जगन्नायका, सत्यकाम अशा तुझ्यासह आम्हीं गुरुगृहीं राहिल्यामुळें आमच्या हातून करावयाचें राहिलें असें काय बरें आहे ? ॥ ४४ ॥ ( आमच्या हातून सर्व पूर्ण झाल्यासारखें झालें ही गोष्ट खरी; पण) हे श्रीकृष्णा, ज्या तुझें शरीर म्हणजे वेदस्वरूपी ब्रह्म असून कल्याणाचें माहेघर आहे, त्या तुला गुरुगृहीं राहावें लागणें ही मोठी विटंबनाच नव्हे काय ? ' ॥ ४५ ॥

## ऐंशीवा अध्याय समाप्त

---

# अध्याय ८१ वा

शुकाचार्य म्हणतात, हे राजा, त्या सच्छील ब्राह्मणानें श्रीकृष्णाशीं अशा गोष्टी केल्यानंतर सर्व प्राणिमात्राच्या मनांतील अभिप्राय जाणणारा, सज्जनांचा आश्रयदाता व ब्राह्मणांचा कैवारी अशा त्या भगवान् श्रीकृष्णानें, प्रिय मित्र अशा त्या ब्राह्मणाकडे केवळ प्रेमपूर्ण नेत्रांनीं बारकाईनें पाहिलें व त्याची थट्टा करीत हंसत हंसत त्याला प्रश्न विचारावयास आरंभ केला ॥ १ ॥ २ ॥

भगवान् म्हणाला, ' मित्रा, अरे आपल्या घराहून तूं मला भेट तरी काय आणिली आहेस ? अरे, माझ्या भक्तांनीं प्रेमानें मला कण जरी दिला, तरी तो मला पुष्कळच वाटतो; पण भक्तिहीनानें जरी पुष्कळ दिलें तरी त्यानें माझा संतोष होत नाहीं ॥ ३ ॥ मित्रा, पान असो, फूल असो, फळ असो किंवा नुसतें पाणी असो, तें जो कोणी मला भक्तिपूर्वक अर्पण करतो त्या आत्मसंयमनी भक्तानें भक्तिपुरःसर अर्पण केलेला तो पदार्थ मीं सेवन करितों. ' ॥ ४ ॥ हे राजा, याप्रमाणें कृष्णानें विचारिलें असतां सुदामा ब्राह्मणानें लाजून मान खालीं घातली. भेटीकरितां बरोबर आणिलेले पसाभर पोहे त्याच्याच्यानें त्या श्रीपतीपुढें करवतना ॥ ५ ॥ पण भगवान् श्रीकृष्ण प्राणिमात्राच्या अंतःकरणांतील भाव प्रत्यक्ष जाणत असल्यामुळें, सुदाम्याचें आपल्याकडे येण्याचें कारण त्याला कळलेंच होतें. तो मनांत म्हणाला, ' या सुदाम्यानें आजवर जी माझी भक्ति केली, ती कांहीं वैभवाच्या इच्छेनें केली नाहीं ॥ ६ ॥ आणि आजहि तो माझा मित्र जो येथें आला आहे, तोहि आपल्या केवळ पत्नीच्या मनासारखें करावें एवढ्यासाठींच आला आहे. यास्तव कोणत्याहि मनुष्याला मिळण्यास कठीण असें वैभव मी याला देणार ! ' ॥ ७ ॥ असा मनांत विचार करून त्यानें त्या ब्राह्मणाच्या वस्त्रांतून चिंधींत बांधलेले पोहे, ' हें रे काय ? ' असें म्हणत स्वतःच बाहेर काढिले, आणि त्याला म्हणाला ॥ ८ ॥ ' मित्रा, अरे ही का तूं मला भेट आणिली आहेस ? अरे, ही तर मला फारच आवडणारी आहे. मित्रा, साऱ्या विश्वाची या पोह्यांनीं खरोखर तृप्ति होणार आहे ! ' ॥ ९ ॥ असें म्हणून श्रीकृष्णानें त्यांतील एक मूठभर पोहे खाल्ले आणि दुसरी मूठ घेऊन तो खाऊं लागणार, इतक्यांत त्याची एकनिष्ठ पत्नी जी रुक्मिणी तिनें त्या परमात्म्याचा हात धरिला ॥ १० ॥ ती म्हणाली, ' हे विश्वात्मन् भगवंता, एवढी पोह्यांची एक मूठ सर्व वैभव भरपूर देण्याला पुरेशी आहे. तुला संतोष होईल एवढें या लोकींचेंच काय पण परलोकींचेंहि वैभव तुझ्या भक्ताला एवढ्यानें मिळेल !' ॥ ११ ॥ असो. याप्रमाणें त्याच्या भेटीचा श्रीकृष्णानें मोठ्या प्रेमानें स्वीकार केल्यावर तो ब्राह्मण रात्रभर श्रीकृष्णाच्या मंदिरांत राहिला आणि यथेच्छ भोजन, पान इत्यादि केल्यानें त्याला आपण जणुं स्वर्गसुखच भोगीत आहों असें वाटलें ॥ १२ ॥ हे परीक्षित् राजा, दुसऱ्या दिवशीं उजाडल्यावर, सर्व विश्वाचें कल्याण करणाऱ्या

व आत्मसुखाचा नित्य अनुभव घेणाऱ्या श्रीकृष्णानें त्याला नमस्कार केला आणि तो आपल्या घरीं जावयास निघाला असतां वाटेपर्यंत त्यास पोंचवावयास जाऊन आनंदानें त्याला निरोप दिला ॥ १३ ॥ त्या ब्राह्मणाला कृष्णापासून कांहीं द्रव्यप्राप्ति झाली नाहीं व त्यानें आपण होऊन कांहीं मागितलेंहि नाहीं. त्यामुळें आतां रिक्तहस्तानें घरीं जावें लागणार म्ह न त्याला लाज वाटूं लागली खरी; पण महात्म्या श्रीकृष्णाचें दर्शन झाल्यामुळें तो अंतर्यामीं सुखी झाला होता ॥१४॥ तो मनांत म्हणाला, 'अहो, ब्राह्मणांचा कैवारी अशा त्या श्रीकृष्णाचें ब्राह्मणांविषयींचें वात्सल्य आज माझ्या प्रत्यक्ष दृष्टीस पडलें. पाहा, मी अत्यंत दरिद्री असतांहि लक्ष्मीला उराशीं धरणाऱ्या त्या कृष्णानें मला प्रेमानें आलिंगन दिलें ॥ १५ ॥ कोठें मी दरिद्री व पापी असा क्षुद्र ब्राह्मण व कोठें तो प्रत्यक्ष लक्ष्मीचें निवासस्थान असा श्रीकृष्ण ! पण मी त्याचा गुरुबंधु एवढ्यावरून त्यानें मला दोन्ही हातांनीं मिठी मारली ॥ १६ ॥ फार काय ? पण आपल्या वडील भावाप्रमाणें मला समजून त्यानें आपल्या पत्नीच्या पलंगावर मला बसविलें आणि मीं वाटेचा दमून आलेला पाहून त्याच्या त्या पट्टराणीनें मला चवरीनें वाराहि घातला ! ॥ १७ ॥ मी जणूं देव आहें असें समजून त्या देवाधिपति श्रीकृष्णानें माझे पाय चेपून व इतर रीतींनींहि उत्तम प्रकारें शुश्रूषा केली आणि माझा सत्कार केला. तो ब्राह्मणाला देवासारखा मानितो ॥ १८ ॥ त्याच्या चरणाचें पूजन हें पुरुषांना स्वर्ग, मोक्ष किंबहुना पाताळापासून पृथ्वीपर्यंत जें कांहीं वैभव व ज्या कांहीं सिद्धि आहेत त्यांची प्राप्ति होण्याचें मूळ साधन आहे ॥ १९ ॥ आतां मला त्यानें थोडेंहि द्रव्य दिलें नाहीं ही गोष्ट खरी; पण त्याचें कारण असें कीं, " हा ब्राह्मण दरिद्री असल्यामुळें, याला जर द्रव्य मिळालें तर हा मत्त होईल व माझें स्मरण करणार नाहीं " असें त्या दयाळु अंत:करणाच्या देवाला वाटलें असलें पाहिजे ॥ २० ॥ याप्रमाणें तो ब्राह्मण मनांत विचार करीत असतां आपल्या घराजवळ येऊन पोंचला. त्या वेळीं त्या घराजवळचा प्रदेश सूर्य, अग्नि व चंद्र यांप्रमाणें तेजस्वी अशा उत्तम विमानांनीं भरून गेलेला होता ॥ २१ ॥ त्याच्या सभोंवार चित्रविचित्र क्रीडावनें व उद्यानें असून त्यांत अनेक प्रकारच्या पक्ष्यांचे थवे गायन करीत होते व त्यांतील सरोवरांतील पाण्यांत सर्वत्र कुमुदें, अम्भोजें, कल्हारें, उत्पलें इत्यादि कमळें फुलून गेलीं होतीं ॥ २२ ॥ त्या स्थानीं सुंदर अलंकार घातलेले सेवक व हरिणांप्रमाणें चंचल नेत्रांच्या दासी सर्वत्र वावरत होत्या. तो चमत्कार पाहून ब्राह्मण मनांत म्हणाला, 'हें स्थान कोणाचें असावें ? हें माझेंच असेल तर त्याला हें असें स्वरूप कसें आलें ?' ॥ २३ ॥ याप्रमाणें मनांत तर्कवितर्क करीत तो पाऊल टाकीत असतां देवांसारखे तेजस्वी असे सेवक व दासी, गीत व वाद्यें यांचा मोठा घोष करीत सामोरे आले आणि त्या भाग्यशाली ब्राह्मणाचें स्वागत करून त्यास त्यांनीं घरीं नेलें ॥ २४ ॥ आपला पति घरीं आला असें पाहतांच त्याच्या पत्नीचा आनंद उचंबळून तिची मोठी धांदल उडाली. मूर्तिमंत लक्ष्मी आपल्या कमळाच्या स्थानांतून बाहेर पडावी तशी ती तत्काल घरांतून बाहेर आली ॥ २५ ॥ पतीला पाहतांच तिच्या प्रेमाला पूर आला, तिचा कंठ गहिंवरून आला व

डोळे आनंदाश्रूंनीं भरून गेले. अशा प्रकारें प्रेमाश्रूंनीं जिचे डोळे मिटले आहेत अशा त्या साध्वीनें त्याला मनानें नमस्कार करून मनानेंच आलिंगन दिलें ॥ २६ ॥ स्वर्गीय अप्सरांप्रमाणें चमकणाऱ्या व सुवर्णालंकारांनीं मंडित अशा दासींच्या परिवारांत लकाकणाऱ्या आपल्या स्त्रीला पाहून त्या ब्राह्मणाला विस्मय वाटला ॥ २७ ॥ अशा प्रकारें प्रसन्न अंतःकरण झालेला तो ब्राह्मण पत्नीसह आपल्या मंदिरांत गेला. त्याच्या मंदिराला इंद्राच्या मंदिराप्रमाणें शंभर खांब होतें, त्या मंदिरांत दुधाच्या फेसाप्रमाणें स्वच्छ अशा शय्या पसरल्या असून सोन्याचीं टोपणें घातलेले हस्तिदंती पलंग मांडिले होते व त्यांतील चवऱ्या व पंखे यांना सोन्याच्या मुठी होत्या ॥ २८ ॥ २९ ॥ त्यांतील बैठका सोन्याच्या असून त्यांवर मऊ आच्छादनें घातलेलीं होतीं व वरतीं चकचकीत छतें लावून त्यांना मोत्यांच्या झालरी लटकाविल्या होत्या ॥ ३० ॥ त्या मंदिराच्या भिंती स्वच्छ स्फटिकांच्या असून त्यांवर मूल्यवान् पाचूंच्या खड्यांचें जडवाचें काम केलें होतें व त्याच्या भिंतींत अत्यंत रमणीय अशा स्त्रियांच्या मूर्ति बसवून त्यांच्या हातांत चकाकणारे रत्नांचे दिवे दिलेले होते ॥ ३१ ॥ त्या मंदिरांत अशा प्रकारें परिपूर्ण वैभव भरलें आहे असें पाहून, हें वैभव आपल्याला एकाएकीं कसें प्राप्त झालें असावें याविषयीं तो ब्राह्मण तर्क करूं लागला ॥ ३२ ॥ तो म्हणाला, ' खरोखर, मी दुर्दैवी व नित्यदरिद्री असतां मला जें हें विपुल वैभव प्राप्त झालें, त्याचें कारण महावैभवशाली यदुनायक असा जो श्रीकृष्ण त्याच्या दर्शनावांचून दुसरें कांहीं असेल असें वाटत नाहीं ॥ ३३ ॥ तो माझा मित्र यदुश्रेष्ठ श्रीकृष्ण स्वतः महावैभवशाली आहे; पण आपण देतों तें थोडेंच आहे असें त्याला वाटत असल्यामुळें तो याचकाला पुष्कळ द्यावयाचें झालें तरी तें समक्ष देत नाहीं. पाऊसहि असेंच करितो ( तो शेतकऱ्याच्या शेतावर त्याच्या परोक्ष रात्रीं केव्हां तरी पडतो ) ॥ ३४ ॥ त्याचा स्वभावच असा आहे कीं, स्वतः त्यानें पुष्कळ दिलें तरी तें त्याला थोडें वाटतें, व मित्रांनीं त्याला जरी अगदीं थोडें दिलें तरी तें त्याला पुष्कळ वाटतें. मीं त्याच्यासाठीं नेलेले पोहे मूठभरच होते, पण त्या महात्म्यानें त्यांचा मोठ्या प्रेमानें स्वीकार केला ॥ ३५ ॥ त्याच्याशींच माझें सख्य, प्रेम व मैत्री हीं नित्य असावीं व जन्मोजन्मीं त्याचेंच दास्य मला घडावें. सत्य, महाप्रतापी व गुणांचें माहेरघर अशा श्रीकृष्णावर माझी आसक्ति जडून नित्य त्याच्या भक्तांची संगती मला प्राप्त होवो ॥ ३६ ॥ तो परमात्मा खऱ्या भक्ताला अद्‌भुत वैभव किंवा राज्य हीं कधींच देत नाहीं. तो सुज्ञ असल्यामुळें, संपत्तीच्या मदानें श्रीमंत लोकांचा कसा अधःपात होतो हें तो स्वतः पाहतो व त्यामुळें अदूरदर्शी पुरुषालाच तो ऐश्वर्य देतो, भक्ताला देत नाहीं * ॥ ३७ ॥ याप्रमाणें मनाशीं विचार करून त्यानें श्रीकृष्णाची अति प्रेमानें भक्ति करण्याचा संकल्प केला

* सुदाम्याचा भावार्थ असा कीं, मला ज्या अर्थीं संपत्ति मिळाली, त्या अर्थीं मीं श्रीकृष्णाचा खरा भक्त नसावा. तेव्हां या संपत्तीचा त्याग करून मीं भक्तीचाच स्वीकार करीन.

व विषयोपभोग हा ताज्य आहे अशा बुद्धीनें त्यावर फारसा आसक्त न होतां तो प्राप्त झालेल्या ऐश्वर्याचा आपल्या स्त्रीसह उपभोग घेऊं लागला ॥ ३८ ॥ देवाधिदेव अशा त्या यज्ञभोक्त्या श्रीकृष्णाला ब्राह्मण हे देवासारखे वाटतात. त्यांहून त्याचें दुसरें मोठें दैवतच नाहीं ॥ ३९ ॥ याप्रमाणें भगवंताशीं सख्य केलेल्या त्या ब्राह्मणानें जेव्हां पाहिलें कीं एरवीं अजिंक्य असा श्रीकृष्ण परमात्मा भक्तांनीं मात्र जिंकिला आहे, तेव्हां त्याच्या नित्य चिंतनानें त्या ब्राह्मणाचीं जीवविषयक अहंकाररूपी बंधनें तुटून गेलीं व सज्जनांचा आश्रय असें जें श्रीकृष्णाचें स्थान त्याची त्याला लवकरच प्राप्ति झाली ॥ ४० ॥ ब्राह्मणांचा कल्याणकर्ता अशा श्रीकृष्णाचें हें आख्यान व त्यांतील विशेषत: त्याचें ब्राह्मण-वात्सल्य, हें जो मनुष्य श्रवण करील, याची निष्ठा भगवंतावर जडून तो कर्माच्या बंधनांतून मुक्त होईल ॥ ४१ ॥

## एक्यायशींवा अध्याय समाप्त

---

# अध्याय ८२ वा

शुकाचार्य म्हणतात, हे परीक्षित् राजा, बळराम व कृष्ण हे दोघे द्वारकेंत राहात असतां एकदां सूर्यग्रहणाची पर्वणी आली. हें ग्रहण कल्यांतींच्या ग्रहणाप्रमाणें अगदीं पूर्ण खग्रास होतें ॥१॥ हे राजा, असें हें ग्रहण येणार म्हणून सर्व लोकांना आधींच ज्योतिष्यांकडून समजलें होतें व तदनुसार त्या प्रसंगीं आपल्या कल्याणाचें कांहीं कृत्य करावें म्हणून स्यमंतपंचक नामक क्षेत्राला मंडळी गेली होती ॥ २ ॥ या स्यमंतपंचक क्षेत्रांत धनुर्धाऱ्यांमध्यें श्रेष्ठ अशा निःक्षत्रिय पृथ्वी करणाऱ्या परशुरामानें राजांच्या रक्ताच्या प्रवाहानें सात मोठे डोह भरिले होते ॥ ३ ॥ त्या ठिकाणीं भगवान् परशुरामानें यज्ञहि केले होते. तो समर्थ परशुराम जरी वस्तुतः कर्मापासून अलिप्त होता, तरी लोकांना हिताचा मार्ग लागावा या उद्देशानें त्यानें पापक्षालनार्थ सामान्य माणसाप्रमाणें हे यज्ञ केले होते ॥४॥ ॥ ४ ॥ असो. त्या ग्रहणाच्या प्रसंगानें सर्व भरतखंडांतील लोक तेथें जमले होते. हे परीक्षित् राजा, त्यांत आपलें पाप क्षालन करण्यासाठीं अक्रूर, वसुदेव, आहुक आदिकरून यादवहि होते. तसेंच गद, प्रद्युम्न, सांब इत्यादि श्रीकृष्णाचे पुत्रहि त्यांजबरोबर होते आणि द्वारकेचें रक्षण करण्यासाठीं अनिरुद्ध व सेनापति कृतवर्मा हे सुचंद्र, शुक व सारण, यांसह मागें राहिले होते ॥ ५ ॥ ६ ॥ अत्यंत तेजस्वी सुवर्णाचे अलंकार व दैदीप्यमान वस्त्रें आणि पुष्पमाला ज्यांनीं धारण केल्या आहेत असे ते यादव, विमानासारखी गति असलेल्या रथांत, लाटांप्रमाणें उड्या मारणाऱ्या घोड्यांवर आणि मेघांप्रमाणें रंगाच्या गर्जना करणाऱ्या हत्तींवर बसून विद्याधरांप्रमाणें तेजस्वी अशा सैनिकांसह स्त्रियांना बरोबर घेऊन निघाले. तेव्हां देव जसे आपल्या परिवारासह शोभावे तसे शोभत होते. तेथें गेल्यावर त्यांनीं आपल्या स्त्रियांसह त्या क्षेत्रीं तीर्थांत स्नान केलें आणि मन स्वस्थ करून उपवास केला. नंतर त्यांनीं गाईवर वस्त्रें, माळा व सुवर्णाचे अलंकार घालून त्या ब्राह्मणांना दिल्या ॥ ७ ॥ ८ ॥९॥ त्यानंतर पुनः परशुरामडोहांवर येऊन त्यांनीं आणखी एकदां विधिपुरःसर स्नान केलें आणि कृष्णावर आपली नित्य भक्ति असावी असें त्यांनीं म्हणून सच्छील ब्राह्मणांना उत्तम अन्नाचें भोजन घातलें ॥ १० ॥ याप्रमाणें कृष्णाला आपलें दैवत मानणाऱ्या त्या यादवांनीं ब्राह्मणांची अनुज्ञा घेऊन नंतर स्वतःचें भोजन उरकलें आणि दाट छायेच्या वृक्षांखालीं विश्रांति घेत स्वस्थ बसले ॥ ११ ॥ इतक्यांत त्यांचे मित्र व संबंधी असे जे दुसरे राजे तेथें आले होते, ते त्यांच्या दृष्टीस पडले. त्यांत मत्स्य, उशीनर, कौसल, विदर्भ, कुरु, सृंजय, कांबोज, कैकय, मद्र, कुंति, आनर्त, केरल इत्यादि देशांचे राजे होते. तसेंच, हे राजा, आणखीहि त्यांच्या पक्षाला अनुकूल असे व त्याचप्रमाणें शत्रुपक्षीय असेहि राजे होते. त्याशिवाय नंद आदिकरून प्रेमाची मंडळी, तसेंच गोप व त्यांच्या स्त्रिया हीं देखील तेथें आलीं होतीं. त्या सर्वांना पाहून त्यांना फारच आनंद झाला

आणि त्यांचीं मुखकमलें प्रफुल्लित होऊन त्यांजवर विशेष प्रकारची टवटवी दिसूं लागली. त्यांनीं एकमेकांना दृढ आलिंगन दिलें. त्यांच्या नेत्रांतून आनंदाश्रूंचे लोट वाहूं लागले; अंगावर रोमांच उभे राहून व गळे दाटून येऊन त्यांच्या तोंडांतून शब्दहि निघेना, इतका त्यांना आनंद वाटला ॥ १२ ॥ १३ ॥ १४ ॥ स्त्रियाहि एकमेकींना भेटल्या व अत्यंत प्रेमळ आणि निष्कपट दृष्टीनें परस्परांकडे पाहूं लागल्या. त्यांनीं एकमेकींना दोन्ही हातांनीं आलिंगन दिलें, तेव्हां त्यांच्या केशरांच्या उटीनें माखलेल्या स्तनांवर सहजच दुसरीच्या स्तनांचे आघात झाले व त्यांचे नेत्र आनंदाश्रूंनीं भरून गेले ॥ १५ ॥ लहानांनीं वंदिलेल्या अशा थोरांनीं नंतर वृद्ध मंडळींना नमस्कार केला आणि याप्रमाणें परस्परांनीं परस्परांचें स्वागत केल्यानंतर एकमेकांना त्यांनीं कुशलप्रश्न विचारिले आणि मग श्रीकृष्णाविषयींच्या कथा ते एकमेकांना सांगूं लागले ॥ १६ ॥ इकडे कुंतीला आपल्या भावांची, बहिणींची, भाच्यांची, मातापित्यांची, भावजयांची व विशेषतः श्रीकृष्णाची भेट झाल्यामुळें त्यांच्याशीं गोष्टी बोलून तिनें आपलें दुःख दूर केलें ॥ १७ ॥

कुंती वसुदेवाला उद्देशून म्हणाली, 'हे भाऊ, मी स्वतःला हतभागी समजतें. आमचे मनोरथ सफल कसचे होणार ! कारण तुम्हीं एवढे थोर असतां आमच्या संकटकाळीं आमची विचारपूस करण्याचीहि तुम्हांला आठवण राहिली नाहीं ! ॥ १८ ॥ खरोखर ज्याला दैव प्रतिकूल झालें त्याची आपला म्हणून कोणी आठवण करीत नाहींत. मग ते मित्र असोत, बांधव असोत, मुलगे असोत, भाऊ असोत कीं प्रत्यक्ष आईबाप असोत !' ॥ १९ ॥

कुंतीचें हें भाषण ऐकून वसुदेवानें उत्तर केलें, 'ताई, तूं आमच्यावर अशी रागावूं नको. आम्ही झालों तरी दैवाच्या हातांतील खेळण्यासारखीं माणसें आहोंत. खरोखर मनुष्यमात्र त्या परमेश्वराच्याच नियंत्रणांत आहेत. मनुष्य जें कांहीं करतो किंवा त्याच्या हातून जें कांहीं घडतें तें सारें केवळ त्या परमेश्वराच्या प्रेरणेनेंच होतें ॥ २० ॥ ताई, कंसानें आपल्याला पीडा दिल्यामुळें आपण सारीं देशोधडीला लागलों होतों आणि आतां या स्थानीं जीं आपण पुनः जमलों तीं तरी दैवयोगानेंच जमलों ॥ २१ ॥

शुकाचार्य म्हणतात, वसुदेव, उग्रसेन इत्यादि यादवांनीं तेथें आलेल्या सर्व राजांचा सत्कार केला आणि त्या राजांनाहि श्रीकृष्णाच्या दर्शनाचा लाभ घडल्यामुळें मोठा आनंद होऊन ते अत्यंत संतुष्ट झाले ॥ २२ ॥ भीष्म, द्रोण, धृतराष्ट्र, गांधारी व तिचे पुत्र, पांडव व त्यांच्या स्त्रिया, कुंती, संजय, विदुर, कृप, कुंतिभोज, विराट, भीष्मक, महापराक्रमी नग्नजित्, पुरुजित्, द्रुपद, शल्य, धृष्टकेतु, काशिराज, दमघोष, विशालाक्ष, जनक, मद्र व कैकय राजे, तसेंच युधामन्यु, सुशर्मा व पुत्रांसह बाल्हिकादिक युधिष्ठिराला अनुकूल असलेले राजे या सर्वांना, लक्ष्मीचें वसतिस्थान अशी ती श्रीकृष्णाची मूर्ति आपल्या स्त्रियांसह तेथें आलेली पाहून मोठें आश्चर्य वाटलें ॥ २३ ॥ २४ ॥ २५ ॥ २६ ॥ असो. बळराम व कृष्ण यांनीं त्या सर्व मंडळींचा उत्तम सत्कार केला. त्या वेळीं ते राजे आनंदित होत्साते श्रीकृष्णाचे अंकित अशा यादवांची प्रशंसा करूं लागले ॥ २७ ॥ ते म्हणाले,

'अहो उग्रसेन महाराज, या मनुष्यलोकीं जन्मास आल्यासारखें तुम्हींच सार्थक केलेंत. कारण योग्यांनाहि ज्याचें दर्शन होणें कठीण अशा ह्या श्रीकृष्णाचें तुम्हांला नित्य दर्शन घडतें ॥२८॥ ज्या भगवंताच्या कीर्तीचें श्रुति स्तवन करिते, तसेंच ज्याच्या पादप्रक्षालनाच्या उदकापासून झालेली गंगा आणि ज्याच्या मुखांतून शब्दरूपानें निघालेले वेद या सर्व जगाला अत्यंत पवित्र करितात, पृथ्वीचें वैभव कालानें नष्ट झालें तरी ज्या भगवंताच्या पादस्पर्शानें तिच्या शक्तीचें पुनरुज्जीवन होऊन ती आपले सर्व मनोरथ पूर्ण करण्यास समर्थ होते ॥ २९ ॥ अशा ह्या भगवंताशीं दर्शन, संघटन, चालणें, बोलणें, निजणें, बसणें, खाणें, पिणें, विवाहसंबंध, नात्याचा संबंध इत्यादिकांनीं तुम्ही नित्य संबद्ध आहां. घरदार-रूपी संसार हा नरकाचा मार्ग खरा; पण त्यांत वागणाऱ्या पुरुषांना, स्वर्ग व मोक्ष यांविषयीं सुद्धां निरिच्छ करून सोडणारा तो भगवान् विष्णु श्रीकृष्णरूपानें तुमच्या घरांत स्वतः राहात आहे. अर्थात् तुम्हांला संसाराची भीति कसली ?' ॥ ३० ॥

शुकाचार्य म्हणतात, हे राजा, कृष्णप्रभृति यादव तेथें आले आहेत असें जेव्हां नंदाला समजलें, तेव्हां त्यांना भेटण्यासाठीं गाड्यांवर साहित्य लादून गोपगणांसह तो तेथें आला ॥ ३१ ॥ त्याला पाहून यादवांना मोठा हर्ष झाला. कुडींत प्राण आला असतां ती जशी उठून बसते, तसे ते उठून उभे राहिले व पुष्कळ काळ भेट न झाल्यामुळें उत्सुक झालेल्या त्यांनीं एकमेकांस मोठ्या उत्कंठेनें आलिंगन दिलें ॥ ३२ ॥ वसुदेवानें अत्यंत आनंदित होऊन प्रेमभरानें नंदाला आलिंगन दिलें आणि कंसापासून आपल्याला कशी पीडा झाली होती व त्यामुळें आपला मुलगा गोकुळांत कसा नेऊन ठेवावा लागला याची त्याला आठवण झाली ॥ ३३ ॥ नंतर कृष्ण व बळराम यांनींहि नंद व यशोदा यांना आलिंगन देऊन नमस्कार केला; पण हे परीक्षित् राजा, प्रेमानें त्यांचा कंठ दाटून आल्यामुळें त्यांना कांहीं बोलवलें नाहीं ॥ ३४ ॥ नंद व भाग्यशाली यशोदा यांनीं त्या राम-कृष्णांना आपल्या मांडीवर बसवून आणि दोन्ही हातांनीं त्या आपल्या पुत्रांना आलिंगन देऊन आपलें विरहदुःख दूर केलें ॥ ३५ ॥ रोहिणी व देवकी यांनीं यशोदेला आलिंगन दिलें व तिनें आपल्याशीं कशी मैत्री केली याची आठवण करीत गळे दाटून आले आहेत अशा स्थितींत त्या तिच्याशीं बोलूं लागल्या ॥ ३६ ॥ त्या म्हणाल्या, 'हे यशोदे, तुम्हीं उभयतांनीं आम्हांवर जें अपार प्रेम केलें त्याचें विस्मरण कोणाला बरें होईल ? इंद्राचें ऐश्वर्य जरी प्राप्त झालें तरी तुमच्या त्या प्रेमाची फेड करतां येणें शक्य नाहीं ॥ ३७ ॥ या दोन मुलांना पितरांचें दर्शनहि घडलें नाहीं अशा स्थितींत तुम्हांला त्यांचे आईबाप होऊन त्यांचें वर्धन, पालन व पोषण करावें लागलें. यशोदे, डोळ्यांना जशा पापण्या जपतात तशा त्या दोघांना तुम्हीं जपलां व तुमच्याजवळ असल्यामुळेंच त्यांना कसलेंहि भय वाटत नव्हतें. खरोखर तुमच्यासारख्या सज्जनांना हा आपला व हा दुसऱ्याचा असा भेदच वाटत नाहीं.' ॥ ३८ ॥

शुकाचार्य म्हणतात, राजा, गोपींनाहि कृष्ण आपल्याला कधीं तरी भेटेल काय अशी पुष्कळ दिवस उत्कंठा लागून राहिलीं होती. त्यामुळें (त्याचें दर्शन होतांच त्याच्यावरून

दृष्टिच काढूं नये असें त्यांना वाटलें आणि ) डोळ्यांवर पापण्या उत्पन्न करणाऱ्या ब्रह्मदेवाला त्या नांवें ठेवूं लागल्या. त्या सर्वांनीं श्रीकृष्णाला आपल्या नेत्रद्वारा हृदयांत सांठविलें आणि मनानेंच त्याला आलिंगन देऊन, ज्याचें सारूप्य मोठ्या योग्यांनाहि दुर्मिळ असतें अशा त्याच्याशीं त्या एकरूप होऊन गेल्या ॥ ३९ ॥ त्या गोपींची अशी स्थिति पाहून श्रीकृष्ण भगवान् एकान्तस्थळीं त्यांना भेटला व आलिंगनपूर्वक त्यांची खुशाली विचारून हंसत हंसत तो त्यांना म्हणाला ॥ ४० ॥ 'मैत्रिणींनो, आमची तुम्हांला आठवण आहे काय ? आम्ही आपल्याच माणसांचें कार्य साधून शत्रुपक्षीयांचा निःपात करावा अशा हेतूनें येथून गेलों होतों व त्या कार्यांत आम्हांला तिकडे बराच काळ लागला हें खरें ॥ ४१ ॥ पण त्यामुळें आम्ही कृतघ्न आहों असें वाटून तुम्ही आमची अवहेलना तर करीत नाहीं ना ! खरें म्हटलें तर प्राणिमात्र एकत्र जमतात किंवा त्यांचा वियोग होतो हें सर्व त्या परमेश्वराचेंच कृत्य होय ॥ ४२ ॥ ज्याप्रमाणें मेघांचा समूह किंवा गवत, कापूस, धूळ इत्यादि पदार्थ वायु एकदां एका ठिकाणीं आणितो आणि थोड्या वेळानें पुनः त्यांना एकमेकांपासून दूर करितो त्याचप्रमाणें प्राणिमात्राला निर्माण करणारा परमेश्वर प्राण्यांना संयोग किंवा वियोग करीत असतो ॥ ४३ ॥ खरोखर माझ्यावर भक्ति करणें हें प्राण्यांना मोक्षप्रद होतें आणि सुदैवानें तुमचें तर माझ्यावर अलोट प्रेम आहे, तेव्हां तुम्ही माझी प्राप्ति करून घ्याल यांत संशयच नाहीं ॥ ४४ ॥ गोपींनों, पृथिव्यादि महाभूतांचे जे पदार्थ बनलेले असतात, त्यांच्या अगदीं अंतीं व आंत-बाहेर जशीं तीं महाभूतेंच सर्वत्र असतात, त्याप्रमाणें मीहि सर्व प्राण्याच्या आदीं-अंतीं व आंत-बाहेर असतों ॥ ४५ ॥ खरोखर हीं पृथिव्यादि महाभूतें सर्व पदार्थांमध्यें व्यापक रूपानें आहेत व त्या महाभूतांमध्यें आत्मा भोक्ता या रूपानें व्यापून राहिला आहे; पण तीं भूतें व भोक्तृरूप आत्मा हीं दोन्ही त्यांच्याही पलीकडच्या अशा मजमध्यें समाविष्ट होऊन प्रकाशित होतात हें तुम्ही समजून घ्या ! ' ॥ ४६ ॥

शुकाचार्य म्हणतात राजा, याप्रमाणें श्रीकृष्णानें गोपींना अध्यात्माचा उपदेश केला असतां, त्या त्याचें नित्य स्मरण करीत राहिल्या व त्यामुळें त्यांचा लिंगदेह नष्ट होऊन त्या श्रीकृष्णस्वरूपीं मिळाल्या ॥४७॥ श्रीकृष्णाचा उपदेश ऐकिल्यावर त्या त्याला म्हणाल्या, ' हे कमलनयना, अत्यंत खोल ज्ञानानें युक्त अशा मोठ्या योग्यांनाहि हृदयांत ज्याचें चिंतन करणें अवश्य आहे, असे तें संसाररूपी कूपांत पडलेल्या प्राण्यांना बाहेर पडण्याचें साधन असलेलें तुझें चरणकमल, आम्हीं जरी गृहव्यवसायांत गुंतलों असलों तरी आमच्या मनांत नित्य प्रगट होवो, एवढेंच आमचें मागणें आहे ॥ ४८ ॥

**ब्यायशींवा अध्याय समाप्त**

# अध्याय ८३ वा

शुकाचार्य म्हणतात, राजा, गोपींचा आधार व त्यांना मोक्षोपदेश देणारा गुरु असा जो भगवान् श्रीकृष्ण त्यानें त्या गोपींवर याप्रमाणें अनुग्रह केला आणि नंतर युधिष्ठिर आणि दुसरे सर्व जिव्हाळयाचे मित्र यांना कुशल प्रश्न विचारिले ॥१॥ श्रीकृष्णानें त्यांचा सत्कार करून त्यांना खुशाली विचारिली,तेव्हां श्रीकृष्णाच्या पायांच्या दर्शनानें ज्यांचें पातक नष्ट झालें आहे आणि जे अत्यंत आनंदित झाले आहेत असे ते त्याला उत्तर देऊं लागले ॥२॥ ते म्हणाले, ' हे प्रभो श्रीकृष्णा, तुझ्या चरणकमलाचा मकरंद थोरामोठ्यांच्या मनांत उत्पन्न होऊन त्यांचें जे आपल्या कर्णपुटांनीं यथेच्छ पान करतात त्यांना अल्याण स्पर्श तरी कोठून करील ? कारण तो मकरंद देहधारी प्राण्यांना देह प्राप्त होण्याचें कारण जें अज्ञान त्याचा सर्वथैव उच्छेद करणारा आहे ॥३॥ हे श्रीकृष्णा, जीवाला ज्या सुषुप्त्यादि तीन अवस्था मायेमुळें जडलेल्या असतात, त्यांचा तुझ्या आत्मतेजामुळें पूर्ण नाश झालेला आहे. तूं आनंदाचा सागर असून, तुझें स्वरूप त्रिकालाबाधित व तुझें ज्ञानस्वरूप कोठेंहि कुंठित न होणारें आहे. कालान्तरानें वेद नष्ट होऊं लागले, तर त्यांचें रक्षण करण्यासाठीं तूं आपल्या योगमायेनें अवतार घेतोस.वैराग्यशील अशा सर्वसंगपरित्याग केलेल्या साधूंना तुझाच आश्रय आहे. श्रीकृष्णा, अशा तुला आम्ही नम्र होऊन नमस्कार करितों ' ॥४॥

शुकाचार्य परीक्षिताला म्हणतात, राजा, याप्रमाणें उत्तमश्लोक पुरुषांमध्यें श्रेष्ठ अशा त्या श्रीकृष्णाची ते लोक स्तुति करीत असतां यादव व कौरव यांच्या स्त्रियाहि एकत्र झाल्या व तिन्ही लोक गात असलेल्या श्रीकृष्णाच्या गोड कथा आपआपसांत सांगूं लागल्या, त्या मीं तुला सांगतों. ऐक ॥ ५ ॥

द्रौपदी म्हणाली, ' हे रुक्मिणि, हे भद्रे, हे जांबवति, हे कोसलकन्ये, हे सत्यभामे, हे कालिन्दि, हे शैब्ये, हे रोहिणी, हे लक्ष्मणे व हे इतर कृष्णस्त्रियांनो, त्या भगवान् श्रीकृष्णानें आपल्या मायेनें लोकव्यवहाराचें अनुकरण करण्यासाठीं तुम्हांला वरिलें तो प्रकार आम्हांला सांगा ' ॥ ६-७ ॥

द्रौपदीचा प्रश्न ऐकून प्रथम रुक्मिणीनें आपल्या विवाहाचा वृत्तान्त सांगितला. ती म्हणाली, ' राजेलोक मला शिशुपालाला द्यावयाची असें ठरवून व त्यासाठीं आपलीं धनुष्यें उचलून सिद्ध असतां, श्रीकृष्णानें त्या अजिंक्य म्हणून समजलेल्या योद्ध्यांच्या मस्तकावर पाय देऊन, सिंह जसा मेंढ्यांच्या कळपांतून आपला भाग घेऊन जातो, त्याप्रमाणें मला हरण करून नेलें. लक्ष्मीचें निवासस्थान अशा त्या भगवंताच्या पायाचें माझ्या हातून नित्य पूजन घडो !' ॥ ८ ॥

सत्यभामा म्हणाली, ' माझा पिता जो सत्राजित्, त्याला आपल्या भावाच्या वधामुळें अत्यंत दुःख झालें व त्या भावाबरोबर स्यमंतक मणिहि नष्ट झाल्यामुळें त्यानें

त्या वधाचा व मण्याच्या चोरीचा आळ श्रीकृष्णावर घातला. तेव्हां तो आरोप सर्वथा धुऊन टाकावा म्हणून त्या भगवंतानें ऋक्षराज जांबवानाचा पराभव करून त्याच्यापासून तो मणि आणिला व माझ्या पित्याला दिला. एवंच खोटा आरोप केल्यामुळें आतां श्रीकृष्ण काय करील कोण जाणे या भीतीनें पूर्वी मला अक्रूराला द्यावयाचें ठरलें असतांही तो विचार बदलून माझ्या पित्यानें त्या मण्यासह मला प्रभु श्रीकृष्णाला अर्पण केलें. ' ॥९ ॥

जांबवती म्हणाली, ' माझा पिता जो जांबवान् त्यानें श्रीकृष्ण म्हणजे आपला स्वामी जो सीतापति रामचंद्र तोच होय असें न ओळखिल्यामुळें त्याच्याशीं सत्तावीस दिवस युद्ध केलें. शेवटीं युद्धांत जेव्हां त्याची परीक्षा झाली, तेव्हां त्यानें त्या भगवंताला ओळखिलें आणि मग त्याचे पाय धरून त्या स्यमंतक मण्यासह त्यानें मला श्रीकृष्णाला अर्पण केलें. अशा रीतीनें मीं त्या भगवंताची दासी झालें. ' ॥ १० ॥

कालिन्दी म्हणाली, ' श्रीकृष्णाच्या पादस्पर्शाचा लाभ घडावा या इच्छेनें मीं तपश्चर्या करीत आहें असें जेव्हां त्या भगवंताला कळलें, तेव्हां त्यानें आपला मित्र जो अर्जुन त्याच्यासह माझ्याकडे येऊन माझें पाणिग्रहण केलें व अशा रीतीनें मी त्याची गृहदासी झालें' ॥ ११ ॥

भद्रा म्हणाली, ' माझें स्वयंवर चाललें असतां श्रीकृष्ण तेथें आला आणि माझ्या प्राप्तीसाठीं जमलेले राजे व इच्छेविरुद्ध वागणारे माझे भाऊ यांना जिंकून सिंह जसा कुत्र्यांच्या टोळींत सांपडलेला आपला वांटा घेऊन जातो तसा तो भगवान् मला घेऊन लक्ष्मीचें माहेरघर अशा आपल्या नगरीला गेला. आतां मला त्या भगवंताचे पाय धुण्याचें भाग्य जन्मोजन्मीं लाभो ! ' ॥ १२॥

सत्या म्हणाली, ' माझ्या पित्यानें मला वरूं इच्छिणाऱ्या राजांच्या पराक्रमाची परीक्षा करण्याकरितां अत्यंत बलवान् , तापट आणि तीक्ष्ण शिंगांचे असे सात बैल सिद्ध केले होते. वीर्यशाली पुरुषांचा गर्व हरण करणाऱ्या भगवान् श्रीकृष्णानें त्या बैलांना, लहान मुलें खेळतांना लहान कोंकरांना जशीं चटकन् धरतात त्याप्रमाणें धरून बांधून टाकिलें ! ॥ १३ ॥ याप्रमाणें पराक्रम हेंच माझ्या प्राप्तीचें मोल ठेविलें असतां आपल्याला वाटेंत अडविणाऱ्या राजांचा पराभव करून आंदण दिलेल्या दासी आणि चतुरंग सेना यांसह श्रीकृष्ण मला घेऊन गेला. आतां त्याची सेवा मला नित्य घडो ! ' ॥ १४ ॥

मित्रविन्दा म्हणाली, ' हे द्रौपदि, श्रीकृष्ण हा माझा मामेभाऊ असून माझें मन त्याच्यावर प्रथमपासूनच आसक्त होतें. हें पाहून माझ्या पित्यानें आपण होऊन त्या भगवंताला बोलावून आणिलें. एक अक्षौहिणी सैन्य व अनेक दासी यांच्यासह मला त्याच्या पदरांत घातलें ॥ १५ ॥ आतां आपल्या कर्मांनीं मी निरनिराळ्या जन्मांत जाऊन भ्रमण करीत असतां मला त्याचा पादस्पर्श जन्मोजन्मीं लाभो म्हणजे झालें. कारण तो लाभण्यानें आत्म्याचें कल्याण होणारें आहे ' ॥ १६ ॥

लक्ष्मणा म्हणाली, ' हे द्रौपदि, श्रीकृष्णाचा जन्मवृत्तान्त आणि त्याचे पराक्रम हे नारदाच्या मुखानें वारंवार गायिलेले ऐकून आणि हातांत कमळ धारण केलेल्या लक्ष्मीनेंहि याला वरिलें आहे असा गंभीर विचार करून, इंद्रादि लोकपालांचाहि मीं त्याग केला आणि त्या भगवंतावरच माझें मन बसलें ॥ १७ ॥ हे पतिव्रते द्रौपदि, माझा पिता जो बृहत्सेन त्याचें माझ्यावर मोठें प्रेम होतें. त्याला जेव्हां माझ्या मनांतील हेतु कळून आला, तेव्हां तो साधण्याचा त्यानें उपाय योजिला ॥ १८ ॥ हे द्रौपदि, ज्याप्रमाणें तुझ्या स्वयंवराच्या वेळीं तुला अर्जुनच पति मिळावा या बुद्धीनें मत्स्ययंत्र केलें होतें, तसेंच एक यंत्र माझ्या स्वयंवराच्या वेळीं त्यानें करविलें. मात्र त्यांत भेद एवढाच होता कीं, तुझ्या वेळचा मत्स्य बाहेरूनच केवळ झांकलेला होता. ( त्याच्याखालीं उभे राहणाराला तो दिसत होता. ) पण माझ्या वेळचा मत्स्य प्रत्यक्ष असा कोठूनहि दिसणारा नसून त्याचें प्रतिबिंब मात्र पाण्यांत दिसत होतें ॥ १९ ॥ हा पण ऐकल्यावर सर्व देशांहून नाना प्रकारचीं अस्त्रें व शस्त्रें यांत निष्णात असलेले हजारों राजे आपआपले पुरोहित घेऊन माझ्या पित्याकडे आले ॥ २० ॥ त्यांचा पराक्रम व त्यांचें वयोमान यांना अनुरूप असा त्या सर्वांचा सत्कार माझ्या पित्यानें केला आणि नंतर ते माझी प्राप्ति व्हावी म्हणून सभामंडपांत जाऊन मत्स्यवेध करण्यासाठीं धनुष्य व बाण घेऊन उभे राहिले ॥ २१ ॥ परंतु कित्येकांनीं धनुष्य हातीं घेतल्यावर त्यावर दोरी चढवितां येईना म्हणून त्यांनीं तें तसेंच सोडून दिलें; कित्येकांनीं दोरी कशीबशी मनगटापर्यंत ओढिली; पण इतक्यांत तें निसटून त्याचा भार छातीवर पडल्यामुळें ते पटकन् खालीं बसले ! ॥ २२ ॥ दुसरे जरासंध, अंबष्ठ, शिशुपाल, भीम, दुर्योधन, कर्ण इत्यादि जे मोठे पराक्रमी राजे होते त्यांनीं धनुष्याला कशीबशी दोरी चढविली; पण तो मत्स्य कोठें असावा याचा निश्चय त्यांना झाला नाहीं ॥ २३ ॥ अर्जुनानें मात्र मत्स्याचें प्रतिबिंब पाण्यांत पाहून तो मत्स्य कोठें असावा हें ठरविलें आणि सावधपणानें बाण सोडिला; पण तो मत्स्याचा वध न करतां त्याला केवळ स्पर्श करून गेला ॥ २४ ॥ याप्रमाणें इतर मानी क्षत्रिय मानभंग होऊन परत गेले असतां भगवान् कृष्ण पुढें झाला आणि धनुष्य हातांत घेऊन त्यानें त्याला सहजगत्या दोरी चढवून दिली ॥ २५ ॥ मग त्या धनुष्यावर बाण चढवून त्यानें एकदांच मत्स्याच्या पाण्यांतील प्रतिबिंबाकडे पाहिलें आणि सूर्य अभिजित् नक्षत्रामध्यें स्थिर असतां बाणानें त्या मत्स्याचा वेध करून त्याला खालीं पाडिलें ! ॥ २६ ॥ मत्स्य विद्ध होऊन खालीं पडतांच आकाशांत व पृथ्वीवरहि जिकडे तिकडे श्रीकृष्णाचा जयजयकार होऊन दुंदुभि वाजूं लागल्या आणि देव आनंदानें अगदीं बेहोष होऊन त्याच्यावर पुष्पवृष्टि करूं लागले ॥ २७ ॥ मग मी एक उत्तम रेशमी वस्त्र नेसलें व दुसरें अंगावर घेतलें, वेणींत फुलांचा गजरा घातला आणि सोन्यांत जडविलेल्या तेजस्वी रत्नांची माळ हातीं घेऊन, नूपुरांचा मंजुळ ध्वनि करणारीं पावलें टाकीत मी त्या सभामंडपांत आलें. त्या वेळीं माझ्या मुखावर सलज्ज अशा हास्याची छटा उमटली होती ॥ २८ ॥ मंडपांत आल्यावर लांब केसांनीं युक्त व कानांतील कुंडलांचें तेज गालांवर चमकत असलेलें माझें मुख मीं वर केलें आणि शीतल हास्ययुक्त

असे कटाक्ष फेंकून तेथें जमलेल्या राजांकडे पाहिल्यावर, ज्याच्यावर मन आसक्त झालें आहे अशा श्रीकृष्णापाशीं हळूहळू येऊन हातांतील रत्नमाळा त्याच्या गळ्यांत घातली ॥ २९ ॥ त्याबरोबर मृदंग, पडघम, शंख, भेरी, आनक इत्यादि वाद्यें वाजूं लागलीं. नट व नर्तकी नाचूं लागल्या आणि गवयांनीं गाण्यास आरंभ केला ॥ ३० ॥ हे द्रौपदि, याप्रमाणें मीं त्या भगवान् श्रीकृष्णाला वरिलें असतां, कामपीडेनें व्याकुळ झालेल्या व माझ्यासाठीं चढाओढ करणाऱ्या त्या राजांना ती गोष्ट सहन झाली नाहीं ॥ ३१ ॥ इतक्यांत उत्तम प्रकारचे चार घोडे जोडलेल्या रथांत श्रीकृष्णानें मला बसविलें आणि तो चतुर्भुज भगवान् आपलें शार्ङ्ग धनुष्य सज्ज करून त्यांच्याशीं युद्ध करण्यास सिद्ध होऊन उभा राहिला ॥ ३२ ॥ मग आमचा तो सोन्यानें मढविलेला रथ दारुक सारथ्यानें हांकिला आणि हे द्रौपदि, ते राजे पाहात असतां, हरिणांसमोरून जसा सिंह निघून जातो, तसा तो भगवान् तेथून निघून गेला ॥ ३३ ॥ तेव्हां त्यांतील कित्येक राजे त्याला वाटेंत अडविण्यासाठीं सिद्ध होऊन आडवे आले. त्यांनीं आपलीं धनुष्यें वर उचललीं व युद्धाची सिद्धता केली; पण कुत्र्यांनीं सिंहाला अडविण्याचा प्रयत्न करावा तसाच तो प्रकार होता ॥ ३४ ॥ कारण श्रीकृष्णाच्या शार्ङ्ग धनुष्यापासून सुटणाऱ्या बाणांच्या वर्षावानें कित्येकांचे हात, पाय, माना इत्यादि अवयव तुटून पडले; कित्येक ठार झाले व इतर राजे पळून गेले ! ॥ ३५ ॥ एवढें झाल्यावर तो यदुनायक श्रीकृष्ण द्वारकानगरीजवळ आला. त्याच्या सन्मानार्थ ती नगरी शृंगारिली होती. तींत सर्वत्र छत्रें, ध्वज, पताका व चित्रें लावून ठिकठिकाणीं तोरणें उभारिलीं होतीं. त्या द्वारकेचें माहात्म्य पृथ्वीवरच काय पण स्वर्गातहि प्रसिद्ध होतें. तेथें आल्यावर भगवान् सूर्यनारायण जसा आपल्या मंडळांत शिरतो तसाच श्रीकृष्णानें त्या द्वारका नगरींत प्रवेश केला ॥ ३६ ॥ माझ्या पित्यानें स्नेही, संबंधी व बांधव यांचा सत्कार केला व मूल्यवान् वस्त्रें, अलंकार, शय्या, आसनें इत्यादि साहित्य, तशाच सर्व वैभवानें युक्त अशा दासी, योद्धे, हत्ती, रथ व घोडे आणि भारी मोलाचीं शस्त्रास्त्रें हीं श्रीकृष्णाला भक्तिपूर्वक अर्पण केलीं ॥३७॥३८॥ अशा रीतीनें अष्टनायिका आम्ही त्या परमात्म्याच्या दासी झालों. आम्ही इतर सर्व इच्छा सोडून त्याच्या प्राप्तीसाठीं जें तप केलें, त्याचें हें फळ होय ' ॥ ३९ ॥

इतर स्त्रिया म्हणाल्या, ' भौमासुराला परिवारासह श्रीकृष्णानें ठार केल्यावर त्याला कळून आलें कीं, त्या भौमासुरानें पूर्वी दिग्विजय करून जिंकिलेल्या राजांच्या हजारों कन्यांना कोंडून ठेविलें आहे. तेव्हां तेथून त्यानें आमची सुटका केली आणि संसारसागरांतून प्राणिमात्रास सोडविणाऱ्या अशा त्या परमात्म्याच्या चरणकमलांचें आम्हीं नित्य ध्यान करीत असल्यामुळें त्या पूर्णकाम भगवंतानें आमच्याशीं विवाह केला ॥ ४० ॥ हे पतिव्रते द्रौपदि, आतां आम्हांला साम्राज्य, स्वराज्य, भौज्य, वैराज्य, पारमेष्ठ्य, यांचीचशी काय पण प्रत्यक्ष मोक्षाची किंवा श्रीकृष्णाच्या पायांचीहि इच्छा राहिली नाहीं ॥ ४१ ॥ आम्हीं आतां एवढेंच मागतों कीं, लक्ष्मीच्या स्तनांवरील केशराच्या सुवासानें

सुवासिक झालेली त्या गदाधारी भगवंताच्या कांतियुक्त चरणांवरील धूळ आम्हांला मस्तकीं धारण करण्यास नित्य मिळावी ॥ ४२ ॥ कारण गोपी, भिल्लिणा, गवत, वेली आणि गोप हे देखील गाई चारणाऱ्या त्या महात्म्या श्रीकृष्णाच्या पादस्पर्शाचीच केवळ इच्छा करीत असतात !' ॥ ४३ ॥

त्र्यायशींवा अध्याय समाप्त

---

# अध्याय ८४ वा

शुकाचार्य म्हणतात, हे परीक्षित् राजा, श्रीकृष्णाच्या स्त्रियांनीं आपल्या विवाहाचा हा जो वृत्तान्त सांगितला त्यावरून त्यांचें प्रेम, सर्वान्तर्यामी वास करणारा व सर्व दुःख निवारण करणारा असा जो श्रीकृष्ण त्याच्या ठिकाणीं पूर्णपणें जडलेलें पाहून कुंती, गांधारी, द्रौपदी, सुभद्रा, त्याचप्रमाणें इतर राजस्त्रिया व कृष्णभक्त गोपी या सर्वांना मोठा विस्मय वाटला आणि त्यांचे नेत्र आनंदाश्रूंनीं भरून गेले ॥ १ ॥ अशा रीतीनें तेथें स्त्रियांचें स्त्रियांशीं व पुरुषांचें पुरुषांशीं संभाषण चाललें असतां त्या राम-कृष्णांच्या दर्शनासाठीं कित्येक ऋषि तेथें आले ॥ २ ॥ त्यांत व्यास, नारद, च्यवन, देवल, असित, विश्वामित्र, शतानन्द, भरद्वाज, गौतम, परशुराम व त्याचे शिष्य, वसिष्ठ, गालव, भृगु, पुलस्त्य, कश्यप, अत्रि, मार्कंडेय, बृहस्पति, द्वित, त्रित, एकत, ब्रह्मदेवाचा पुत्र अंगिरा, अगस्त्य, याज्ञवल्क्य हे व इतर वामदेव आदिकरून ऋषि मुख्य होते ॥ ३ ॥ ४ ॥ ॥ ५ ॥ त्या, ऋषींना पाहतांक्षणींच आपआपल्या आसनांवर बसलेले युधिष्ठिरप्रमुख पांडव, तसेच श्रीकृष्ण व बळराम हे तत्काल उठून उभे राहिले आणि सर्व जग ज्यांना वंदन करितें अशा त्या ऋषींना त्यांनीं लवून नमस्कार केला ॥ ६ ॥ सर्वांनीं त्यांचें यथाविधि पूजन केलें; त्याचप्रमाणें श्रीकृष्ण व बळराम यांनीं त्यांचें स्वागत करून त्यांना आसन दिलें व त्यांचे पाय धुऊन व त्यांना गंध, फुलें, धूप, उटी, इत्यादि अर्पण करून त्यांचें पूजन केलें ॥ ७ ॥ याप्रमाणें पूजन झाल्यावर ते सर्व ऋषि आसनांवर स्वस्थ बसले असतां, धर्मरक्षणासाठींच ज्यानें अवतार घेतला आहे असा तो भगवान् श्रीकृष्ण, त्या मोठ्या सभेंतील सर्व सभासद शांतपणें ऐकत असतां त्या ऋषींना उद्देशून बोलूं लागला ॥ ८ ॥

भगवान् म्हणाले, ' हे मुनि हो, तुमच्या दर्शनानें आमच्या जन्माचें पूर्ण फळ आज आम्हांला मिळालें. आज आमचा जन्म खरोखर सफल झाला. कारण तुम्हां महायोग्यांचें दर्शन देवांनाहि घडणें कठीण आहे. मग ज्यांची तपश्चर्या पुरी नाहीं, जे मूर्तीलाच प्रत्यक्ष देव समजतात अशा माणसांना तुमचें दर्शन घडून तुमच्या पायांचा स्पर्श होणें, तुमच्याशीं कुशलप्रश्नपूर्वक नम्रपणें भाषण करणें व पूजा आदिकरून तुमचा सत्कार करावयास मिळणें हें कसें शक्य असणार ? ॥ ९ ॥ १० ॥ गंगादि जलरूपी तीर्थे किंवा मातीच्या अथवा पाषाणांच्या मूर्ति यांची उपासना केल्यानें त्याचें फळ तत्काळ केव्हांहि मिळत नाहीं, फारच दीर्घावधीनें तें मिळण्यासारखें असतें; पण साधूंचें नुसतें दर्शन होतांच ते मनुष्यांना पवित्र करतात ॥ ११ ॥ अग्नि, सूर्य, चंद्र, तारका, पृथ्वी, आप, आकाश, वायु, वाणी अथवा मन इत्यादि देवता स्वतःच भेदबुद्धि उत्पन्न करणाऱ्या असल्यामुळें त्यांच्या उपासनेनें पापांचा नाश होण्यास पुष्कळ कालावधि लागतो; पण ज्ञानी अशा साधूंची क्षणमात्र जरी सेवा घडली

तरी सर्व पापाचा नाश होतो ॥१२॥ कफ, पित्त व वात या तीन धातूंनीं बनलेला देह म्हणजेच आत्मा असें जो मानितो, स्त्री-पुत्र आदिकरून हीं आपलीं असें ज्याला वाटतें, दगडमातीच्या मूर्ति म्हणजे पूज्य देव अशी ज्याची समजूत असते आणि केवळ पाणी म्हणजे तीर्थ अशी ज्याची कल्पना आहे. पण तो जर ज्ञानी पुरुषाच्या पवित्रतेची योग्यता जाणत नाहीं, तर तो पशूंमधील भारवाहक असा गाढवच होय !' ॥ १३ ॥

शुकाचार्य म्हणतात, याप्रमाणें अकुंठित बुद्धीच्या भगवान् श्रीकृष्णाचें भाषण ऐकून त्याचा संबंध नीट रीतीनें न कळल्यामुळें त्या ब्राह्मणांचीं मनें गोंधळून गेलीं आणि कांहीं उत्तर न देतां स्वस्थ बसले ॥ १४ ॥ श्रीकृष्ण सर्वांचा नियन्ता असतां सेवकासारखा अंकित झाला या गोष्टीचा पुष्कळ विचार केल्यावर त्यांना असें समजून आलें कीं, लोकहितासाठीं त्यानें हें स्वरूप घेतलें आहे. तेव्हां ते हंसत हंसत त्या जगद्गुरूशीं बोलूं लागले ॥१५॥

ते म्हणाले, 'आम्ही तत्त्ववेत्त्यांमध्यें श्रेष्ठ व प्रजापतीचेहि नियंते असे असतांही तुझ्या मायेनें मोहित झालों; कारण तूं भगवान् मनुष्यासारखा कर्मे करीत असल्यामुळें तुझें वास्तविक रूप झांकून गेलें असून तूं अंकिताप्रमाणें वागत आहेस. तेव्हां तुझी लीला किती अद्भुत म्हणून सांगावी ! ॥१६॥ निरपेक्ष असा तूं भगवान् एकच असून अनेकस्वरूपी होतोस व आपल्या स्वतःच्याच सामर्थ्यानें हें विश्व उत्पन्न करून त्याचें रक्षण करितोस व शेवटीं त्याचा लयही करितोस. तथापि त्या कर्मांनीं तूं बद्ध होत नाहींस. पृथ्वी एकच असतां घटपटादि पदार्थांच्या योगें जशी अनेकरूपी दिसते, तसाच हा भगवंताच्या चरित्राचा प्रकार होय; तो वास्तविक नसून केवळ अनुकरणासाठींच आहे ॥ १७ ॥ तथापि, हे भगवंता, अवश्य असेल त्या वेळीं आपल्या भक्तांच्या रक्षणासाठीं व दुष्टांच्या दमनासाठीं तूं सत्त्वगुणाचा अवलंब करून अवतार घेतोस आणि त्रिकालाबाधित अशा वेदमार्गाचें रक्षण करितोस. हे भगवंता, चार वर्ण व चार आश्रम हें ज्याचें स्वरूप आहे, असा जो श्रेष्ठ पुरुष तोच तूं आहेस ॥१८॥ वेद हे तुझे पवित्र असें अंतरंग होय. तपश्चर्या, वेदाध्ययन व इंद्रियदमन यांच्या योगानें त्या वेदांमध्यें व्यक्त होणारें कार्यकारणरूपापलीकडील असें जें तुझें श्रेष्ठ स्वरूप तें कळून येतें ॥१९॥ हे ब्रह्मरूपी श्रीकृष्णा, तुझें ज्ञान होण्याचें साधन केवळ वेद होत, व ते वेद ब्राह्मणांच्या आश्रयानें असल्यामुळें तूं ब्राह्मणवर्गाचा सत्कार करितोस आणि म्हणून ब्राह्मणांच्या हितकर्त्यांमध्यें तूंच श्रेष्ठ आहेस ॥ २० ॥ आज आमच्या जन्माचें सार्थक्य झालें. आमची विद्या, तपश्चर्या व ज्ञान यांचेंहि आम्हांला पूर्ण फळ मिळालें. कारण सज्जनांचा आश्रय असा जो तूं त्या तुझ्या संगतीचा लाभ आम्हांला मिळाला. तुझ्या ठिकाणीं कल्याणाची पराकाष्ठा आहे ॥ २१ ॥ अकुंठित बुद्धीचा व आपल्या योगमायेनें आपला महिमा झांकून टाकणारा असा जो तूं भगवान् श्रीकृष्ण, त्या तुला नमस्कार असो ॥२२॥ तूं कालस्वरूपानें विश्वाचा नियन्ता असून, तुझें स्वरूप मायेच्या पडद्यानें झांकून गेल्यामुळें हे राजे तर तुला जाणत नाहींतच; पण तुझ्याशीं एकत्र क्रीडा करणारे जे यादव त्यांनाहि तुझ्या खऱ्या स्वरूपाची कल्पना नाहीं ॥ २३ ॥ झोंपीं गेलेला पुरुष ज्याप्रमाणें

स्वप्नांत दिसणाऱ्या पदार्थांना खरे मानितो आणि नांवानेंच केवळ अस्तित्वांत असलेल्या व मनानेंच केवळ भासणाऱ्या अशा त्या आपल्या स्वरूपाहून निराळें असें दुसरें कांहीं आपलें वास्तविक स्वरूप असेल असें जाणत नाहीं, त्याप्रमाणें नांवानेंच अस्तित्वांत असलेले जे विषय त्यांच्याविषयीं मायेच्या योगानें इन्द्रियांची जी प्रवृत्ति होते तीमुळें त्याचें मन घोटाळून जातें आणि त्याची ज्ञानशक्ति लुप्त होऊन तो परमेश्वराचें सत्यस्वरूप जाणत नाहींसा होतो ॥२४॥२५॥ अशा प्रकारचा जो तूं भगवान् त्या तुझें, पापाच्या नदीचाहि नाश करणारें पवित्र तीर्थाचेंहि उगमस्थान असें चरणकमल उत्तम प्रकारें परिणत झालेल्या योगसमाधीच्या योगें आमच्या हृदयांत आज स्थिर झालेलें आम्हीं पाहिलें. तुझ्या ठिकाणीं उत्कट भक्ति केल्यानें वासनामय असा लिंगकोश नष्ट होऊन तुझे भक्त तुझ्या स्थानीं प्राप्त होतात. यास्तव हे भगवन्, तुझे भक्त अशा आम्हांवर तूं कृपा कर !' ॥ २६ ॥

शुकाचार्य म्हणतात, हे राजा, त्या मुनींनीं याप्रमाणें भाषण करून श्रीकृष्णाचा, तसाच धृतराष्ट्र व युधिष्ठिर यांचाही निरोप घेतला व ते आपल्या आश्रमांस जाण्यासाठीं सिद्ध झाले ॥ २७ ॥ त्या वेळीं महाकीर्तिवान् असा वसुदेव त्यांच्याजवळ आला व त्यांना नमस्कार करून आणि त्यांचे पाय धरून व्यवस्थित रीतीनें त्यांना विचारूं लागला ॥२८॥

वसुदेव म्हणाला, ' हे ऋषि हो, सर्व देवता तुमच्या ठिकाणीं वास करीत असतात; तुम्हांला मी नमस्कार करितों. तुम्हीं माझें भाषण कृपा करून ऐकून घ्या आणि कर्माच्या योगानें कर्माचें निराकरण कोणत्या रीतीनें होईल तें मला सांगा ' ॥ २९ ॥

हें वसुदेवाचें भाषण ऐकून, ऋषींना उद्देशून नारद म्हणाले, ' हे ऋषि हो, श्रीकृष्णासारखा ज्ञाननिधि जवळ असतां, त्याला मूल समजून वसुदेवानें कर्माचा निरास कसा होईल हें जाणण्यासाठीं आत्मकल्याणाच्या दृष्टीनें आपल्याला प्रश्न केला यांत कांहीं आश्चर्य नाहीं ॥ ३० ॥ उघडच आहे कीं, मनुष्यांमध्यें निकट परिचय हा अनादराला कारण होत असतो. ज्याप्रमाणें गंगातीरीं राहणारा मनुष्य पवित्र होण्यासाठीं गंगेचें पाणी सोडून दुसऱ्या पाण्याकडे जातो तसाच हा प्रकार होय ॥ ३१ ॥ या श्रीकृष्णपरमात्म्याचें ज्ञान सृष्टीच्या उत्पत्तीपासून अंतापर्यंतच्या काळानेंहि, त्याच्या स्वतःकडून अथवा दुसऱ्याकडून किंवा इतर कोणत्याहि कारणानें नष्ट होणारें नाहीं ॥ ३२ ॥ अशा रीतीनें कोणत्याहि प्रकारें ज्याचा आत्मस्वरूपाचा अनुभव नष्ट होत नाहीं, अशा एकच एक परमेश्वररूप असलेल्या श्रीकृष्णाला, सामान्य माणूस रागद्वेषादि विकार, कर्मे, कर्माचे परिणाम, सत्त्वादि गुणांचीं कार्ये, प्राणादिक शरीरबंधनें इत्यादि आपल्याच परिवारानें झांकलेला असा मानणारच. सूर्याच्या योगेंच मेघ, धुकें किंवा ग्रहण हीं उत्पन्न होतात; पण या मेघादि गोष्टींनींच सूर्य झांकून जातो असें सामान्य माणसाला वाटतें कीं नाहीं ? ( पण वस्तुतः सूर्य कांहीं मेघादिकांनीं जसा झांकून जाणारा नव्हे तसा परमात्मा श्रीकृष्णहि रागादि विकार, इंद्रियें इत्यादिकांनीं बद्ध होणारा नव्हे) ' ॥ ३३ ॥ राजा, असें हें नारदाचें भाषण ऐकून ऋषी वसुदेवाला म्हणाले ॥ ३४ ॥ ' बा वसुदेवा, कर्माच्या योगें कर्माचा निरास करण्याचा उपाय साधूंनीं सांगितला आहे. तो असा कीं, सर्व यज्ञांचा स्वामी

जो विष्णु त्याचीच यज्ञद्वारें श्रद्धापूर्वक पूजा करावी ' ॥ ३५ ॥ चित्ताला शांति देण्याचा, मोक्षप्राप्तीचा व विहित धर्माचा हा सुलभ व मनाला आनंद देणारा मार्ग, ज्ञानी पुरुषांनीं शास्त्रदृष्टीनें सांगितला आहे ॥ ३६ ॥ शुद्ध मार्गानें द्रव्य मिळवून श्रद्धापुर:सर परमेश्वराचें पूजन करणें, हाच गृहस्थाश्रमी द्विजांना कल्याणप्राप्तीचा मार्ग म्हणून सांगितला आहे ॥ ३७ ॥ हे वसुदेवा, यज्ञांत दान करून मनुष्यानें धनाची इच्छा सोडून द्यावी. घरांतील उपभोगाचे विषय भोगून स्त्रीपुत्रांवरील आसक्ति सोडावी आणि स्वर्गादि लोक कालानें नष्ट होणारे आहेत असा विचार करून त्या लोकांची वासना ज्ञानी पुरुषानें टाकून द्यावी. सर्व ज्ञानी पुरुषांनीं आपल्या सर्व वासनांचा प्रथम गांवांत त्याग करून मगच तपासाठीं अरण्याचा मार्ग धरिलेला आहे ॥ ३८ ॥ हे वसुदेवा, द्विजवर्णाचा पुरुष जो जन्मास येतो तो देव, ऋषि आणि पितर या तिघांचीं तीन ऋणें घेऊन येतो. तीं ऋणें फेडण्याचे मार्ग म्हणजे यज्ञ, वेदाध्ययन व पुत्रोत्पादन हे होत. या मार्गांनीं हीं ऋणें फेडल्यावांचून जो घरदारादि संसाराचा त्याग करतो, त्याचा अध:पात होतो ॥ ३९ ॥ हे महाबुद्धिवान् वसुदेवा, तूं ऋषि व पितर अशा दोन ऋणांतून आतां मुक्त झालेला आहेस; तेव्हां आतां यज्ञ करून देवांच्या ऋणांतून मुक्त हो, आणि अशा रीतीनें सर्वऋणमुक्त झाल्यावर गृहाचा त्याग कर ! ॥ ४० ॥ वसुदेवा, खरोखरच तूं मोठ्या भक्तीनें विश्वनियंत्या श्रीहरीचें पूजन केलें होतेंस, म्हणूनच तो तुझ्या पोटीं पुत्ररूपानें जन्माला आला ! ' ॥ ४१ ॥

शुकाचार्य म्हणतात, राजा, असें तें ऋषींचें भाषण ऐकून थोर मनाच्या वसुदेवानें त्या ऋषींना नमस्कार करून प्रसन्न केलें आणि लगेच यज्ञ करण्याचें ठरवून पुरोहित म्हणून त्यांची त्यानें योजना केली ॥ ४२ ॥ हे परीक्षित् राजा, याप्रमाणें विहित मार्गानें पुरोहित म्हणून योजिलेल्या त्या ऋषींनीं, त्या धर्मपरायण वसुदेवाकडून त्याच स्यमंतपंचक क्षेत्रामध्यें उत्तम प्रकारचें साहित्य जमवून यज्ञ करविले ॥ ४३ ॥ हे राजा, यज्ञाची दीक्षा चालू झाली असतां यादवराजांनीं स्नानें करून गळ्यांत कमळांच्या माळा घातल्या व उत्तम वस्त्रें परिधान करून अलंकारहि घातले ॥ ४४ ॥ त्यांच्या स्त्रियाहि सुंदर वस्त्रें नेसून, गळ्यांत सुवर्णाचे अलंकार घालून, अंगाला उट्या लावून आणि हातांत पूजेचें साहित्य घेऊन आनंदित अंत:करणानें यज्ञमंडपांत आल्या ॥ ४५ ॥ त्या वेळीं मृदंग, पडघम, शंख, भेरी, आनक इत्यादि वाद्यांचा घोष चालू झाला नट व नर्तक्या यांचा नाच होऊं लागला, सूत व मागध हे स्तुतिपाठ करूं लागले आणि सुरेल गळ्याच्या गंधर्वस्त्रियांनीं आपल्या पतीसह गायन करण्यास आरंभ केला ॥ ४६ ॥ मग वसुदेवाच्या डोळ्यांत काजळ घालून व त्याच्या अंगाला लोणी लावून ऋषींनीं त्याच्या अठरा स्त्रियांसह त्याला, रोहिण्यादि नक्षत्ररूप स्त्रियांसह चंद्राला अभिषेक करावा त्याप्रमाणें विधिपुर:सर अभ्यंग स्नान घातलें ॥ ४७ ॥ त्या वेळीं यज्ञदीक्षा घेतलेला व मृगचर्म पांघरलेला तो वसुदेव, सुंदर वस्त्रें परिधान करून ज्यांच्या हातांत सुवर्णकंकणें, गळ्यांत मोत्यांचे हार, पायांत पैंजणें व कानांत कुंडलें घातलीं आहेत अशा स्त्रियांसह फारच शोभूं लागला ॥ ४८ ॥ शुकाचार्य म्हणतात, हे राजा, त्या वेळीं रेशमी वस्त्रें व रत्नालंकार धारण केलेले वसुदेवाच्या यज्ञांतील ते

ऋत्विज, सभासदांसह इंद्राच्या यज्ञांतील पुरोहितांप्रमाणें शोभूं लागले ॥ ४९ ॥ त्या वेळीं प्राणिमात्राचे नियन्ते असे, बळराम व कृष्ण हे सुद्धां आपले बांधव, पुत्र व स्त्रिया व आपापलें वैभव यांनीं युक्त असे शोभत होते ॥ ५० ॥ त्या प्रसंगीं वसुदेवानें अग्निहोत्र-प्रमुख प्राकृत व वैकृत यज्ञांचें अनुष्ठान केलें व प्रत्येकांत विधिपुर:सर यज्ञांतील पुरोडाश, त्यांचे मंत्र व त्यांचा विधि यांचा नियंता असा जो परमेश्वर त्याचें पूजन केलें ॥५१ ॥ मग त्या धनसंपन्न वसुदेवानें योग्य काळीं पुरोहितांची विधियुक्त पूजा करून अलंकृत केलेल्या गाई, भूमि व कन्या याप्रमाणें योग्य अशा त्या अलंकारभूषित ऋषींना दक्षिणा म्हणून अर्पण केल्या ॥ ५२ ॥ इतकें झाल्यावर त्या ऋषींनीं त्याच्याकडून पत्नीसंयाज, अवभृथ-स्नान इत्यादि विधि करवून त्याच्यासह सर्वांनीं परशुराम डोहांमध्यें स्नानें केलीं ॥ ५३ ॥ वसुदेवानें स्नान केल्यावर स्तुतिपाठक व नाचणाऱ्या स्त्रिया यांना अलंकार व वस्त्रें दिलीं आणि स्वत: अलंकार घालून कुत्र्यामांजरांपासून तों तिन्ही वर्णांतील लोकांपर्यंत सर्वांना अन्नदानानें संतुष्ट केलें ॥ ५४ ॥ एवढें झाल्यावर त्यानें आपल्या बांधवांना त्यांच्या स्त्रीपुत्रांसह मोठमोठे अहेर केले. या बंधूंत विदर्भ, कोसल, कुरु, काशि, केकय व सृंजय या देशांचे राजे प्रमुख होते ॥ ५५ ॥ सभासद, पुरोहित, देवगण, मनुष्य, भूतें, पितर व स्तुतिपाठक यांनाहि त्यानें अहेर करून संतुष्ट केलें, तेव्हां ते सर्वजण श्रीकृष्णाची आज्ञा घेऊन वसुदेवाच्या यज्ञसमारंभाची वाखाणणी करीत तेथून निघून गेले ॥ ५६ ॥ धृतराष्ट्र, विदुर, धर्म, भीम, अर्जुन, भीष्म, द्रोण, कुंती, नकुल, सहदेव, नारद, भगवान् व्यास, तसेच इतर स्नेही, आप्त व बांधव हे जेव्हां आपल्या यादवबंधूंना आलिंगन देऊन निरोप घेऊं लागले, तेव्हां प्रेमानें त्यांचें हृदय थबथबून गेलें. ते तेथून मोठ्या कष्टानें आपल्या देशीं जावयास निघाले. इतर लोकांचीहि तीच स्थिति झाली ॥ ५७ ॥ ५८ ॥ वसुदेवानें नंदाचीहि सर्व गोपांसह मोठ्या मानानें पूजा केली. नंतर श्रीकृष्ण, बळराम, उग्रसेन इत्यादिकांच्या प्रेमामुळें, नंद तेथें आणखी कांहीं दिवस राहिला ॥ ५९ ॥ याप्रमाणें वसुदेवाच्या मनांत आलेली महासागरासारखी कठीण अशी कल्पना सुलभपणें सिद्धीस गेल्यामुळें आनंदमग्न झालेला तो वसुदेव, इष्टमित्रांसह बसला असतां नंदाचा हात आपल्या हातांत धरून त्याच्याशीं बोलूं लागला ॥ ६० ॥

वसुदेव म्हणाला, ' नंदराजा, स्नेह नांवाचा जो पाश ईश्वरानें निर्माण केला आहे तो मोठ्या योग्यांना व शूर पुरुषांनाहि तोडावयास फार कठीण आहे असें मला वाटतें ॥६२॥ पाहा ना, अत्यंत चांगुलपणानें तुम्हीं आमच्यावर, ज्या उपकारांचा मोबदला आपणांला मिळेल अशी किंचित्‌हि कल्पना नसतां जे उपकार केले, त्यांची फेड आम्हांला कधींहि करतां येणार नाहीं. असें असतांहि आम्ही ते तुमचे उपकार जाणत नाहीं; परंतु तुम्ही मात्र आमच्यावरील आपलें प्रेम केव्हांहि काढून घेतलें नाहीं ॥ ६२ ॥ भाऊराया, पूर्वी एक आम्हांला सामर्थ्य नसल्यामुळें आम्हीं तुमच्या हिताची कोणतीहि गोष्ट करूं शकलों नाहीं; पण आतां तर तशी स्थिति नाहीं ना ? पण आतां आम्हीं संपत्तीच्या मदानें अंध झाल्यामुळें तुम्हीं पुढें उभे असतांहि आमच्या हातून तुमचें कांहीं कार्य होत नाहीं

॥६३॥ तेव्हां, हे नंदराया, तात्पर्य एवढेंच कीं, आत्यंतिक कल्याणाची इच्छा करणाऱ्या पुरुषाला राज्यवैभव मिळूंच नये हें खरें, त्या वैभवामुळें मनुष्याची दृष्टि आंधळी होऊन आपले आप्त व बांधव हेहि त्याला दिसत नाहींसे होतात.' ॥ ६४ ॥

शुकाचार्य म्हणतात, ' याप्रमाणें नंदाचे उपकार आठवल्यामुळें वसुदेवाचें मन सद्गदित झालें आणि डोळ्यांतून आसवें येऊन तो रडूं लागला ॥ ६५ ॥ नंतर आपला मित्र वसुदेव. तसेंच कृष्ण आणि बळराम यांच्या प्रेमळ हेतूनें, आज उद्यां असें करितां करितां तेथें तीन महिने राहिला व यदूंनींहि त्याचा त्या अवधींत चांगला मान ठेविला ॥६६॥ नंतर ज्याचे सर्व मनोरथ पूर्ण झाले आहेत असा तो नंद आपलीं सर्व गुरें घेऊन व आपल्याला मिळालेले मूल्यवान् अलंकार, रेशमी वस्त्रें आणि तसेंच दुसरे मूल्यवान् अहेर घेऊन तेथून बंधुवर्गासह निघाला ॥६७॥ वसुदेव, उग्रसेन, कृष्ण, उद्धव व बळराम इत्यादिकांनीं दिलेल्या भेटी घेऊन तो नंद निघाला असतां यादवांनीं त्याच्या समागमें चालत जाऊन त्याची पाठवणी केली ॥६८॥ याप्रमाणें नंद, गोप व गोपी तेथून निघालीं खरीं; पण श्रीकृष्णाच्या चरणकमलावर जडलेलें त्यांचें चित्त मात्र त्यांना बरोबर घेतां आलें नाहीं; तर केवळ देहानें तीं मथुरेस गेलीं ॥६९॥ याप्रमाणें नंद आदिकरून सर्व बांधव आपआपल्या घरीं परत गेले असतां पावसाळ्याचा समय आला, हें पाहून कृष्ण हाच ज्यांचें दैवत असे ते यादव पुनः द्वारकानगरींत राहावयासाठीं आले ॥७०॥ तेथें आल्यावर त्यांना जे जे भेटले त्यांना तीर्थयात्रेमध्यें झालेल्या आप्तसंबंधी लोकांच्या भेटी व वसुदेवाच्या यज्ञसमारंभाची हकीकत इत्यादि सर्व वृत्त त्यांनीं सांगितलें ॥७१ ॥

**चौऱ्यायशींवा अध्याय समाप्त**

---

# अध्याय ८५ वा

शुकाचार्य म्हणतात, हे राजा, एकदां बळराम व कृष्ण असे उभयतां वसुदेवापाशीं येऊन नमस्कार करून उभे राहिले असतां, त्या आपल्या पुत्रांचें अभिनंदन करून वसुदेव प्रेमानें त्यांच्याशीं बोलूं लागला ॥ १ ॥ आपल्या दोन्ही पुत्रांच्या अद्‌भुत पराक्रमाचें दिग्दर्शन करणारें ऋषींचें भाषण त्यानें ऐकिलें असल्यामुळें, त्याच्या मनांत बळराम व कृष्ण यांच्या पराक्रमांनीं मोठी श्रद्धा उत्पन्न झाली होती. तो त्यांना उद्देशून म्हणाला ॥ २ ॥ ' हे महायोगिन् श्रीकृष्णा, हे त्रिकालाबाधित बळरामा, या सृष्टीचे उत्पादक असे जे श्रेष्ठ प्रधान पुरुष तेच प्रत्यक्ष तुम्हीं आहां, हें मीं ओळखिलें ॥ ३ ॥ हे पुत्रांनो, या सृष्टीच्या उत्पत्तिक्रियेला जीं कारणें लागतात तीं सर्व तुम्हींच आहां. त्या क्रियेचें स्थळ, कर्ता व साधन, ज्यांतून तिला लागणारें द्रव्य काढून घ्यावयाचें तें, ज्याच्या संबंधानें ती क्रिया होते तें, ज्याच्यासाठीं ती होते तें, त्या क्रियेला लागणारें द्रव्य व त्या क्रियेनें होणारा पदार्थ, त्या क्रियेची रीत व तिचा काळ हीं सर्व तुम्हीच असून, प्रधान व पुरुष या दोहोंचेंहि नियंतृत्व तुमच्याकडे आहे ॥ ४ ॥ हे इंद्रियांच्या नियन्त्या श्रीकृष्णा, तूं स्वतः जन्मरहित आहेस पण अनेक प्रकारचें विश्व तूं स्वतः उत्पन्न केलें असून त्या आत्मस्वरूपी विश्वांत तूं आपणच शिरून प्राणरूपानें व जीवरूपानें त्याला सावरून धरितोस ॥ ५ ॥ ज्या प्राणादिकांमुळें विश्वाची उत्पत्ति होते व त्या प्राणादिकांमध्यें जी शक्ति दिसते, ती त्यांची नसून त्यांच्याहून अत्यंत श्रेष्ठ असा जो तूं त्या तुझीच होय. कारण हे प्राणादिक सर्वथा तुज परमात्म्याच्याच तंत्रानें चालणारे असून त्या परमात्म्याचें त्यांच्याशीं कांहींच साम्य नाहीं. हालचाल करणाऱ्या त्यांची ती हालचाल ही केवळ चेष्टाच होय ॥६॥ चंद्र, अग्नि व सूर्य यांची कांति, तेज व प्रकाश, तसेंच नक्षत्रें व वीज यांच्या क्षणमात्र दिसणाऱ्या चकाकीवरून प्रतीतीस येणारें त्यांचें अस्तित्व,पर्वतांचा स्थिरपणा,भूमीचा धर्म गंध या सर्व गोष्टी म्हणजे वस्तुतः तूंच आहेस ॥७॥ हे परमेश्वरा, पाण्यांत जो तृप्तीचा व जीवनाचा गुण आहे तो, तें पाणी व त्याचा धर्म जो रस म्हणजे चव हीं सर्व तूंच आहेस. हे विश्वनियन्त्या, इंद्रियें,प्राण व शरीर यांची शक्ति व हालचाल,वायूची गति इत्यादि गोष्टी तुझ्याचमुळेंआहेत ॥८॥दिशा-दिशांमधील पोकळी,त्या मूळ दिशा,आकाश,त्या आकाशाचा आश्रय जो स्फोट म्हणजे ध्वनीचें मूळ सूक्ष्म स्वरूप तें, तसेंच त्याचीं स्थूल होणारीं रूपें म्हणजे नाद, ओंकार व पदार्थांना निरनिराळीं नांवें देणारें वर्ण, हीं सर्व तूंच आहेस ॥९॥ इंद्रियांची प्रेरकशक्ति तूंच असून, देव व त्यांची कृपा हीं सर्व तूंच आहेस बुद्धीचा ज्ञानरूपी गुण आणि जीवाच्या निरनिराळ्या अवस्थांत नीट संभाळ राखणारी स्मरणशक्ति हीं तुझींच रूपें होत ॥ १० ॥ भूतांमध्यें तूंच तमोगुणस्वरूपी अहंकार असून इंद्रियांतील राजस अहंकार तूंच आहेस, देवांमध्यें असणारा सात्त्विक अहंकार तूंच असून जीवांना संसारांत घालणारी प्रकृति

देखील तूंच आहेस ॥ ११ ॥ या विश्वांतील सर्व नश्वर पदार्थांत जो शाश्वतपणा आहे तें तुझेंच स्वरूप होय. पृथिव्यादि द्रव्यांपासून झालेल्या भिन्न भिन्न पदार्थांत टिकाऊ रूप जसें पृथ्वी हेंच असतें, तसेंच हें होय ॥ १२ ॥ सत्त्व, रज व तम हे गुण आणि त्यांच्यापासून झालेले कार्यरूप पदार्थ, हे सर्व साक्षात् तूं जो परमात्मा त्याच्याच स्वरूपांत योगमायेनें कल्पिलेले होत ॥ १३ ॥ तात्पर्य, हे जे विश्वांतील भिन्न भिन्न पदार्थ, ते वस्तुतः अस्तित्वांतच नाहींत. ज्या वेळीं ते कल्पिले जातात, तेव्हां ते तुझ्या स्वरूपावर अधिष्ठित असून तूं त्यांत अंतर्यामिरूपानें व्यापून असतोस; पण एरवीं तूं कसलेहि व्यवहार न करणाराच आहेस ॥ १४ ॥ सत्त्वादि गुणांचा प्रवाह म्हणजे जो हा संसार त्यांत सर्वांमध्यें अंतर्यामिरूपानें वास करणाऱ्या परमात्म्याचें सूक्ष्म स्वरूप सामान्य लोक जाणत नाहींत व अज्ञानामुळें ते आपल्या कर्मांनीं बद्ध होऊन संसारांत पडतात ॥ १५ ॥ हें मनुष्यशरीर मिळण्यास फार कठीण आहे. पण तें उत्तम प्रकारचें शरीर आम्हांला सहजगत्या मिळालें असता आम्हीं आपल्या हिताच्या कामींच, तुझ्या मायेनें मोहित होऊन असावध राहिलों आणि हे परमेश्वरा, तशा स्थितींत आजवर आमचें आयुष्य निघून गेलें ॥ १६ ॥ हा देह म्हणजेच मी आणि त्या देहापासून उत्पन्न होणारे वंशज म्हणजे माझे अंश असें वाटूं लावणाऱ्या प्रेमपाशांनीं हें सारें जग तूं बांधून टाकिलें आहेस ॥ १७ ॥ तुम्हीं आमचे पुत्र नसून प्रकृति व पुरुष यांचे नियन्तेच प्रत्यक्ष आहां. तुम्हीं येथें जे अवतरलां आहां ते पृथ्वीला भारभूत झालेल्या क्षत्रियांचा नाश करण्यासाठीं असून तसें तुम्हीं पूर्वी म्हणालांहि होतां ॥ १८ ॥ हे श्रीकृष्णा, तूं दुःखितांचा कैवारी आहेस. तुझ्या चरणकमलाला मी आज शरण आलों आहें. कारण तें शरण आलेल्यांचें संसारभय नाहींसें करतें. आतां खरोखर झाली एवढी इंद्रियलालसा अगदीं पुरे झाली. कारण त्या लालसेमुळें मरणशील अशा शरीराच्या ठिकाणीं हाच आत्मा अशी बुद्धि होऊन तूं जो परमात्मा त्याच्या ठिकाणीं हा आपला पुत्र होय अशी भावना होते ॥ १९ ॥ खरोखर पूर्वीं सूतिकागृहांत तूं सांगितलें होतेंस कीं " मी वस्तुतः जन्मरहित असून आपल्या धर्माच्या रक्षणासाठीं तुमच्या पोटीं प्रतियुगीं जन्म घेतला. " हे विशालकीर्ते, तूं अनेक शरीरें धारण करून तीं पुनः आकाशाप्रमाणें अलिप्तपणें सोडून देतोस. तुज विश्वव्यापकाच्या ऐश्वर्ययुक्त योगमायेचें सौभाग्य कोणाला कळणार आहे ? ' ॥ २० ॥

शुकाचार्य म्हणतात, हे राजा, वसुदेव पित्याचें हें भाषण ऐकून यादवश्रेष्ठ भगवान् श्रीकृष्ण प्रेमानें नम्र झाला व त्यानें हंसत हंसत गोड शब्दांनीं त्याला उत्तर दिलें ॥ २१ ॥

तो म्हणाला, ' अहो तात, तुमचें हें भाषण अगदीं अर्थपूर्ण असून आम्हांला मान्य आहे. कारण या भाषणांत तुम्हीं आम्हां मुलांना उद्देशून सर्व तत्त्वज्ञानाचा उपदेश केला आहे ॥ २२ ॥ हे यादवश्रेष्ठ अशा ताता, मी, तुम्हीं, हे बळरामदादा आणि हे द्वारकावासी लोक, त्याचप्रमाणें हें स्थावरजंगमात्मक सर्व विश्व हीं सारीं ब्रह्मरूपच होत असें मानिलें पाहिजे ॥ २३ ॥ कारण आत्मा हा अगदीं एकच असून तो स्वयंप्रकाशित, शाश्वत, देहादिकांहून वेगळा व गुणांपासून अलिप्त असा आहे; तथापि त्याच्याचपासून

झालेल्या अनेक भूतांमध्यें त्यानेंच उत्पन्न केलेल्या गुणांच्या योगें तो अनेक प्रकारचा भासतो ॥ २४ ॥ आकाश, वायु, अग्नि, जल व पृथ्वी या भूतांमध्यें उपाधींच्या योगानें जसा अनेकपणा दिसून येतो, तसा हा एकच एक असलेला आत्मा देखील प्रगट होणें, गुप्त होणें, लहान असणें, मोठा होणें इत्यादि प्रकारांनीं अनेक वाटतो ' ॥ २५ ॥

शुकाचार्य म्हणतात, हे राजा, याप्रमाणें भगवंतानें वसुदेवाला सांगितलें असतां तें ऐकून वसुदेवाची भेदबुद्धि नष्ट झाली. आणि प्रसन्नचित्त होत्साता तो मौन धारण करून बसला ॥ २६ ॥ असो. हे परीक्षित् राजा, नंतर सर्व देवतास्वरूपी जी देवकी तिच्या ऐकण्यांत असें आलें कीं, मृत गुरुपुत्राला आपल्या पुत्रांनीं परत आणून दिलें. ही गोष्ट ऐकून तिला मोठा अचंबा वाटला ॥ २७ ॥ तिनें बळराम व कृष्ण यांना जवळ बोलावलें आणि कंसानें मारून टाकिलेल्या आपल्या दुसऱ्या मुलांची आठवण झाल्यामुळें तिचे डोळे अश्रूंनीं भरून गेले असतां ती दीनपणें त्यांच्याशीं बोलूं लागली ॥ २८ ॥

ती म्हणाली, ' हे अपरिमितसामर्थ्यवान् बळरामा, हे योगशास्त्रवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ असलेल्या श्रीकृष्णा, तुम्ही दोघे आदिपुरुष असून प्रजापतींचेहि नियामक आहां हें मला ठाऊक आहे ॥ २९ ॥ तुम्हीं सांप्रत माझ्या येथें जे अवतीर्ण झालां, ते अशास्त्रीय अशा दुष्ट मार्गाला लागलेल्या व त्यामुळें पृथ्वीला जड झालेल्या राजांचा नाश करण्यासाठीं झालां, कारण त्या राजांचें बळ काळानें उध्वस्त झालेले असें होतें ॥ ३० ॥ हे परमात्म्या, तुला आज मीं शरण आल्यें आहें. तुझ्या पुरुषरूप अंशाच्या मायारूप अंशाचे अंश जे सत्त्वादि गुण, त्यांच्या एका भागानें तूं या विश्वाची उत्पत्ति, उत्कर्ष व लय करीत असतोस ॥ ३१ ॥ तुम्हांला तुमच्या सांदीपनि गुरूंनीं दक्षिणा मागण्याच्या वेळीं आपल्या पुष्कळ काळापूर्वी मरण पावलेल्या पुत्राला आणून द्यावयाची जेव्हां आज्ञा केली, तेव्हां गुरुदक्षिणा म्हणून तुम्हीं त्या गुरुपुत्राला पितृलोकाहून आणून गुरूच्या स्वाधीन केलें ! ॥ ३२ ॥ तुम्हीं दोघेहि योगशास्त्रांत अत्यंत निपुण आहां, यास्तव माझीहि तुम्ही तशीच एक मनकामना पूर्ण करा. कंसानें पूर्वी ज्या माझ्या पुत्रांचा वध केला त्यांना तुम्हीं परत आणलेलें पाहावें अशी मला इच्छा झाली आहे. ' ॥ ३३ ॥

शुकाचार्य म्हणतात, हे परीक्षित् राजा, याप्रमाणें मातेनें आज्ञा केली असतां, बळराम व कृष्ण हे दोघे योगमायेचा आश्रय करून सुतल नामक पाताळ प्रदेशांत गेले ॥ ३४ ॥ तेथें ते गेले असतां दैत्यांचा राजा जो बळि त्याच्या तें दृष्टीस पडले. राम-कृष्ण हे साऱ्या जगाचें नियंत्रण करणारें दैवत असून विशेषतः बळि राजाचें स्वतःचेंहि दैवत होते. अर्थात् त्यांस पाहतांच बळीला फार आनंद झाला. तो तत्काल उठून उभा राहिला, व आपल्या कुटुंबांतील माणसांसह त्यानें त्या राम-कृष्णांना नमस्कार केला ॥ ३५ ॥

त्या बलिराजानें त्यांना बसावयासाठीं उत्तम प्रकारचें आसन पुढें केलें आणि आनंदानें त्यांना त्यावर बसविलें. मग त्या महात्म्यांचे पाय धुऊन तें पाणी त्यानें आपल्या स्वतःच्या व आपल्या कुटुंबातील मंडळींच्या मस्तकांवर प्रोक्षिलें. कारण तें पादोदक ब्रह्मदेवापासून सर्व जगाला पवित्र करीत राहिलें आहे ॥ ३६ ॥ याप्रमाणें बळीनें त्या उभय-

तांची मोठ्या समारंभानें पूजा करून त्यांना उंची वस्त्रें, अलंकार व उट्या अर्पण केल्या आणि विडा, दीप, सुग्रास अन्न तसेंच आपलें कुल व धन यांसह आपलें शरीरहि त्यानें त्यांच्या सेवेला सादर केलें ॥ ३७ ॥ हे राजा, त्या वेळीं बळिराजाचें मन प्रेमानें अगदीं थबथबून गेलें. त्यानें आपल्या हृदयांत भगवंताच्या चरणकमलांचें वारंवार ध्यान केलें. त्याचे नेत्र आनंदाश्रूंनीं भरून गेले. त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले आणि त्याचा कंठ दाटून आला व तशा स्थितींत तो श्रीकृष्णाशीं बोलूं लागला ॥ ३८ ॥

बळी म्हणाला, ' हे बळरामा, सर्वव्यापक असा जो शेष तो तूंच आहेस. तुला नमस्कार असो. हे विश्वचालका श्रीकृष्णा, तुला नमस्कार असो. तुम्हीं ब्रह्मस्वरूपी व सर्वांचे अंतर्यामी असून सांख्य व योग या शास्त्रांचे प्रवर्तक आहां ॥ ३९ ॥ खरोखर तुमचें दर्शन म्हणजे प्राण्यांना मोठें दुर्लभ आहे; पण कित्येकांना तें अगदीं सुलभ होतें. आम्हीच पाहा ना ! आमचा स्वभाव रजोगुण व तमोगुण यांनीं व्यापिला असतांहि तुम्हीं सहजगत्या येथें येऊन आम्हांला दर्शन दिलें ॥ ४० ॥ दैत्य, दानव, गंधर्व, सिद्ध, विद्याधर, चारण, यक्ष, राक्षस, पिशाच्च, तसेच भूत व प्रमथ या लोकांचे प्रमुख आणि आम्हीं व आमच्या-प्रमाणें दुसरे हे सर्व, अत्यंत शुद्धसत्त्वगुणाचें प्रत्यक्ष माहेरघर असा जो वेदस्वरूपी तूं-त्या तुझ्याविषयीं नित्य वैर करीत असतात ॥ ४१ ॥ ४२ ॥ कित्येक जण ( शिशुपालादि ) तुझ्याशीं नित्य वैर करून तुझी भक्ति करितात, तर कित्येक जण ( गोपी ) मनांत काम-वासना धरून तुझी भक्ति करितात; परंतु त्या सर्व भक्तांना तूं जसा आपल्या जवळ ओढि-तोस, तसा कांहीं सत्त्वगुणविशिष्ट अशा देवादि भक्तांनाहि ओढीत नाहींस ! ॥ ४३ ॥ हे योगेश्वरांच्या नियंत्या, मोठ्या योगनिष्णात पुरुषांनाहि तुझी ही योगमाया अमुक प्रकारची आहे असें बहुधा कळत नाहीं; मग आमच्यासारख्यांना ती कशी कळणार ? ॥ ४४ ॥ हे भगवंता, तूं मजवर कृपा कर आणि निष्काम पुरुष ज्याच्याकरितां नित्य प्रयत्न करितात, अशा तुझ्या चरणकमलाचे ठायीं आश्रय दे. म्हणजे संसाररूपी दुःखदायक अंधारमय जे कूप त्यांतून बाहेर पडेन व जगाला आधार देणाऱ्या वृक्षांच्या तळीं जें मिळेल त्यावर उपजीविका करीत शांतपणें एकटाच किंवा साधूंच्या संगतींत मी फिरत राहीन ॥ ४५ ॥ हे सर्व जीवांच्या नियामका, आम्हांला उपदेश कर आणि हे प्रभो, आमचें पाप नष्ट कर. तुझ्या उपदेशानें जो निष्ठापूर्वक चालतो तो पुरुष विधिनिषेधात्मक धर्मबंधनांतून मुक्त होतो ' ॥ ४६ ॥

बळीचें हें भाषण ऐकून श्रीकृष्ण भगवान् म्हणाले, ' पहिल्या स्वायंभुव मन्वंतरा-मध्यें मरीचि प्रजापतीचे ऊर्णानामक पत्नीच्या पोटीं झालेले सहा पुत्र देव होते. एकदां ब्रह्मदेव आपल्या वाक्नामक कन्येशीं रममाण होण्यास उत्सुक झालेला पाहून त्यांना हंसूं आलें ॥ ४७ ॥ हें जें त्यांच्याकडून निंद्य कर्म घडलें, त्यामुळें ते असुरयोनींत जाऊन तत्काळ हिरण्यकशिपूच्या पोटीं जन्मास आले व तेथून योगमायेनें त्यांना काढून देवकीच्या उदरांत नेलें. तेथें त्यांचा जन्म होतांच हे बळिराजा, कंसानें त्यांचा वध केला. त्या आपल्या पुत्रांविषयीं देवकीमाता शोक करीत असून, ते पुत्र सांप्रत तुझ्याजवळ राहात आहेत

॥ ४८ ॥ ४९ ॥ मातेचा शोक दूर करण्यासाठीं आम्ही त्यांना येथून तिजकडे नेण्यासाठीं आलों आहों. तेथें गेल्यावर ते ब्रह्मदेवाच्या शापापासून मुक्त होतील व दुःखरहित होऊन देवलोकाला जातील ॥ ५० ॥ स्मर, उद्गीथ, परिष्वंग, पतंग, क्षुद्रभृत् आणि घृणी अशा या सहा मरीचिपुत्रांना माझ्या कृपेनें पुनः उत्तमलोक प्राप्त होईल !' ॥५१॥ असें बळीला सांगून व त्या आपल्या बंधूंना घेऊन, बळराम व कृष्ण उभयतां बळीनें केलेल्या सन्मानाचा स्वीकार करून द्वारकेस परत आले आणि त्यांनीं त्या पुत्रांना मातेच्या स्वाधीन केलें ॥ ५२ ॥ त्या पुत्रांना पाहून देवी देवकीच्या स्तनांना पुत्रप्रेमानें पान्हा फुटला. तिनें त्यांना आपल्या मांडीवर घेऊन मिठी मारिली आणि बारंबार त्यांचें मस्तक हुंगिलें ॥५३॥ पुत्रस्पर्शानें तिच्या मनाला फार आनंद झाला आणि तिनें मोठ्या संतोषानें त्यांना स्तनपान दिलें. ती विष्णूच्या मायेनें मोहित झाली होती; कारण सारी सृष्टि त्या मायेनेंच चालली आहे ॥५४॥ श्रीकृष्णानें पूर्वी पिऊन उरलेलें देवकीच्या स्तनांतील दूध त्या सहा जणांनीं प्राशन करितांच श्रीकृष्णाच्या अप्रत्यक्ष अंगस्पर्शाचा योग होऊन त्यांना आपल्या मूळ देवस्वरूपाचा साक्षात्कार झाला ॥ ५५ ॥ माता देवकी, पिता वसुदेव व बंधु बळराम आणि कृष्ण यांना त्यांनीं नमस्कार केला आणि सर्व लोक पाहात असतां ते आपल्या देवलोकींच्या स्थानीं निघून गेले ॥ ५६ ॥ मृत पुत्रांचें परत येणें व पुनः स्वर्गीं निघून जाणें, हा प्रकार पाहून देवकीला मोठें आश्चर्य वाटलें आणि हे राजा, तो सर्व श्रीकृष्णानें रचिलेला मायेचा खेळ आहे असें तिनें जाणिलें ॥ ५७ ॥ हे परीक्षित् राजा, या प्रकारचे त्या अपरिमित सामर्थ्यवान् अशा परमात्म्या श्रीकृष्णाचे अनंत अद्भुत पराक्रम आहेत ॥५८॥

सूत म्हणाले, हे शौनक ऋषि हो, श्रीकृष्णाचें यश अमर असून त्याचें हें चरित्र व्यासपुत्र शुकांनीं अशा प्रकारें वर्णिलें आहे. अनादि पातकांचा नाश करण्याचें त्याला सामर्थ्य असून श्रीकृष्णभक्तांना तें कानांतील मूल्यवान् अलंकारासारखें आहे. जो कोणी स्वतः तें नित्य श्रवण करील किंवा दुसऱ्याला ऐकवील त्याचे मन श्रीकृष्णभगवंतावर पूर्णपणें जडेल व कल्याणाचें माहेरघर असें जें श्रीकृष्णाचें स्थान तें त्याला प्राप्त होईल ॥५९॥

## पंचाऐशींवा अध्याय समाप्त

---

# अध्याय ८६ वा

परीक्षित् राजा शुकाचार्यांस म्हणतो, हे मुने, बळराम व कृष्ण यांची बहीण जी सुभद्रा तिच्याशीं अर्जुनानें विवाह कशा प्रकारें केला, तो वृत्तांत ऐकण्याची मला इच्छा आहे; कारण ती सुभद्रा माझी आजी होती ॥ १ ॥

शुकाचार्य म्हणतात, महापराक्रमी अर्जुन तीर्थयात्रा करीत पृथ्वीवर हिंडत असतां प्रभासतीर्थाला जेव्हां आला तेव्हां तेथें त्याला आपल्या या मामेबहिणीचा वृत्तांत कळला ॥ २ ॥ बळराम तिला दुर्योधनास देणार आहे; पण इतरांचा तसा उद्देश नाहीं असें त्याला कळलें. तेव्हां तिची प्राप्ति करून घेण्याच्या इच्छेनें तो त्रिदंडी संन्यासी होऊन द्वारकेस आला ॥ ३ ॥ तेथें आपला हेतु सिद्धीस कसा नेतां येईल याचा विचार करीत तो पावसाळ्याचे चार महिने राहिला असतां नागरिकांनीं त्याचा चांगला सत्कार केला व बलरामानेंहि त्याला न ओळखतां त्याचा वारंवार बहुमान केला ॥ ४ ॥ एकदां तर त्याचा पाहुणचार करावा म्हणून बळरामानें त्याला आमंत्रण देऊन आपल्या घरीं आणिलें. तेथें मोठ्या भक्तीनें बळरामानें वाढविलेले पदार्थ अर्जुनानें भक्षण केले ॥ ५ ॥ त्या भोजनप्रसंगीं पराक्रमी पुरुषांच्या मनांत भरणारी अशी ती उपवर कन्या सुभद्रा त्याच्या दृष्टीस पडली. तिला पाहाताच त्याचे नेत्र आनंदानें प्रफुल्लित झाले आणि प्रेमानें वेडावलेलें त्याचें मन तिच्यावर बसलें ॥ ६ ॥ स्त्रियांच्या मनास आनंद देणाऱ्या अशा त्या अर्जुनाचें दर्शन होतांच सुभद्रेचेंहि मन त्याच्यावर बसलें. तिचें हृदय व नेत्र त्याच्याकडे ओढ घेऊं लागले व ती हंसत लाजत त्याच्याकडे चोरून पाहूं लागली ॥ ७ ॥ नंतर तिचेंच सतत ध्यान करणारा अर्जुन तिच्या प्राप्तीची संधि पाहूं लागला. बलवत्तर कामानलानें तो अगदीं पीडित झाला, आणि त्याचें मन अस्थिर होऊन त्याला कशानेंहि सुख वाटेनासें झालें ॥ ८ ॥ अशा स्थितींत एकदां मोठ्या देवयात्रेचा प्रसंग उद्भवला. त्या वेळीं ती सुभद्रा द्वारकेंतील आपल्या सुसंरक्षित राजवाड्यांतून बाहेर पडून रथांत बसून देवदर्शनास चालली असतां, त्या महापराक्रमी अर्जुनानें तिच्या मातापित्यांच्या व कृष्णाच्या संमतीनें तिला त्या समारंभांतून पळवून नेलें ! ॥ ९ ॥ त्याला अडविण्यासाठीं जे शूर योद्धे आडवे आले त्यांना त्यानें आपलें धनुष्य सरसावून पळवून लाविलें आणि सिंह आपला वांटा घेऊन जसा निघून जातो, तसा तो यादवमंडळी आक्रोश करीत असतां रथांत बसून निघून गेला ! ॥ १० ॥ हा घडलेला प्रकार जेव्हां बळरामाला कळला तेव्हां पौर्णिमेच्या समुद्राप्रमाणें तो अगदीं खवळून गेला; पण कृष्णानें व स्नेही मंडळीनें त्याच्या पायां पडून त्याला थोड्या वेळानें शांत केलें ॥ ११ ॥ नंतर शांत झालेल्या त्या बळरामानेंहि आनंदानें वधूवरांकडे हत्ती, घोडे, रथ इत्यादि मूल्यवान् साहित्य व दासदासी आंदण म्हणून पाठवून दिलीं ॥ १२ ॥

शुकाचार्य म्हणतात, हे राजा, श्रुतदेव नांवाचा एक उत्तम ब्राह्मण कृष्णाचा भक्त होता. एकट्या श्रीकृष्णाशिवाय तो कांहीं जाणत नव्हता व अशा एकनिष्ठ भक्तीमुळें आपले सर्व मनोरथ पूर्ण झाले असें वाटून तो अगदीं समाधानानें राहात असे. तो ज्ञानी व वैराग्यशील होता ॥ १३ ॥ तो ब्राह्मण विदेह देशांतील मिथिला नगरींत गृहस्थाश्रमधर्म सांभाळून राहात असे व प्रयत्न न करतां जें मिळेल तेवढ्याच प्राप्तींत आपलीं सर्व कामें उरकीत असे ॥ १४ ॥ त्याला दैवयोगानें प्रत्येक दिवशीं निर्वाहाला जेवढें लागे तेवढेंच मिळत असे; अधिक कधींहि मिळालें नाहीं; पण तेवढ्यावरच संतुष्ट राहून तो सर्व गोष्टी योग्य रीतीनें करीत असे ॥ १५ ॥ हे राजा, त्या ब्राह्मणाप्रमाणेंच त्या देशाचा राजाहि होता. त्याचें नांव बहुलाश्व असें होतें. तो मिथिलराज जनकाचा वंशज असून अगदीं निरभिमान होता. तो ब्राह्मण व तो राजा असे दोघेहि श्रीकृष्णाचे भक्त होते ॥ १६ ॥ त्यांच्यावर श्रीकृष्णभगवान् प्रसन्न असे. एकदां तो प्रभु श्रीकृष्ण दारुकाकडून रथ सिद्ध करवून त्यांत बसला आणि ऋषींना समागमें घेऊन विदेह देशाला गेला ॥ १७॥ त्या ऋषींमध्यें नारद, वामदेव, अत्रि, व्यास, परशुराम, असित, अरुणि, मी स्वतः, बृहस्पति, कण्व, मैत्रेय, च्यवन इत्यादि होते ॥ १८ ॥ हे राजा, ग्रहांसह सूर्याचा उदय व्हावा तसा ऋषींसह श्रीकृष्ण वाट चालत असतां मार्गांतील, देशांतील व नगरांतील लोक अनेक भेटी घेऊन ठिकठिकाणीं त्यांच्या सत्कारासाठीं उभे राहिले ॥ १९ ॥ हे राजा, आनर्त, धन्व, कुरु, जांगल, कंक, मत्स्य, पांचाल, कुंति, मधु, केकय, कोसल, अर्ण, या देशांतील, त्याचप्रमाणें इतरहि ठिकाणच्या स्त्री-पुरुषांनीं श्रीकृष्णाच्या मनोहर स्मित व प्रेमळ दृष्टि यांनीं युक्त अशा मुखकमलाचें आपल्या नेत्रांनीं यथेष्ट पान केलें ॥ २० ॥ त्याच्या दर्शनानें त्या लोकांच्या अज्ञानाचा नाश होऊन त्यांची दृष्टि ज्ञानयुक्त झाली व अशा रीतीनें तो त्रैलोक्याचा गुरु श्रीकृष्ण, त्यांना कल्याणकारक अशी तत्त्वबोधक दृष्टि देत, व देव व मनुष्य यांच्या तोंडून निघालेलें आपलें पापनाशक असें दिगंतीं पसरलेलें निर्मल यश ऐकत, हळूहळू विदेह देशाला जाऊन पोंहचला ॥ २१ ॥ हे परीक्षित् राजा, श्रीकृष्ण तेथें आला हें वर्तमान ऐकून तेथील नागरिक व राज्यांतील इतर लोक आनंदित झाले व त्याची पूजा करण्यासाठीं हातीं साहित्य घेऊन ते त्याला सामोरे गेले ॥ २२ ॥ श्रीकृष्ण त्यांच्या दृष्टीस पडतांच प्रेमानें त्यांचीं मुखें प्रफुल्लित झालीं व हृदयें उचंबळून आलीं. त्यांनीं मस्तकांवर हात जोडून श्रीकृष्णाला व त्याच्या समागमें असलेल्या पूर्वोक्त ऋषींना नमस्कार केला ॥ २३ ॥ मिथिलेचा राजा बहुलाश्व व तो श्रुतदेव ब्राह्मण, यांना तो जगद्गुरु श्रीकृष्ण आपल्यावर कृपा करण्यासाठींच आपल्याकडे आला आहे असें वाटलें व ते दोघे त्याच्या पायां पडले ॥ २४ ॥ मग बहुलाश्व व श्रुतदेव या दोघांनींहि एकाच वेळीं हात जोडून पाहुणचाराचा स्वीकार करण्यासाठीं आपल्या घरीं यावें म्हणून श्रीकृष्णाला ऋषींसह निमंत्रण दिलें ॥ २५ ॥ त्यांचा अभिप्राय जाणून श्रीकृष्णानें त्यांच्या मनासारखें करण्याचें ठरविलें आणि दोन वेगळीं रूपें धारण करून तो त्या दोघांच्या घरीं एकाच वेळीं गेला; पण त्यांना हा प्रकार समजला नाहीं ॥ २६ ॥ श्रीकृष्ण

व ते मुनि, दुर्जनांना ऐकण्यासहि जे अप्राप्य असे ते प्रत्यक्ष आपल्या घरीं आले, हें पाहून थोर मनाच्या त्या जनकानें त्यांच्यासाठीं आसनें आणविलीं व त्यांना त्यांवर सुखानें बसविलें ॥ २७ ॥ त्याच्या भक्तीला पूर येऊन त्याचा आनंद हृदयांत मावेनासा झाला आणि त्याचे डोळे आनंदाश्रूंनीं भरून गेले. त्यानें श्रीकृष्णाला नमस्कार करून त्याचे पाय धुतले व जगाला पवित्र करणारें त्याच्या पायांचें तीर्थ स्वत:च्या व आपल्या कुटुंबीयांच्या मस्तकांवर प्रोक्षिलें ॥२८ ॥ नंतर त्यानें गंध, फुलें, वस्त्रें, वेष, धूप, दीप इत्यादि साहित्यानें त्या समर्थ श्रीकृष्णाची व ऋषींची पूजा केली व त्यांना गाई व बैल अर्पण केले ॥ २९ ॥ त्यानें त्यांना उत्तम भोजन घातलें व ते तृप्त झाले असतां श्रीकृष्णाचे पाय मांडीवर घेऊन आनंदानें ते हळूहळू चेपीत गोड शब्दांनीं त्याचें मन रिझवीत तो बहुलाश्व राजा त्याच्याशीं बोलूं लागला ॥ ३० ॥ तो म्हणाला, ‘ हे समर्थ श्रीकृष्णा, तूं खरोखर प्राणिमात्रांचा अंतर्यामी व प्रेरक असून स्वयंप्रकाश आहेस. म्हणूनच आम्हीं तुझ्या चरणकमलाचें नित्य स्मरण करतों व त्यामुळेंच तुझें दर्शन आम्हांला झालें ॥ ३१ ॥ तूं म्हणत असतोस कीं, ‘ जसा एकनिष्ठ भक्त मला प्रिय वाटतो, तसा बंधु शेष, पत्नी लक्ष्मी किंवा पुत्र ब्रह्मदेव हेहि प्रिय वाटत नाहींत’ आणि तें तुझें बोलणें सत्य करण्यासाठीं तूं आज आमच्या घरीं येऊन आम्हांला दर्शन दिलेंस ॥ ३२ ॥ सर्वसंगपरित्याग करून शांत वृत्तीनें राहणाऱ्या मुनींना तूं आत्मस्वरूपाचा लाभ करून देतोस, हें ज्ञान ज्याला झालें आहे असा कोणता पुरुष तुझ्या चरणकमलाचा त्याग करील बरें ? ॥ ३३ ॥ या संसारचक्रांत सांपडलेल्या मनुष्यांचा संसारपाश तुटावा यासाठींच यदुवंशांत तूं अवतीर्ण होऊन त्रैलोक्याच्या पापाचा क्षय करणारी अशी कीर्ति सर्वत्र पसरवली आहेस ॥ ३४॥ हे भगवन् श्रीकृष्णा, तुझी बुद्धि कोठेंहि कुंठित होत नाहीं. हे देवा, नारायण ऋषिरूपानें अत्यंत शांतपणें तपश्चर्या करणारा असा जो तूं त्या तुला नमस्कार असो ॥ ३५ ॥ हे विश्वव्यापका, आतां या ब्राह्मणांसह आमच्या घरीं कांहीं दिवस राहा आणि हें निमि राजाचें कुळ आपल्या पायधुळीनें पवित्र कर ! ’ ॥ ३६ ॥ याप्रमाणें राजानें प्रार्थना करून राहण्याचा आग्रह केला असतां लोककल्याण करणारा तो भगवान् श्रीकृष्ण, मिथिला नगरींतील स्त्रीपुरुषांचें कल्याण करण्यासाठीं तेथें राहिला ॥ ३७ ॥ जनकवंशज बहुलाश्वाप्रमाणेंच श्रीकृष्ण मुनींसह श्रुतदेव ब्राह्मणाचे घरीं आला. त्या वेळीं त्यास इतका आनंद झाला कीं, तो वस्त्र उडवीत नाचूं लागला. त्यानें देवाला व ऋषींना नमस्कार केला आणि त्यांच्यासाठीं गवतांचीं आसनें आणून त्यांच्यावर त्यांना बसवून कुशल प्रश्नांनीं त्यांचें स्वागत केलें आणि आपल्या स्त्रीसह त्यानें त्या सर्वांचे आनंदानें पाय धुतले ॥ ३८॥३९ ॥ नंतर त्या पादोदकानें त्या महाभाग्यवान् ब्राह्मणानें स्वत: स्नान करून आपल्या कुटुंबांतील माणसांनाहि घातलें. त्याला आपले सर्व मनोरथ फळास आले असें वाटून तो आनंदानें अगदीं उचंबळून गेला ॥ ४० ॥ फळें, गंध, फुलें इत्यादि पूजासाहित्य, वाळ्यानें गार व सुगंधित केलेलें गोड पाणी, कस्तुरी, तुळशी, दर्भ, कमळें इत्यादि सहजगत्या मिळालेल्या साहित्यानें त्यानें त्यांची पूजा केली

व सत्त्वगुणवर्धक असें अन्न त्यांना अर्पण केलें ॥ ४१ ॥ हें सर्व करीत असतां तो श्रुतदेव मनांत विचार करूं लागला कीं, 'या घरदाररूपी काळोख्या विहिरींत पडलेल्या मला, भगवंताची व या ऋषींची ही भेट लाभली तरी कशी? हे ब्राह्मण म्हणजे श्रीकृष्णाचें स्वतःचें स्थान असून त्यांची पायधूळ म्हणजे सगळ्या पवित्र स्थानांचा उगम होय.' अशा प्रकारच्या विचारांत मग्न झालेला तो श्रुतदेव त्या सर्वांचा योग्य पाहुणचार करून, ते स्वस्थ बसले असतां त्यांच्याजवळ बसला आणि पत्नी, बांधव व मुलें यांसह त्यांचे पाय चेपीत त्यांच्याशीं बोलूं लागला ॥ ४२ ॥ ४३ ॥

तो म्हणाला, 'हे परमात्म्या, तूं आजन्म प्रथम आम्हांला दर्शन दिलेंस असें नाहीं. तर आपल्या शक्तीनें हें विश्व उत्पन्न करून जेव्हां तूं त्यांत आपल्या सत्तेनें प्रविष्ट झालास, तेव्हांच तुझी व आमची भेट झालेली आहे ॥ ४४ ॥ ज्याप्रमाणें निजलेला पुरुष आपल्या मायेनें मनांतच स्वप्नांतील निराळी सृष्टि उत्पन्न करून तींत प्रवेश करतो व तशा रीतीनें प्रतीतीस येतो, तसाच हा तुझा प्रकार आहे ॥ ४५ ॥ हे भगवंता, जे तुझ्या गुणांचें श्रवण करितात, तुझ्या कथा सांगतात, नित्य तुझी पूजा करून तुला वंदन करितात व आपसांत तुझ्याचविषयीं संभाषण करतात, त्या निर्मळ अंतःकरणाच्या पुरुषांच्या हृदयांमध्यें तूं प्रकट होतोस ॥४६॥ तूं सर्वांच्या हृदयांत वास करीत असूनहि कर्मानें ज्यांच्या चित्ताची चलबिचल झालेली असते त्यांना तूं फारच लांब असल्यासारखा वाटतोस आणि अहंकारादि शक्तींमुळें तुझें ज्ञान होणें जरी कठीण असलें, तरी तुझ्या गुणसंकीर्तनादि संस्कारांचा लाभ ज्यांना झाला आहे. अशांना तूं अगदीं जवळ असतोस ॥४७॥ हे देवा श्रीकृष्णा, अध्यात्मवेत्त्या पुरुषांना तूं परमात्मस्वरूपानें प्रतीत होतोस, पण आत्म्याहून भिन्न अशा देहादिकांचा अभिमान बाळगणाऱ्या जीवाना तूं आपल्यापासून विभक्त केलेला जन्ममृत्युरूप संसारच दिलेला आहेस, प्रकृतिरूप कारणांचीं महदादि कार्यें आणि जिला कोणतेंहि कारण नाहीं अशी मूळ प्रकृति या दोन्ही प्रकारच्या उपाधींचें आपल्या मायेनें तूं अवलंबन करितोस. तुला या उपाधि आच्छादीत नाहींत; पण जीवाची दृष्टि मात्र त्यांनीं आच्छादून जाते, अशा तुला नमस्कार असो ॥४८॥ हे भगवंता, आम्ही तुझे सेवक आहों, तुझी कोणती सेवा करूं तें सांग. मनुष्यांना क्लेश होण्याचा जो संभव असतो तो तुझें दर्शन होईपर्यंतच असतो, तुझ्या दर्शनानें सर्व क्लेशांचा नाश होतो' ॥४९॥

शुकाचार्य म्हणतात, हे राजा, श्रुतदेवाचें हें भाषण ऐकून शरणागताच्या दुःखांचें निवारण करणारा भगवान् श्रीकृष्ण त्याचा हात आपल्या हातांत घेऊन हंसत हंसत त्याच्याशीं बोलूं लागला ॥ ५० ॥

भगवान् म्हणाले, 'हे ब्राह्मणा, तुझ्यावर कृपा करण्यासाठींच हे ऋषि येथें आले आहेत असें समज. आपल्या पायधुळीनें लोकांना पवित्र करीत हे ऋषि माझ्यासह असेच फिरत असतात ॥ ५१ ॥ देव, क्षेत्रें व तीर्थें यांच्या दर्शनानें, सहवासानें व पूजनानें मनुष्यें अनुक्रमें हळूहळू पवित्र होतात; पण या श्रेष्ठतम ऋषींच्या अवलोकनानेंच तीं तत्काळ पवित्र होतात ॥ ५२ ॥ या लोकीं ब्राह्मण हा जन्मतःच सर्व प्राण्यांचा हितकर्ता असतो.

मग तपश्चर्या, विद्याध्ययन आणि संतोषवृत्ति या माझ्या अंशांनीं तो युक्त असल्यास त्याची गोष्ट काय सांगावी? ॥ ५३ ॥ हें जें माझें चतुर्भुज स्वरूप आहे तें देखील मला ब्राह्मणापेक्षां प्रिय नाहीं. ब्राह्मण सर्व वेदांचें मूर्त रूप आहे व मी देवांचें रूप आहें ॥५४॥ पण ब्राह्मण हा गुरुस्वरूपी, मत्स्वरूपी व आत्मस्वरूपी होय हें न समजल्यामुळें मूर्तींच्या ठिकाणींच दृढभाव ठेवणारे मंद बुद्धीचे लोक त्यांचा मत्सर करून अपमान करितात ॥ ५५ ॥ मीच सर्वत्र आहें आणि हें स्थावरजंगमात्मक विश्व व त्याच्या उत्पत्तीला कारणभूत असे जे पदार्थ तीं सर्व माझींच रूपें होत, हें तत्त्व तो मनांत ठसवून घेतो ॥ ५६ ॥ हे ब्राह्मणा, यास्तव हे ब्रह्मर्षि म्हणजे मीच होय अशा श्रद्धेनें त्यांची पूजा कर. असें तूं केलेंस, तर तूं माझीच प्रत्यक्ष पूजा केलीस असें होईल. नाहीं तर मोठें द्रव्य वेंचूनहि माझी पूजा केलीस असें होणार नाहीं ॥ ५७ ॥

शुकाचार्य म्हणतात, हे परीक्षित् राजा, याप्रमाणें श्रीकृष्णानें आज्ञा केली असतां, श्रुतदेवानें त्या प्रभूसह त्या श्रेष्ठ ब्राह्मणाची पूजा केली व मिथिलाधिप बहुलाश्वानेंहि ब्राह्मण व श्रीकृष्ण हे एकच आत्मस्वरूपी होत अशा भावनेनें त्यांची आराधना केली आणि तेणेंकरून त्यांना उत्तम गति प्राप्त झाली ॥ ५८ ॥ हे राजा, याप्रमाणें भक्तांवर भक्ति करणारा तो भगवान् श्रीकृष्ण आपल्या त्या दोन भक्तांकडे राहिला आणि त्यांना वेदविहित उत्तम मार्गाचा उपदेश करून पुन: द्वारकेस निघून गेला ॥ ५९ ॥

**शाहायशींवा अध्याय समाप्त**

---

# अध्याय ८७ वा

परीक्षित् राजा म्हणतो, हे शुकमुने, ब्रह्म हें अमुक प्रकारचें आहे असें दाखवितां येण्यासारखें नाहीं. तसेंच तें सर्व गुणांपासून अलिप्त असून, कारण व कार्य यासंबंधानें बांधलेल्या सर्व वस्तूंच्या पलीकडचें आहे आणि वेद हे तर गुणयुक्त वस्तूंचाच बोध करून देणारे आहेत. असें असल्यामुळें वेदांच्या योगानें त्या ब्रह्माचा प्रत्यक्ष बोध कसा होऊं शकेल बरें? ॥ १ ॥

शुकाचार्य म्हणतात, राजा, प्राणिमात्रामध्यें बुद्धि, इंद्रियें, मन आणि प्राण हीं जीं परमेश्वरानें निर्माण केलीं आहेत त्यांचे विशिष्ट उपयोग आहेत. ते असे कीं, जीवांना त्यांच्या साहाय्यानें विषयांचा उपभोग घेतां यावा, जन्मापासून करावीं लागणारीं कर्मे करतां यावीं, आत्म्याचें परलोकींचें हित साधतां यावें व शेवटीं कल्पनांचा निरास करून ब्रह्मस्वरूप मुक्ति मिळवितां यावी ॥ २ ॥ उपनिषत्स्वरूपी श्रुतींचें हें ब्रह्मनिरूपण प्राचीन ऋषींच्याहि पूर्वजांनीं मनांत ठसविलें होतें. सर्वसंगाचा त्याग करून जो कोणी या ब्रह्मप्रतिपादक श्रुतिसिद्धांताचें श्रद्धापूर्वक हृदयांत मनन करील, त्याला शाश्वत कल्याण प्राप्त होईल ॥ ३ ॥ याविषयीं मीं तुला थोडा प्राचीन इतिहास सांगतों. या इतिहासांत नारायणऋषींचा संबंध असून, तो नारद व नारायणऋषि यांतील संवादरूपच आहे ॥ ४ ॥ भगवद्भक्त नारद मुनि त्रैलोक्यांत फिरत असतां एका प्रसंगीं नारायण ऋषीचें दर्शन घ्यावें म्हणून त्या प्राचीन ऋषीच्या आश्रमास गेला ॥ ५ ॥ हा नारायण ऋषि या भरतखंडांत लोकांच्या कल्याणासाठीं चालू कल्पाच्या आरंभापासून धर्म, ज्ञान शांति यांनीं युक्त असें तप करीत बसलेला आहे ॥ ६ ॥ एकदां तो नारायण ऋषि आपल्या आश्रमांत बसलेला असतां, कलापगांवांतील ऋषींचा घोळका त्याच्याभोंवतीं जमला होता. अशा त्या प्रसंगीं नारदानें तेथें जाऊन त्यांना नमस्कार केला; आणि हे राजा, तूं मला आतां जो प्रश्न केलास; तोच त्यानेंहि त्या नारायण ऋषींना केला ॥ ७ ॥ त्यावेळीं सर्व ऋषि ऐकत असतां त्या भगवान नारायण ऋषीनें हा ब्रह्मवाद म्हणजे श्रुति या ब्रह्माचेंच प्रतिपादन करितात, हा सिद्धांत त्याला समजावून दिला. या ब्रह्मसिद्धांताचें निरूपण पूर्वी जनलोकांमध्यें राहणाऱ्या ऋषीं-मध्यें झालेलें होतें ॥८॥

भगवान् नारायणऋषि नारदाला म्हणाले, ' हे नारदा, पूर्वी जनलोकामध्यें एकदां ब्रह्मसत्र चाललें होतें व त्यांत ब्रह्मदेवाचे मानसपुत्र असे जे सनत्कुमारादि नैष्ठिक ब्रह्मचारी मुनि, त्यांनीं या विषयाची चर्चा केली ॥९॥ नारदा, तूं श्वेतद्वीपाच्या महाराजांना भेटण्यासाठीं तिकडे गेलेला असतां हा ब्रह्मवाद तेथें उत्तम रीतीनें झाला व त्यांत श्रुतिवचनांचा खलहि पूर्णपणें झाला. नारदा, तूं जो प्रश्न आतां मला विचारिलास, तोच त्या चर्चेच्या प्रसंगीं उत्पन्न झाला होता ॥ १० ॥ ते सनत्कुमारादि मुनि वेदाध्ययन, तपश्चर्या, सदाचार यां

बाबतींत परस्परसमान होते आणि त्यांना स्वकीय, मित्र, शत्रु, तटस्थ हे सर्व समान वाटत होते. असे ते सर्व समान योग्यतेचे असतांहि त्यांनीं या चर्चेसाठीं एकाला वक्ता केलें व इतर त्याचे श्रोते होऊन ऐकूं लागले ॥ ११ ॥ त्या वेळीं सनंदन हा वक्ता होऊन बोलूं लागला. सनन्दन म्हणाला, 'एकदां परमेश्वर आपण उत्पन्न केलेल्या या विश्वाच्या सर्व शक्तींसह स्वत:च्या ठिकाणीं लय करून निद्रा घेत पडला असतां त्याची ती निद्रा संपल्यावर श्रुतींनीं परमेश्वराचें वर्णन करणाऱ्या शब्दांनीं त्याला जागें केलें ॥ १२ ॥ ज्याप्रमाणें एखादा सार्वभौम राजा निद्रित असतां त्याच्यावर उपजीविका करणारे भाट, पहाटेच्या वेळीं त्याच्या सत्कीर्तिमय पराक्रमाचें वर्णन करून त्याला जागें करितात, तसाच हा प्रकार होता' ॥ १३ ॥

श्रुति म्हणाल्या, 'हे अजिंक्य परमेश्वरा, तूं आपला नित्य विजय प्रगट कर. तूं आपल्या सामर्थ्यानें सर्व वैभवें स्वाधीन करून ठेविलीं आहेस. यास्तव स्थावर व जंगम अशा सर्व शरीरधारी भूतांची माया तूं नष्ट कर. त्या मायेनें आपल्या दोषांवर पांघरूण घालण्यासाठीं गुणांचा स्वीकार केलेला आहे. प्राणिमात्रांचें सर्व सामर्थ्य जागृत करणारा तूंच आहेस. तूं स्वत: निरुपाधिक असलास तरी कधी कधीं मायेसह संचार करितोस आणि म्हणूनच वेदांना तुझें वर्णन करितां येतें ॥ १४ ॥ हें जें दृष्टिगोचर होणारें विश्व आहे, तें प्रलयकाळींहि कोणत्या तरी रूपानें अवशिष्ट राहात असल्यामुळें ज्ञानी पुरुष तत्त्वत: त्याला ब्रह्मस्वरूप समजतात. कारण या विश्वाची उत्पत्ति व लय हीं त्या ब्रह्मापासून होतात. तथापि त्यामुळें त्या ब्रह्मस्वरूपांत कांहीं विकार होत नाहीं. मातीपासून घट-शरावादि पदार्थ होतात; पण त्यामुळें जसा मातींत कांहीं विकार होत नाहीं, तसाच हा प्रकार होय. म्हणून वेदमंत्रांचे द्रष्टे ऋषि व त्यांनीं पाहिलेले वेदमंत्र हे आपल्या मनांत समजलेलें व वाचेनें उच्चारिलेलें जें कांहीं असेल तें सर्व तुझ्यासंबंधानेंच आहे असें ठरवितात. मनुष्यें पृथ्वीवर राहत असल्यामुळें त्यांनीं कशावर पाय ठेविला तरी तो पृथ्वीवर ठेविला असेंच होतें, दुसऱ्या कशावर ठेविला असें होत नाहीं. कारण प्रत्यक्ष लांकडावर किंवा वस्त्रावर पाय दिला तरी तें लांकूड किंवा वस्त्र पृथ्वीमय व पृथ्वीवर असल्यामुळें तें पाऊल शेवटीं पृथ्वीवर पडलें असेंच होतें ॥ १५ ॥ म्हणूनच हे त्रिगुणात्मक प्रकृतीच्या नियन्त्या परमेश्वरा, सर्व जगाचें पातक नष्ट करणाऱ्या अशा तुझ्या मधुर कथारूपी समुद्रांत बुड्या मारून ज्ञानी पुरुष आपलीं दु:खें नाहींशीं करितात. असें असल्यामुळें, हे परमेशा, जे आत्मस्वरूप संपादन करून त्यायोगें अंत:करणाच्या वृत्तींचा लय करितात व काळाचे भेदहि नाहींसे करून अखंड सुखाचा अनुभव देणाऱ्या तुझ्या पायांची सेवा करितात, त्यांचीं सर्व दु:खें नाहींशीं होतात हें सांगावयासच नको ॥ १६ ॥ प्राणी जर तुझी भक्ति करितील तरच त्यांना जीविताचें साफल्य करून घेतां येईल. नाहीं तर त्यांचा श्वासोच्छ्वास म्हणजे भात्याप्रमाणें आंत बाहेर वारा ओढण्यासारखाच होय. असल्या नुसत्या श्वासोच्छ्वासानें त्यांना परम सुखाचा लाभ कसा होणार ? कारण महत्, अहंकार इत्यादि आदिभूतें जीं ब्रह्मांडाची उत्पत्ति करितात, तीं काय त्यांच्या स्वत:च्या सामर्थ्यानें ? तुझी कृपा होऊन तूं त्यांत स्फुरण घालितोस तेव्हांच त्यांना ब्रह्मांडाची उत्पत्ति करतां येते. म्हणजे स्वतंत्र सुख

प्राप्त करून घेण्याचें सामर्थ्य तुझ्या साहाय्याशिवाय कोणालाच नाहीं. या शरिरामध्यें जे अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय आणि आनंदमय असे पांच कोश असतात, त्यांत तूं सर्वत्र सूत्ररूपानें ओंविल्यासारखा असून त्या त्या कोशाच्या आकारासारखा भासतोस; पण त्या कोशांमध्यें तूं गुरफटून न जातां किंवा त्यांच्या नाशाबरोबर नष्ट न होतां सर्वांच्या शेवटींहि अवशिष्ट राहतोस. कारण तूं कार्य व कारण या उभयतांच्याहि पलीकडचा आहेस ॥ १७॥ हे अंतरहित परमेश्वरा, मंत्रद्रष्ट्या ज्ञानी ऋषींच्या मार्गामध्यें ज्यांची दृष्टि आंत खडे गेल्याप्रमाणें अंधुक झाली आहे असे पुरुष, उदरांतील ब्रह्माची उपासना करितात; तसेच अरुणाचे अनुयायी, ज्यापासून अनेक नाड्या पसरल्या आहेत अशा हृदयांतील सूक्ष्म आकाशांत असलेल्या ब्रह्मस्वरूपाचें ध्यान करतात; पण तुझें स्थान जें त्या दोहोंच्याहि वर मस्तकामध्यें उंच ठिकाणीं गेलेलें आहे, तें जर प्राप्त झालें तरच मात्र पुरुष संसाररूप काळाच्या तडाख्यांत पुन: सांपडत नाहीं ॥ १८ ॥ हे परमेश्वरा, तूं ज्या नाना प्रकारच्या योनि उत्पन्न केल्या आहेस, त्यांमध्यें तूं उपादान-कारणरूपानें शिरल्यासारखा असून, अग्नि ज्याप्रमाणें लहानमोठ्या काष्ठांमध्यें लहानमोठा दिसतो, पण वस्तुत: अविकृत राहतो, त्याप्रमाणें तूंहि त्या लहानमोठ्या योनींमध्यें त्या त्या रूपाचें अनुकरण करून त्यांत-राहिल्यासारखा असतोस; पण या सर्व योनि मिथ्या असून त्यांत समभावानें अनुस्यूत असलेलें तुझें तेज मात्र सत्य होय. हें जें तुझें एकरशी स्वरूप तेंच सत्य होय सर्व असें व्यवहार सोडलेले निर्मळ बुद्धीचे पुरुष जाणतात ॥ १९॥ आपल्या कर्मानें संपादन केलेल्या शरिरांत भोक्ता म्हणून राहणारा जीव कार्यकारणांच्या आवरणापासून वस्तुत: अलिप्त आहे. म्हणून हे परमेश्वरा, सर्वशक्तिमान् असा जो तूं त्या तुझ्या जणूं काय अंशापासून तो केलेला आहे असें म्हणतात. जीवाची ही जी वास्तविक स्थिति, तिचें ज्ञान करून घेऊन ज्ञानी पुरुष श्रद्धावान् होतात आणि या लोकीं वैदिक कर्मे अर्पण करण्याचें क्षेत्र असे जे तुझे चरण, त्यांची उपासना करतात ॥ २० ॥ हे ईश्वरा, ज्ञान होण्यास अत्यंत कठीण असें जें आत्मस्वरूप त्याचें लोकांना ज्ञान करून द्यावें म्हणून तूं अवतार घेत असतोस. तें तुझें अवतारचरित्र मोठ्या सागरासारखें असून त्यांत अवगाहन करणाऱ्या पुरुषांचे संसाराचे श्रम दूर होतात आणि असे पुरुष तुझ्या चरणकमलावर हंसाप्रमाणें आसक्त होऊन राहणाऱ्या भक्तसमुदायांच्या संगतीनें गृहादि सौख्यांचा त्याग करितात आणि मग त्यांना प्रत्यक्ष मोक्षाचीहि इच्छा नाहींशी होते ॥ २१ ॥ तुझ्या सेवेला लावण्यास योग्य असें हें शरीर, आत्मा, मित्र किंवा एखादा प्रेमाचा माणूस याप्रमाणें आपल्या स्वाधीन असतांहि, आत्मघातकी लोक त्याचा उपयोग तुझ्या सेवेकडे करीत नाहींत आणि हितकर्ता, प्रिय व अंतर्यामी असा तूं अनुकूल असतांहि मिथ्याभूत अशा देहाच्या मागें लागून, तुझ्यावर ते प्रेम करीत नाहींत व या देहाच्या सेवेवरच सर्व लक्ष लावतात ! असे मिथ्याभूत शरीर धारण करणारे जीव भयानें सर्वतोपरि ग्रस्त असलेल्या संसारचक्रांतच फिरत राहतात ॥ २२ ॥ मोठमोठे योगी, प्राण–मन–इंद्रियें यांचा निरोध करून आपल्या हृदयामध्यें ज्या परमेश्वराच्या पदाची उपासना करितात, तें पद तुझा द्वेष

करणाऱ्यांनींहि तुझ्या स्मरणाच्या योगें मिळविलें आहे. कारण तुझी दृष्टि सर्वांना सारख्याच भावनेनें पाहत असते. तुझ्या सर्पाकार बाहूंवर विषयबुद्धीनें ज्यांचें मन आसक्त झालें आहे, अशा त्या गोपी आणि आम्हीं श्रुति, तुझ्या चरणकमलाच्या मकरंदाचा आस्वाद व्यापक बुद्धीनें घेणाऱ्या आहोंत. तरी पण दोघींवरहि तुझी कृपा सारखीच असलेली दिसते ॥ २३ ॥ हे परमेश्वरा, तूं सर्वांचा आदि आहेस. यास्तव ज्यांचा जन्म अगदीं अलीकडे होऊन लयहि झाला आहे, अशा कोणा पुरुषाला बरें तुझ्या स्वरूपाचें ज्ञान होणें शक्य आहे? ब्रह्मदेवाची उत्पत्ति तुझ्यापासून झाली व आध्यात्मिक व आधिदैविक असे दोन्ही प्रकारचे देव त्या ब्रह्मदेवापासून झाले; पण जेव्हां तूं सर्व सृष्टीचा आवर करून निद्रा घेतोस, त्या वेळीं स्थूल असें आकाशादि तत्त्व, सूक्ष्म असें महदादि तत्त्व किंवा त्या स्थूलसूक्ष्मांच्या योगानें झालेलें शरीर, तसेंच कालाचा वेग, यांपैकीं कांहींच राहत नाहीं. जीवांच्या व्यवहारासाठीं केलेलें विधिनिषेधात्मक शास्त्र सुद्धां या वेळीं अर्थात् नसतेंच ॥ २४ ॥ हे परमेश्वरा, जग मिथ्याभूत असतां त्याची उत्पत्ति झाली आहे असें म्हणणारे वैशेषिक, एकवीस प्रकारचीं दु:खें सत्य असून त्यांचा शेवटीं नाश होतो असें म्हणणारे नैयायिक, तसेंच सर्व आत्मे एकमेकांपासून पृथक् आहेत असें म्हणणारे सांख्य आणि कर्मांच्या योगानें मिळणारे—विकत घ्यावयाच्या वस्तूंसारखे—स्वर्गादि भोग सत्य होत असें म्हणणारे मीमांसक या सर्वांचे सिद्धांत वास्तविक आधारावर उभारले नसून त्यांची उभारणी केवळ भ्रमावर झालेली आहे. पुरुष हा त्रिगुणात्मक आहे असें म्हणून तुझ्या ठिकाणीं सर्व भेदांची उपपत्ति लावण्याचा यत्न करणें हेंहि अज्ञानजन्यच आहे. तूं भेदाभेदांच्या पलीकडे असून ज्ञानाचा केवळ गाभा असल्यामुळें तुझ्या ठिकाणीं अज्ञानाचा वासहि संभवत नाहीं ॥ २५ ॥ तुझ्या पुरुषरूप शक्तीसह हा सारा त्रिगुणात्मक प्रपंच म्हणजे केवळ मनोराज्याचा डोलारा, अर्थात् मिथ्याभूत आहे. सत्य अशा तुझें त्याला अधिष्ठान असल्यामुळेंच तो सत्य आहेसा भासतो. आत्मज्ञानी पुरुष हें सर्व विश्व सत्य आहे असें जें म्हणतात, तें त्याच्या विश्वरूपामुळें नसून तत्त्वत: आत्मस्वरूपामुळेंच होय. उदाहरण असें कीं, ज्यांना केवळ सोनेंच घ्यावयाचें आहे ते सोन्याचे दागिने कांहीं टाकीत नाहींत. कारण सोन्याचे दागिने म्हणजे सोनेंच होय असें ज्ञान त्यांना असतें. तात्पर्य परमेश्वरानें स्वत:पासून विश्व उत्पन्न केलें व नंतर तो त्यांत शिरल्यासारखा झाला, यास्तव तत्त्वत: तें परमेश्वरस्वरूपीच होय असें ठरतें ॥ २६ ॥ सर्व प्राणिमात्रांचें अस्तित्व तुझ्यावरच आहे असें समजून जे कोणी तुझी उपासना करितात, ते प्रत्यक्ष मृत्यूच्याहि मस्तकावर तिरस्कारानें पाय देऊन संसारांतून मुक्त होतात; पण जे केवळ शब्दज्ञानी असून तुझ्या भक्तीपासून पराङ्मुख असतात, त्यांना तूं पशूंना बांधावें त्याप्रमाणें मोहक अशा वेदवचनांनीं बांधून टाकितोस. तुझ्याशीं ज्यांनीं प्रेमानें मैत्री केली, ते स्वत: पवित्र होऊन जगालाहि पवित्र करितात. इतरांना ती गोष्ट शक्य नाहीं ॥ २७ ॥ हे परमात्म्या, तूं इंद्रियरहित असलास तरी स्वयंप्रकाश असून इतर सर्वांच्या इंद्रियशक्तींचीं सूत्रें तुझ्याच हातांत आहेत. यास्तव देव व त्यांचे अधिपति असे सृष्टिकर्ते प्रजापति, मायेसह तुलाच पूजा

अर्पण करितात व तुझ्याच सामर्थ्यानें इतरांनीं अर्पण केलेल्या पूजेचा उपभोग घेतात. मांडलिक राजे सार्वभौमाला करभार देऊन त्याच्याच आधारावर इतर लोकांपासून घेतलेल्या करभाराचा जसा उपभोग घेतात, तसेंच हें आहे. देव आपापल्या नेमलेल्या स्थानीं राहून आपलीं जीं कर्तव्यें करितात, तीं तुझ्या भीतीमुळेंच होय ॥ २८ ॥ हे परमेश्वरा, तूं सर्वथैव मुक्त असून मायेच्या अगदीं पलीकडचा आहेस. तथापि लांबून पाहण्याच्या मिषानेंच कां होईना, जेव्हां तुझा त्या मायेशीं खेळ होतो, तेव्हां स्थावर, जंगम अशा प्रकारचे देहधारी जीव निर्माण होतात व त्या तुझ्या अवलोकनानें उत्पन्न होणारीं जीं निमित्तरूप कर्में त्यांशीं त्यांचा व्यवहार होऊं लागतो. वस्तुतः तूं सर्वांच्या पलीकडचा असून तुला आपलें व इतरांचें असा भेदाभेद नाहीं. तूं आकाशाप्रमाणें सर्वांपासून अलिप्त असून शून्याशीं तुझें साहश्य आहे व त्यामुळें वाणी व मन यांच्या आटोक्यांत तूं येत नाहींस ॥ २९ ॥ हे सत्यस्वरूपी परमेश्वरा, जीव जर असंख्य, नित्य व सर्वव्यापी असतील, तर त्यांचें नियमन होणें शक्य नाहीं व म्हणून तूं तें करणारही नाहींस; पण जर ते तसे नसतील, तर मात्र तूं त्यांचा नियन्ता होशील. हा जीवनामक पदार्थ ज्या उपादानरूप सर्वव्यापी वस्तूपासून उत्पन्न झाला ती वस्तु त्या जीवाचें नियमन करील; पण त्याचें कारण म्हणून राहूनच करील, एरवीं नाहीं. ही जी सर्वव्यापी वस्तु, ती आपल्याला समजली असें जे म्हणतात त्यांना ती मुळींच समजलेली नसते. कारण जें समजलें असें वाटतें, तें दोषयुक्त म्हणजे संकुचित स्वरूपाचें असतें असा नियम सर्वत्र दृष्टीस पडतो ॥ ३० ॥ प्रकृति व पुरुष हीं दोन्ही जन्मरहित आहेत, म्हणून जीवाची उत्पत्ति त्या दोहोंतून कोणाहि एकापासून झाली असें म्हणणें जुळत नाहीं. 'मग जीवाची उत्पत्ति होते तरी कशी ? तर पाणी व वायु यांच्यापासून जसा बुडबुडा होतो, तशी प्रकृति हें उपादान-कारण व पुरुष हें निमित्त कारण यांच्या संयोगानें ती होते. वास्तव नद्या जशा समुद्रांत किंवा सर्व प्रकारचे रस जसे मधांत लीन होतात, तसे अनेक प्रकारचीं नांवें व गुण धारण करणारे हे जीव आपल्या नामगुणांसह निर्गुण अशा तुझ्या स्वरूपांत लीन होतात ॥ ३१ ॥ हे परमात्म्या, या जीवांच्या मागें पुनःपुनः जन्मास येण्याचा ससेमिरा जो लागला आहे तो तुझ्या मायेमुळें आहे. असें ज्ञान झाल्यामुळें ज्ञानी पुरुष त्या मायेला सोडून तुझ्याच ठिकाणीं दृढ श्रद्धा ठेवितात. कारण तूं त्यांना जन्ममरणाच्या फेऱ्यांत घालणारा नसून त्यांतून मुक्त करणारा आहेस. तुझी उपासना करणारांना जन्ममरणस्वरूप संसाराचें भय कसलें वाटणार ? हिंवाळा, उन्हाळा, पावसाळा या तीन भागांनीं युक्त अशा काळाच्या रूपानें प्रतीतीस येणारी तुझी भुंवई, जर कोणाला भय उत्पन्न करीत असेल, तर तें ज्यांनीं तुझा आश्रय केलेला नाहीं अशा जीवांनाच होय ॥ ३२ ॥ अतिशय चंचल अशा मनरूपी घोड्याचें दमन करणें अत्यंत कठीण आहे. अशा स्थितींत सद्गुरूच्या पायांचा आश्रय सोडून देऊन जे कोणी त्या मनरूप घोड्याला आवरण्यासाठीं म्हणून इंद्रियें व प्राण यांचेंच नियमन करितात, त्यांना तसल्या उपायांनीं इष्ट प्राप्ति न होतां दुःखच होतें व शेंकडों संकटांनीं ते ग्रस्त होतात. हे जन्मरहित अशा परमेश्वरा,

अशा प्रकारचे जीव म्हणजे नावाड्याचें साहाय्य न घेतां समुद्रांत नाव घेऊन जाणाऱ्या व्यापाऱ्यांप्रमाणें अडाणी होत ॥ ३३ ॥ हे परमात्म्या, सर्व सुखांचा गाभा असा जो आत्मस्वरूपी तूं—त्या तुझी प्राप्ति उपासना करून होण्यासारखी असतां—आप्त, इष्ट, पुत्र, देह, स्त्री, धन, घर, भूमि, प्राण, रथ इत्यादि क्षुद्र वस्तूंवर मनुष्यांची आसक्ति कां बरें असावी ? पण त्वत्प्राप्तीला या क्षुद्र वस्तूंचा कांहीं उपयोग नाहीं, या सत्य सिद्धान्ताचें ज्ञान नसल्यामुळें मनुष्यें पतिपत्नींच्या जोड्या करून भ्रामक सुखासाठीं प्रयत्न करीतच असतात; पण हा संसार आपण होऊनच नष्ट होणारा व तत्त्वतः अगदीं निःसार असा असल्यामुळें त्यांतील कोणत्या गोष्टींपासून त्या मनुष्यांना खरें सुख मिळणें शक्य आहे बरें ? ॥ ३४॥ हे परमेश्वरा, तुझें चरणकमल आपल्या हृदयांत नित्य धारण केल्यामुळेंच ज्यांच्या पायांचें तीर्थ पापनाशक झालें आहे असे ते निरहंकार ऋषिसुद्धां, पृथ्वीवरील अत्यंत पवित्र अशा तीर्थस्थानांचेंच सेवन करितात, घरदारादि विषयांचें सेवन करीत नाहींत. तुझ्या ठिकाणीं शाश्वत सुख असल्यामुळें, ज्यांचें मन तुझ्याकडे एकदां लागलें, ते पुनः घरदारांच्यामागें केव्हांहि लागत नाहींत. कारण घरदारांसारखे भोग हे पुरुषार्थाचें सार हरण करणारेच आहेत ॥ ३५ ॥ हें जग जरी सत्य अशा ब्रह्मापासून उत्पन्न झालें आहे तरी तें सत्यच आहे, असें म्हणणें युक्त नाहीं. तें म्हणणें तर्कानेंच खोडून काढितां येतें. कारण ज्यापासून जें उत्पन्न होतें त्यासारखेंच तें असतें, हा सिद्धांत सर्वथा खरा नाहीं. त्याला कित्येक अपवाद आहेत व कित्येक ठिकाणीं तर उत्पन्न झालेली वस्तु अज्ञानजन्य असल्यामुळें खोटी असते. तसेंच हें जगहि सत्य नव्हे. कारण तेंहि सत्य ब्रह्माचें अधिष्ठान व त्यावर झालेला भ्रम या दोहोंमुळें भासतें आहे. सत्य ब्रह्मावर हा जो जगाचा आभास झालेला आहे, तो व्यवहारासाठीं इष्ट असला, तथापि त्याला अंध परंपरेशिवाय मूळ आधार कांहीं नाहीं. हे परमेश्वरा, तुझी वेदरूपी वाणी कर्माच्या योगें ज्यांची बुद्धि जड होऊन गेली आहे अशा मीमांसकांना शब्दांच्या नाना वृत्तींच्या योगें मोह पाडिते ॥ ३६ ॥ हें जग सृष्टीपूर्वीं नव्हतें, तसेंच प्रलयानंतरहि तें नसतें. अर्थात् या दोन स्थितींमधील काळांत तें जें भासतें, तें तुझ्या निर्गुण स्वरूपावर आभासरूपानेंच भासत असलें पाहिजे हें उघड आहे. म्हणूनच केवळ मृत्तिकादि द्रव्यांपासून होणाऱ्या घटादिक भिन्न पदार्थांची त्याला उपमा देतात. वस्तुतः तें सर्वथैव असत्य अशा मनोराज्यासारखें आहे. त्याला सत्य म्हणणारे अज्ञानी होत ॥३७॥ ज्या वेळीं जीव मायेनें मोहित होऊन तिला कवटाळतो, तेव्हां तो तिच्या गुणांचा वांटेकरी होऊन मायारूपच होतो व तेणेंकरून त्याचें मूळ ऐश्वर्य नष्ट होऊन तो जन्ममृत्युरूप संसारचक्रांत सांपडतो; पण हे परमात्म्या, तूं मात्र, सर्प आपली कांत टाकितो त्याप्रमाणें त्या मायेला टाकून देतोस व त्यामुळें तुझें ऐश्वर्य नित्य तुजजवळ राहतें. अणिमाद्यष्टविभूतिरूप तुझें ऐश्वर्य अमर्याद असल्यामुळें तूं सर्वांना पूज्य झाला आहेस ॥ ३८ ॥ इंद्रियदमन करणारे जे योगी स्वहृदयस्थ वासनांच्या मूळाचें उच्चाटन करीत नाहींत, त्यांच्या हृदयांत असूनहि तूं त्यांना दुष्प्राप्यच राहतोस. मणि गळ्यांत घातलेला असून त्याची आठवण नसलेल्या मनुष्याची जी स्थिति तीच त्यांचीहि होते. अशा

इंद्रियें तृप्त करण्यासाठीं योगसाधन करणाऱ्या पुरुषांना, हे भगवंता, इहपर अशा दोन्ही ठिकाणीं दुःखच होतें. एक तर त्यांचा जन्ममृत्युरूप संसार सुटत नाहीं म्हणून दुःख आणि दुसरें, तुझें पद त्यांना न मिळाल्यामुळें तुझ्याकडून होणाऱ्या दंडाचीहि भीति त्यांना असते ॥ ३९ ॥ हे षड्गुणैश्वर्यसंपन्न भगवंता, तुझ्या स्वरूपाचें यथायोग्य ज्ञान ज्याला झालें, तो पुरुष तुझ्यामुळें उत्पन्न होणारीं जीं पुण्यपापांचीं सुखदुःखरूप फळें त्यांच्या संबंधापासून मुक्त होतो आणि मग देहाभिमानी जीवांसाठीं केलेले जे शास्त्रांतील विधिनिषेध तेहि तो जाणत नाहीं. त्यांपासून तो स्वतंत्र होतो. कारण प्रत्येक युगामध्यें तूं जो उपदेश जीवांना उद्देशून दिलेला आहे, त्याच्या श्रवणानें तुला मनुष्यांनीं प्रतिदिवशीं हृदयांत सांठविलें म्हणजे त्यांना तूं मोक्षरूपी आपलें स्थान देतोस ॥ ४० ॥ हे भगवंता, स्वर्गादि लोकांचे स्वामी जे इन्द्र-ब्रह्मदेव आदिकरून देव, तेच काय ते तुझा अंत जाणत नाहींत असें नाहीं, तर तुझ्या स्वरूपाला अंतच नसल्यामुळें तुझा अंत स्वतः तूंहि जाणत नाहींस ! कारण तुझ्या स्वरूपामध्यें उत्तरोत्तर दहापट मोठे होत जाणारे असे ब्रह्मांडांचे थवेच्या थवे भ्रमण करीत असून त्या प्रत्येक ब्रह्मांडाच्या भोंवतीं सात सात वेष्टनें आहेत. आकाशांत जसे धुळीचे कण फिरतात, तसे हे ब्रह्मांडांचे थवे कालचक्राबरोबर एकमेकांसह फिरत असतात. असें असल्यामुळें तुझ्यांतच लय पावणाऱ्या श्रुति तुझ्यावांचून इतर कांहीं नाहीं असें ठरवून अप्रत्यक्षपणें तुझाच बोध करून देतात " ॥ ४१ ॥

भगवान् नारायणऋषि नारदाला म्हणतात, ' याप्रमाणें हें आत्मस्वरूपाचें शास्त्रोक्त विवरण ऐकिल्यावर, सनन्दनानें आत्म्याचें स्वरूप नीट समजावून दिलें; म्हणून पूर्णज्ञानी अशा त्या ब्रह्मदेवाच्या पुत्रांनीं त्याचा बहुमान केला ॥ ४२ ॥ नारदा, आकाशांतून गमन करणाऱ्या त्या प्राचीन थोर पुरुषांनीं सर्व वेद, पुराणें इत्यादिकांतील तत्त्वविवेचनाचें जें रहस्य काढिलें, तें हें असें आहे ॥ ४३ ॥ नारदा, तूंहि त्या ब्रह्मदेवाचाच पुत्र असल्यामुळें तुझा त्या ज्ञानांत वांटा आहे. यास्तव तूंहि हें आत्मज्ञानाचें रहस्य श्रद्धेनें मनांत बाळगीत पृथ्वीवर यथेष्ट भ्रमण करीत राहा. हें ज्ञान जीवांच्या वासना दग्ध करून टाकणारें आहे ! ' ॥ ४४ ॥

शुकाचार्य म्हणतात, हे राजा, याप्रमाणें नारायण ऋषीनें सांगितलेलें आत्मरहस्य, आत्मज्ञानी नारदानें श्रद्धेनें स्वीकारिलें आणि कृतकृत्य होऊन व ऐकिलेलें तें ज्ञान मनांत ठसवून तो नैष्ठिक ब्रह्मचर्य पाळणारा देवर्षि, भगवान् नारायण ऋषीला उद्देशून पुढीलप्रमाणें बोलला ॥ ४५ ॥

नारद म्हणाला, ' सर्व जीवांना संसारांतून मुक्त करण्यासाठीं जो मनोहर असे अवतार धारण करितो, त्या निर्मळकीर्ति भगवान् श्रीकृष्णाला माझा नमस्कार असो ! ' ॥ ४६ ॥ असें म्हणून नारदानें आदिऋषि अशा त्या नारायणाला आणि त्याच्या थोर मनाच्या शिष्यांना नमस्कार केला आणि नंतर तेथून तो माझा प्रत्यक्ष पिता जो द्वैपायन व्यास त्याच्या आश्रमास गेला ॥ ४७ ॥ नारद ऋषि तेथें जातांच भगवान् व्यासानें त्याचें

स्वागत करून त्याला बसावयास आसन दिलें. त्या आसनावर बसून नारदानें नारायण ऋषीच्या तोंडून जें कांहीं ऐकिलें होतें तें सारें व्यासमुनीला निवेदन केलें ॥ ४८ ॥ हे परीक्षित् राजा, ब्रह्म हें निर्गुण असल्यामुळें, तें अमुक प्रकारचें आहे असें दाखवितां येणारें नाहीं, अशा स्थितींत वेदांना त्याचें शब्दांनीं वर्णन कसें करतां येईल, असा जो प्रश्न तूं मला केला होतास, त्याचें उत्तर मीं तुला दिलें आहे ॥ ४९ ॥ या विश्वाच्या आरंभीं, मध्यें व लयकाळीं जो त्याच्यावर नित्य दृष्टि ठेवणारा आहे, जो अव्यक्त अशा जीवांचा नियंता असून हें जग निर्माण केल्यावर त्यांत जीवांसह प्रवेश करितो व त्यांच्यासाठीं शरीरें निर्माण करून त्यांचें रक्षण करितो, निजलेला पुरुष जसा आपल्या शरिराला पाहात नाहीं, त्याप्रमाणें निर्गुण परब्रह्मस्वरूपी जो ईश्वर त्याला शरण जाऊन त्याच्या चरणांवर दंडवत् पडलें असतां जीव मायेला दूर करूं शकतो, अशा त्या अभयदात्या व आपल्या अविकृत स्वरूपानें मायेचा निरास करणाऱ्या श्रीहरीचें नित्य ध्यान करावें ॥ ५० ॥

**सत्त्याऐशींवा अध्याय समाप्त**

---

# विशेष स्पष्टीकरणांची पुरवणी

श्लोक १ — या श्लोकांत परीक्षित् राजानें जो प्रश्न विचारिला आहे तो शास्त्रीय दृष्टीनें महत्त्वाचा आहे. वेद शब्दमय असून शब्दाला सगुण पदार्थांचें मात्र वर्णन करतां येतें. निगुर्णाचें वर्णन करणें हा शब्दप्रयोगच मुळीं खोटा आहे. वर्णन करणें म्हणजे या वस्तूसंबंधानें कांहीं तरी सांगणें. पण ब्रह्म ही वस्तु अशी आहे कीं; तिचा कोणाशीं, कशाशीं कसलाहि व केव्हांहि संबंध घडत नाहीं. त्याचा गुणाशीं संबंध नाहीं, दुसऱ्या एखाद्या वस्तूशींहि नाहीं. कारण त्याच्यापासून कोणताहि पदार्थ उत्पन्न झालेला नाहीं व तेंहि कशापासून उत्पन्न झालेलें नाहीं, असें जर खरें तर त्या ब्रह्माचें वर्णन शब्द कसा करूं शकेल ? असा परीक्षिताचा प्रश्न आहे. या श्लोकांतील हा पूर्वपक्ष समजून देण्यासाठीं टीकाकारांनीं शब्दाच्या अर्थबोधक शक्तीचें शास्त्रीय विवरण केलें आहे. शब्दाची अर्थबोधक शक्ति म्हणजे त्याची वृत्ति. ही तीन प्रकारची दिसून येते. १ मुख्य, २ लाक्षणिक व ३ ध्वन्यात्मक किंवा व्यंजनात्मक. या वृत्तींना अभिधा, लक्षणा व व्यंजना अशीं नांवें आहेत.

अभिधा म्हणजे मुख्य वृत्ति. ही अनेक प्रकारची असते. अमुक शब्दानें अमुक पदार्थाचा सामान्यतः बोध होतो असें व्यवहारांत ठरलेलें असतें. या व्यावहारिक ठरावामुळें उत्पन्न झालेली शक्ति म्हणजे अभिधा होय. हा व्यावहारिक ठराव केवळ

व्युत्पत्तिशास्त्रानुसार व अंशत: दोन्ही प्रकारांनीं अशा तीन रीतींनीं होत असतो. यांतील पहिल्या प्रकाराला रूढि, दुसऱ्याला योग व तिसऱ्या मिश्र प्रकाराला योगरूढि अशीं नांवें आहेत. कांहीं शब्दांचे अर्थ केवळ रूढीनें ठरलेले असतात. उदाहरणार्थ, माणसांचीं नांवें. गोविंद, गंगा हीं माणसांचीं नांवें केवळ सांकेतिक म्हणजे रूढ होत. नृपति हा शब्द मनुष्यांचा पति म्हणजे राजा याचा दर्शक असल्यामुळें तो अर्थ यौगिक होय. आणि पंकज शब्द पंकांत किंवा चिखलांत जन्मणारें तें, अशा यौगिक अर्थानें एकट्या कमळावरच रूढ झालेला असल्यामुळें व बेडूक, जळवा हीं चिखलांत जन्मत असलीं तरी त्यांना पंकज म्हणत नसल्यामुळें तो अर्थ मिश्र म्हणजे योगरूढ होय. या तीन्ही प्रकारांचा समावेश अभिधा वृत्तींत होतो. म्हणजे या प्रकारांनीं एकदां अमुक शब्दानें अमुक पदार्थ समजावयाचा असें ठरलें म्हणजे त्याच पदार्थाची कल्पना त्या शब्दामुळें उभी राहते. 'गंगेंत स्नान कर' म्हटलें म्हणजे गंगा या विशिष्ट नदींत स्नान कर असा अर्थ मनांत उभा राहतो. 'पंकज देवावर वाहा' म्हटल्यानें कमळ वाहा असाच अर्थ आपण करितों व 'नृपतीला मान द्यावा' म्हटल्यानें राजाला मान द्यावा हीच कल्पना आपल्या मनांत येते.

शब्दाची दुसरी वृत्ति म्हणजे अर्थबोधकशक्ति लक्षणा ही होय. लक्षणा म्हणजे एका वस्तूच्या नांवावरून तिच्याशीं संबद्ध असलेल्या दुसऱ्या वस्तूचा बोध होणें. उदाहरणार्थ, माझ्या दारावरून हत्ती गेला असें म्हटलें म्हणजे दारावरून गेला असा अर्थ न घेतां, आपण तो दाराजवळून गेला असा अर्थ घेतों. पाठशाळा रस्त्यावर आहे असें जेव्हां म्हणतात, तेव्हां ती रस्त्याच्या मधोमध वाट अडवून बांधलेली आहे असें न समजतां आपण ती रस्त्याच्या जवळच्या भूमीवर बांधलेली आहे असें समजतों. या उदाहरणांत दार व रस्ता या शब्दांवरून दाराच्या बाजूची भूमि व रस्त्याच्या जवळची भूमि असा जो अर्थ आपण समजतों तो या लक्षणा वृत्तीला अनुसरून होय. ही लक्षणा तीन प्रकारची असते. (१) जहल्लक्षणा. (२) अजहल्लक्षणा आणि (३) जहदजहल्लक्षणा. लक्षणेची मुख्य खूण म्हणजे शब्दाचा जो प्रसिद्ध अर्थ त्यावरून बोधित होणारा पदार्थ न समजतां त्या पदार्थाशीं संबद्ध असलेला दुसरा पदार्थ समजणें ही होय. असें करतांना त्या शब्दावरून बोधित होणारा (१) मूळ पदार्थ सर्वथैव सोडणें, (२) तो पदार्थ घेऊन आणि वरती त्याशीं संबंध असलेला पदार्थ घेणें आणि (३) तो मूळ पदार्थ अंशत: घेणें व अंशत: गाळून घेतलेल्या अंशाशीं संबद्ध असा दुसरा पदार्थ घेणें, असे तीन प्रकार संभवतात. या तीन प्रकारांना (१) जहल्लक्षणा म्हणजे जींत मूळ पदार्थ सोडला आहे, (२) अजहल्लक्षणा म्हणजे जींत मूळ पदार्थ सोडलेला नाहीं व (३) जहदजहल्लक्षणा म्हणजे जींत तो मूळ पदार्थ अंशत: सोडला असून अंशत: घेतलेला आहे, अशीं नांवें आहेत.

वर दिलेलीं उदाहरणें जहल्लक्षणेचीं होत. त्यांत दार व रस्ता हे दोन्ही सकृद्दर्शनीं त्या शब्दांवरून समजून येणारे पदार्थ सर्वथैव सोडले असून त्यांशीं संबद्ध असलेले जवळची जागा, बाजूची भूमि, हे पदार्थ घेतले आहेत. संस्कृतांत याचें ठरीव उदाहरण

'**गंगायाम् घोष:**' म्हणजे **गंगेवर गौळवाडा आहे हें** देत असतात. या वाक्यांत **गंगा म्हणजे गंगेचा प्रवाह** असा सरळ अर्थ न घेतां **गंगेच्या कांठची भूमि** असा अर्थ घ्यावयाचा असतो. आपल्या घरीं एखादा मनुष्य यावयाचा असतां आपण तो गाडींतून येतांना दुरून पाहून जेव्हां म्हणतों कीं 'गाडी आली, बैठक घाला' तेव्हां गाडीबरोबर तींत बसलेला पाहुणा आला असा आपला अर्थ असतो. ही अजहल्लक्षणा होय; कारण हींत गाडी आली म्हणण्यानें प्रत्यक्ष गाडी तर आपण घेतोंच, पण शिवाय आंत बसलेला पाहुणा हाहि आपण घेतों. यांत मूळ पदार्थ न टाकतां तत्संबंधीं पदार्थही घेत असतों. या लक्षणेचें नित्याचें उदाहरण 'भाले आले' (संस्कृतांत कुंताः प्रविशन्ति) हें होय. भाले घेतलेले पुरुष आल्यावर भाले आलें असें म्हणणें ही अजहल्लक्षणा होय. कारण भाले या वस्तुवाचक शब्दावरून समजणारा जो पदार्थ तो यांत घेतलेला असून त्यांशीं संबद्ध असलेला पुरुष असाहि अर्थ घेतला आहे. जहदजहल्लक्षणेचे ठरीव उदाहरण 'तोच हा देवदत्त' (सोऽयं देवदत्तः) हें होय. याविषयीं अधिक विचार पुढें येईल.

शब्दाची तिसरी अर्थबोधक शक्ति व्यंजना होय. '**गौळवाडा गंगेवर आहे**' या पूर्वोक्त वाक्यावरून त्या गौळवाड्यांत बसल्यानें **गंगेवरून येणारा** शीतल वायु उपभोगावयास मिळेल असा जो अर्थ मनांत येतो तो या व्यंजना वृत्तीमुळे होय.

या शब्दांच्या वृत्तींचें म्हणजे अर्थबोधक शक्तींचें अधिक स्थूल मानानें वर्गीकरण केल्यास मुख्या आणि गौणी असे दोनच वर्ग होतात. सामान्य संकेतानें ठरलेला अर्थ तो मुख्य, आणि त्याहून निराळा पण त्या संबंधावरून येणारा किंवा सुचणारा अर्थ तो गौण. बैल म्हणजे चार पायांचा, दोन शिंगांचा, गाडी ओढण्यासाठीं लाविलेला पशु हा अर्थ मुख्य आणि मूर्ख, अडाणी हा गौण होय. या अर्थप्रकारांशिवाय आणखी कोणत्याही प्रकारानें अर्थ होत नाहीं.

आतां परीक्षिताचा जो प्रश्न आहे त्यांत उपरोक्त विवेचनाच्या दृष्टीनें पूर्वपक्ष केलेला आहे. पण त्यापैकीं जहदजहल्लक्षणा ही जी वृत्ति आहे तिचा विचार केलेला नाहीं. ही वृत्ति नाहीं असें समजलें तर कोणत्याहि वस्तूचा बोध व्हावयाचा तर ती वस्तु अशी खुणांनीं किंवा गुणांनीं दाखवितां आली पाहिजे. पण ब्रह्म ही वस्तु अशी खुणांनीं किंवा गुणांनीं दाखवितां येण्यासारखी नसल्यामुळें शब्दस्वरूप वेदांनीं त्याचें वर्णन करणें अशक्य होय, असा परीक्षिताच्या म्हणण्याचा भावार्थ आहे. श्रुतींत जें वर्णन आहे तें परीक्षिताच्या पूर्वपक्षाप्रमाणें सगुण वस्तूचें असलें पाहिजे, निर्गुण ब्रह्माचें नव्हे ॥ १ ॥

यावर शुकाचार्यांचें उत्तर असें:–ईश्वरानें ही सृष्टि उत्पन्न केली व तींतील प्राण्यांना चतुर्विध [१]पुरुषार्थांचें ज्ञान होऊन शेवटीं परब्रह्मस्वरूपाची प्राप्ति व्हावी अशी

---

१ या श्लोकांत मात्रा म्हणजे विषय, भव म्हणजे आयुष्यांतील कर्म, आत्मा म्हणजे स्वर्गादि भोग व अकल्पन म्हणजे मुक्ति या शब्दांनीं अनुक्रमें अर्थ, काम आणि मोक्ष या चार पुरुषार्थांचा निर्देश केला आहे.

वेदांच्या द्वारां योजना केली. श्रुतींनीं या परमेश्वराचें वर्णन करतांना जी शब्दयोजना केली आहे ती जरी मुख्यार्थानें सोपाधिक अशा सगुण स्वरूपालाच जुळणारी असली तरी लक्षणेनें ती निरुपाधिक परब्रह्मस्वरूपाचाहि बोध करूं शकते. श्रुतिवचनांचें वर्गीकरण त्यांत ( १ ) लक्षणबोधक, ( २ ) ऐक्यबोधक, ( ३ ) निषेधवाचक, ( ४ ) उपासनाप्रतिपादक आणि ( ५ ) कर्मविधायक असे प्रकार दिसतात, ' यः सर्वज्ञः स सर्ववित् । यस्य ज्ञानमयं तपः ' ( मुंडक. १, १, ९ ), ' यः पृथिव्यां तिष्ठन् पृथिव्या आन्तरो यं पृथिवी न वेद ' ( बृहदारण्यक ३, ७, ३, ७, ३ ). ' सोऽकामयत बहुस्यां प्रजायेय' ( तैत्तिरीय २, ६ ) इत्यादि वचनें स्वरूपबोधक होत. यांवरून मुख्यार्थानें सगुणाचा बोध होत असला तरी लक्षणेनें निर्गुणाचाच बोध होतो. ' तत्त्वमसि' ( छांदोग्य ६, ७, ८ ), ' अहं ब्रह्मास्मि ' ( बृहदारण्यक १, ४, १०, ) इत्यादि वचनें ऐक्यपर असून त्यांच्या-वरूनहि लक्षणाद्वारा निर्गुण ब्रह्माचा बोध होतो. ' अस्थूलमनणु ' ब्रह्म हें स्थूल नाहीं, सूक्ष्म नाहीं ( बृहदारण्यक ३, ८, ८ ) इत्यादि वचनें ब्रह्माच्या ठिकाणीं गुणाचा निषेध करणारीं असून त्यांवरून सर्वगुणव्यतिरिक्त अशा ब्रह्माचा बोध होतो. ' मनो ब्रह्मेत्युपासीत ' ( छांदोग्य ३,१८,१ ) इत्यादि उपासनाप्रतिपादक व **स्वर्गकामो ज्योतिष्टोमेन यजेत** ' इत्यादि कर्मविधायक वचनें आहेत त्यांचा उद्देश उपासना व कर्मे यांच्या द्वारा मनुष्याची चित्तशुद्धि होऊन त्याला ब्रह्मप्राप्ति व्हावी असाच आहे ॥ २ ॥

श्रुति याप्रमाणे तत्त्वतः ब्रह्मप्रतिपादक आहेत असा हा निर्णय ( ब्राह्मी उपनिषत् ) फार प्राचीन काळच्या ऋषींनींच करून ठेवला आहे. तो निर्णय मनांत बाळगिण्यानें मनुष्य सर्वसंगांपासून मुक्त होऊन त्याला ( अकिंचन ) आत्यंतिक कल्याणमय असें ब्रह्मपद गांठतां येतें ॥ ३ ॥

श्रुतिविषयक हा सिद्धांत नारायण ऋषि व नारद यांच्या संवादांत पूर्वी निर्णित झालेला असल्यामुळें त्या संवादाचाच अनुवाद शुकाचार्यांनीं येथें परीक्षितासाठीं केला आहे ॥ ४ ॥ ५ ॥ ६ ॥ ७ ॥ ८ ॥ ९ ॥ १० ॥ ११ ॥ १२ ॥ १३ ॥ यापुढें १४ ते ४१ या श्लोकांत श्रुतींनीं म्हणजे वेदांनीं केलेली भगवंताची स्तुति आली आहे, म्हणून या प्रकरणाला ' वेदस्तुति ' म्हणतात. यांत जी स्तुति आली आहे ती मंत्ररूप किंवा ब्राह्मणरूप नाहीं. म्हणजे संहिता व ब्राह्मण म्हणून जे आज प्रसिद्ध वेदग्रंथ आहेत ( मंत्रब्राह्मणयोः वेदनामधेयम् ) त्यांतील नसून स्वतंत्र आहे. तथापि उपनिषदांमध्यें जे ब्रह्मविषयक सिद्धांत आले आहेत त्यांतील वचनांचा यांत तत्त्वतः अनुवाद केलेला आहे. कोणत्या वचनांचा कोठें अनुवाद केलेला आहे हें यथाक्रम सांगण्यांत येईल.

१४ व्या श्लोकांत परीक्षिताच्या प्रश्नाला प्रत्यक्ष उत्तर श्रुतिमुखानें दिलेलें आहे. परमेश्वर वस्तुतः निर्गुण व निरुपाधिक आहे. मायेचा पगडा त्याच्यावर नाहीं; पण केव्हां केव्हां तो मायेचें आवरण स्वीकारितो व सगुण झालासा वाटतो आणि त्यामुळें शब्दमय श्रुतींना त्याचें वर्णन करणें शक्य होतें. तें वर्णन शब्दाच्या ठरीव अर्थानुसार सगुणाचें

असलें, तरी त्यामुळें निर्गुणाचा बोध लक्षणेनें होतो. जे गुण श्रुति वर्णितात त्या सर्वांहून पलीकडचा असा जो तो निर्गुण परमेश्वर असा त्या वर्णनावरून लक्षणाद्वारा बोध होतो[1] ॥ १४ ॥

१५ व्या श्लोकांत हाच विषय अधिक स्पष्ट केला आहे व त्यासाठीं पृथ्वी व माणसें यांचा अत्यंत समर्पक असा दृष्टांत घेतला आहे. वेदांचें प्रतिपादन ब्रह्मपर आहे. कारण प्रतिपादन म्हटलें म्हणजे तें कोणत्या तरी वस्तूचें असणार. आतां ब्रह्माचें ज्याला अधिष्ठान नाहीं असें तर कांहींच नाहीं. वेदांचें प्रतिपादन हें बाह्यतः कशाचेंहि प्रतिपादन असलें, तरी शेवटीं त्याचें पर्यवसान ब्रह्मांतच झालें पाहिजे. माणसें जर म्हणूं लागलीं कीं, आम्ही पृथ्वीवर चालणार नाहीं, घराच्या माडीवर चालूं, डोंगरावर फिरूं, गाडींतून जाऊं, तर त्यांच्या या म्हणण्यांत अर्थ काय ? कारण घर, डोंगर, गाडी हीं तरी पृथ्वीवरच असणार. इतकेंच काय पण तीं स्वतःच पृथ्वी नव्हेत काय ? मग पृथ्वीवर आम्ही पाऊल टाकणार नाहीं असें मनुष्यांनीं म्हटलें तरी त्याचा उपयोग काय ? त्याप्रमाणें श्रुतींनींहि जरी मनांत आणिलें कीं ब्रह्माचें वर्णन करावयाचेंच नाहीं, तरी त्या दुसरें करणार तरी काय ? ब्रह्माव्यतिरिक्त वस्तु दाखवावी आणि मग म्हणावें पाहिजे तर, कीं आम्हीं ब्रह्मप्रतिपादन करणार नाहीं; पण अशी वस्तुच दाखवितां येत नाहीं असें परीक्षिताच्या

---

१. १४ व्या श्लोकांत ज्या वचनांना उद्देशून श्रुति वर्णन करीत आहेत तीं वचनें अशीं:——**यतो वा इमानि भूतानि जायन्ते। येन जातानि जीवंति। यत्प्रयंत्यभिसंविशन्ति । तद्विजिज्ञासस्व । ( तैत्तिरीयोपनिषद् ३, १ )** या वचनांत सर्व भूतें ब्रह्मापासून होतात, ब्रह्माच्याच योगें जगतात व अंतीं त्यांतच लय पावतात, त्या ब्रह्माचें ज्ञान करून घे असें म्हटलें आहे. यांत त्याला उत्पत्ति, रक्षण व लय करण्याचे गुण लाविले आहेत. **यो ब्रह्माणं विदधाति पूर्वं यो वै वेदांश्च प्रहिणोति तस्मै। तं ह देवमात्मबुद्धिप्रकाशं मुमुक्षुर्वै शरणमहं प्रपद्ये ( श्वेताश्वतर ६, १८ )** परमात्मा प्रथम ब्रह्मदेवाला उत्पन्न करून मग वेद त्याच्या स्वाधीन करतो. तो आत्मस्वरूपी बुद्धीमध्यें प्रकाशित होतो. त्याला मी मोक्षाच्या इच्छेनें शरण जातों. या श्रुतींतहि परमेश्वराकडे कर्तृत्व देऊन त्याला मायावलंबी मानिलें आहे. **सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म यः सर्वज्ञः स सर्ववित्** ( तैतिरीय २, १ ) यांत आत्मस्वरूपी परमात्म्याचाच उल्लेख आहे. **य आत्मनि तिष्ठन् आत्मानं नियमयति** यांत ब्रह्माचें नियामकत्व दर्शविलें आहे.

प्रश्नांत आलेंच आहे. तेव्हां अर्थात् श्रुतींनीं केलेलें प्रतिपादन ब्रह्माचेंच होय. दुसरें कसलें. असणें शक्यच नाहीं[१] ॥ १५ ॥

श्लोक १६. परमात्मा हाच वेदांचा प्रतिपाद्य विषय होय, ही गोष्ट आणखी साधूंच्या कृतीवरूनहि सिद्ध होते, असें या श्लोकांत दाखविलें आहे. विचारी पुरुष तुझ्या सगुण स्वरूपाच्या कथा गाऊन दुःखमुक्त होतात, याचें कारण तूं स्वतः सुखदुःखातीत निर्गुण निर्विकार आहेस हेंच होय. तुझें भजन करणारे तुझ्यासारखे होतात, व त्यांना पापपुण्य, सुखदुःख इत्यादि द्वंद्वांची बाधा होत नाहीं[२]॥ १६ ॥

श्लोक १७. सर्वांमध्यें नियामक स्वरूपानें परमात्माच वास करितो, म्हणून त्याचें भजन करणाराचेंच जीवन सार्थ होय. इतरांचें जगणें म्हणजे भात्यांतून वारा फुंकीत राहण्यासारखें आहे. परमात्मा हाच सर्वांच्या आधीं होता व सर्वांच्या नंतरहि तोच सत्यस्वरूपानें राहणारा आहे. अन्नमयादि कोशांमध्यें उत्तरोत्तर कोश सूक्ष्मतर होत जातात व शेवटचा जो विज्ञानमय कोश तोच परमात्मस्वरूपी होय. तैत्तिरीय ब्रह्मवल्लीमध्यें हे कोश

---

१ पंधराव्या श्लोकांतील सिद्धांत सांगणाऱ्या श्रुति—**वाचारंभणं विकारो नामधेयं मृत्तिकेत्येव सत्यम्** इ० ( छांदोग्य ६, १, ४ ) शब्दांनीं उच्चारलेलें नांव हाच मातीचा विकार. वस्तुतः घट म्हटला तरी मातीच. मातीवर दुसरा कांहीं विकार होतो असें नाहीं. **सर्वं खल्विदं ब्रह्म** ( छांदोग्य ३, १४. ) हें सर्व विश्व म्हणजे ब्रह्मच होय. या श्रुतींत सर्व ब्रह्मापासून झालें असून ब्रह्मांत तेणेंकरून कांहीं विकार होत नाहीं असें मृत्तिकादिकांच्या दृष्टांतानें सिद्ध केलें आहे. अशा रीतीनें ब्रह्मापासून विश्व होतें असें म्हणणें हा विवर्तवाद होय. याला व्यवहारांतील उदाहरण—अंधाऱ्या वाटेंत पडलेल्या दोरीला सर्प समजणें हें देतात. दोरी आहे, सर्प नव्हे असें समजेपर्यंत सर्पामुळें उत्पन्न होणारी भीति असते; पण त्या आमच्या भ्रमामुळें दोरीमध्यें कांहीं विकार होत नाहीं. ती तशीच असते. भ्रमनिरास झाला कीं सर्पाची कल्पनाहि नष्ट होते. तसें ब्रह्मावर भ्रमामुळें विश्व भासतें; पण म्हणून ब्रह्मामध्यें कांहीं विकार होऊन त्याचें विश्व बनलें असें होत नाहीं.

२ या श्लोकांतील अर्थ—**यथा पुष्करपलाश आपो न श्लिष्यन्ते एवमेवंविदि पापं कर्म न श्लिष्यते**–[ कमळाच्या पानावर जसें पाणी चिकटत नाहीं, तसें ब्रह्मवेत्त्या पुरुषाला पापकर्म चिकटत नाहीं ], **न कर्मणा लिप्यते पापकेन**–[ पापकर्माचा ज्ञानी पुरुषाला लेप होत नाहीं ], **तत्सुकृतदुष्कृते विधुनुते**–ब्रह्मज्ञानी पापपुण्यांतून मोकळा होतो कौषीतकी उपनिषद् १.४ ], **एतं ह वाव न तपति किमहं साधु नाकरवं किमहं पापमकरवम् इति**–[ या ब्रह्मज्ञान्याला मी चांगलें कर्म कां केलें नाहीं, वाईट कां केलें अशा प्रकारें दुःखच होत नाहीं ], इत्यादि श्रुतींत आला आहे.

सांगून शेवटीं जें राहतें तें नित्य स्थायी असें ब्रह्म होय, असा निर्णय केला आहे.[1] ॥१७॥

श्लोक १८. परमात्मा सर्वांचा अंतर्यामी होय असा सर्व श्रुतींचा निर्णय झाल्यामुळें त्याहून दुसऱ्या कोणाची उपासना करणें अयुक्त असें आपोआपच ओघास आलें. अर्थात् परमपुरुषार्थाची प्राप्ति पाहिजे तर तशी उपासना पाहिजे; पण अदूरदृष्टि असे कित्येक, भ्रमानें इतरांची उपासना करतात, अर्थात् त्यांना इष्टप्राप्ति होत नाहीं[2] ॥ १८ ॥

श्लोक १९. पूर्वीच्या श्लोकांत परमात्म्यालाहि उदरादि स्थानें आहेत असें म्हटल्यासारखें वाटतें. पण तसें असल्यास तोहि जीवासारखाच उपाधिग्रस्त होऊन उपासना करण्यास अपात्र ठरेल; पण तसें नाहीं, हें या श्लोकांत सांगितलें आहे. परमात्म्याला उपाधि मुळींच लिप्त करीत नाहींत असें श्रुति सांगतात. " **एको देवः सर्वभूतेषु गूढः सर्वव्यापी सर्वभूतान्तरात्मा । कर्माध्यक्षः सर्वभूताधिवासः साक्षी चेता केवलो निर्गुणश्च** " अशी श्वेताश्वतर ( ६, ११ ) श्रुति आहे.—' परमेश्वर एक असून सर्व भूतांमध्यें तो गुप्तरूपानें राहतो. तो सर्वांना व्यापून उरला असून प्राणिमात्रांचा अंतर्यामी आहे. तो सर्व कर्में पाहणारा असून सर्व प्राण्यांत वास करितो. तो सर्वसाक्षी, ज्ञानस्वरूप, अविकृत व निर्गुण असा आहे—' आपण उत्पन्न केलेल्या योनींमध्यें परमात्मा प्रवेश करितो व तदाकार होतो. तेव्हां त्याला अर्थात् प्रधान गौणपणा आला पाहिजे. पण तसें नाहीं, ही गोष्ट अग्नीच्या दृष्टांतानें दाखविली आहे. ज्या काष्ठांत अग्नि प्रविष्ट होतो,

१ **स वा एष पुरुषोऽन्नरसमयः । तस्य इदमेव शिरः इ० ... ब्रह्मपुच्छं प्रतिष्ठा** ( तैत्तिरीय २, १ -५ ). या श्लोकांतील तात्पर्यार्थ ' **असुर्या नाम ते लोका अन्धेन तमसावृताः । तांस्ते प्रत्योभिगच्छंति ये के चात्महनो जनाः** ' ( ईशावास्य ३ )—[ जे लोक आत्म्याची उपासना न करितां इतरांकडे दृष्टि लावतात ते लोक मरणानंतर काळोखाच्या लोकीं जाऊन पडतात; त्यांचें जीवित निष्फल होतें ], **न चेदवेदीन्महती विनष्टिः**—[ ब्रह्म जाणलें नाहीं तर मोठा नाश होतो. ], **ये तद्विदुरमृतास्ते भवन्त्यथेतरे दुःखमेवोपयन्ति**—[ जे ब्रह्म जाणतात ते अमर होतात, इतर दुःखांत पडतात ] इत्यादि श्रुतींत आला आहे.

२ **उदरं ब्रह्मेति शार्कराक्षा उपासते**—[ उदरस्थित वैश्वानरांला ब्रह्म समजून शार्कराक्षाचे अनुयायी त्याची उपासना करितात], **हृदयं ब्रह्मेति आरुणयः**—[ हृदयस्थित दहराकाशाला ब्रह्म समजून आरुणाचे अनुयायी त्याची उपासना करितात ], **इत ऊर्ध्वं त्वेवोदसर्पत्तच्छिरोऽश्रयत**—[ तेंच ब्रह्म वर जाऊन मस्तकांत राहिलें ] इत्यादि श्रुतींत उपरोक्त श्लोकांतील अर्थ आला असून त्यांतील शेवटचा सिद्धांत कठोपनिषदांत आला आहे. **शतं चैका च हृदयस्य नाड्यः । तासां मूर्धानमभिनीःसृतैका । तयोर्ध्वमायन्नमृतत्त्वमेति । विष्वङ्ङन्या उत्क्रमणे भवन्ति**—( कठ. ६, १६ ) हृदयापासून निघालेल्या एकशें एक नाड्या आहेत व त्यांतील एक मस्तकांत गेली आहे. तिच्या मार्गानें वर जाणारा मुक्त होतो. इतर इकडे तिकडे पसरलेल्या पुनःपुनः जन्ममरणांत घालणाऱ्या होत ], असें या श्रुतींत सांगितलें आहे.

तसा त्याला आकार आलेला दिसतो, म्हणून कांहीं अग्नि त्या आकारानें बांधला गेला असें होत नाहीं. तसा परमात्माही निरनिराळ्या योनींत शिरलासा वाटला तरी त्यांनीं तो लिप्त होत नाहीं. कारण या योनि आभासमात्र असून त्यांत असलेला एकजिनसी तूं मात्र अक्षय्य आहेस ॥ १९ ॥

श्लोक २०. शरिरांत राहाणारा जीव हा त्या परमेश्वराचाच अंश होय असें सांगणाऱ्या श्रुतींचा या श्लोकांत अनुवाद आहे. '**स यश्चायं पुरुषे यश्चासावादित्ये स एकः**'—या जीवांत जो आहे तोच हा; सूर्यामध्यें जो आहे तोच हा. तो एकच होय—अशी हा अर्थ प्रतिपादणारी श्रुति आहे. '**तत्त्वमसि श्वेतकेतो**'—हे श्वेतकेतो, तो जो सर्वव्यापी निरुपाधिक निर्गुण आत्मा तोच तूं आहेस—( छांदोग्य ६, ८, ७ ) या श्रुतींतहि तोच अर्थ आहे. '**तत्**' या शब्दानें बोधित होणारा आत्मा व '**त्वं**' पदानें बोधित होणारा श्वेतकेतु यांचा असि पदानें संबंध आणून त्यांना एक म्हटलें आहे. पण तो संबंध लागतो कसा ? तत्पदानें वाच्य म्हणजे समजून येणारें ब्रह्म, त्वंपदवाच्य श्वेतकेतु कसें काय होणार ? एक सर्वव्यापी निरुपाधिक व दुसरा अत्यंत मर्यादित व उपाधींत गुरफटलेला. पण जहदजहल्लक्षणेनें हा संबंध जुळतो व तेणेंकरून जीव—ब्रह्मांचें ऐक्य सिद्ध होतें. कसें तें पहा—ब्रह्म किंवा आत्मा यांतील सर्वज्ञत्व सोडावयाचें ( जहत्—सोडणारें ) आणि ज्ञान तेवढें घ्यावयाचें ( अजहत्—न सोडणारें ); तसेंच श्वेतकेतु या व्यक्तीमधील अल्पज्ञत्व सोडावयाचें व ज्ञान तेवढें घ्यावयाचें. असें केल्याशिवाय त्या दोघांचा असि पदानें दाखविलेला संबंध जुळतच नाहीं. ही जहदजहल्लक्षणा होय ॥ २० ॥

श्लोक २१. या श्लोकांत भक्तीचें माहात्म्य श्रुति सांगत आहेत. भक्ति ही मुक्तीपेक्षांहि श्रेष्ठ आहे, असें ' यं सर्वे देवा नमन्ति मुमुक्षवो ब्रह्मवादिनश्च । ' त्या परमात्म्याला देव, मुमुक्ष व ब्रह्मवेत्तेहि नमस्कार करितात, असें या श्रुतींत दर्शविलें आहे व तिचा अनुवाद या श्लोकांत आहे ॥ २१ ॥

श्लोक २२. जीवांना ईश्वराची सेवा करण्यास योग्य असें शरीर प्राप्त झालेलें असून व तें त्याच्या मनाप्रमाणें वागण्यास सिद्ध असून, त्याचा उपयोग मात्र मनुष्य परमेश्वरसेवेकडे न करितां भलतीकडे करितो; यासाठीं श्रुति खेद प्रदर्शित करतात. असल्या आचरणानें जीव स्वतःचेंच अकल्याण करून घेतात याला काय म्हणावें, असा त्यांचा प्रश्न आहे. हा अर्थ '**आराममस्य पश्यंति नतं पश्यति कश्चन**' ( लोक ईश्वराकडून मिळणाऱ्या सुखाची मात्र इच्छा करितात, पण त्याचें स्वरूप जाणण्याची त्यांची प्रवृत्ति नसते ) इत्यादि श्रुतींत सांगितला आहे. '**न तं विदाथ य इमा जजानान्यद्युष्माकमन्तरं बभूव नीहारेण प्रावृता जल्प्या चासुतृप उक्थशासश्चरन्ति**' ( ज्यानें हें सर्व उत्पन्न केलें त्याला तुम्हीं जाणत नाहीं. म्हणून त्याच्या-तुमच्यामध्यें फार मोठें अंतर पडलें आहे. अज्ञानानें झांकलेले जे तर्कवादी व इंद्रियांचीच तृप्ति करणारे जे कर्मोपदेशक मीमांसक ते संसारांत भ्रमण पावतात ) ही श्रुति सुद्धा याच तात्पर्याची आहे ॥ २२ ॥

श्लोक २३. ईश्वराला शत्रु-मित्र सारखेच असें सांगून त्याचें समत्व दाखविल्यावर या श्लोकांत त्याचें ज्ञान करून घेणें अवश्य असें सुचविलें आहे. त्यांत योग्यांना दृढ योग-साधनानें जें प्राप्त होतें तेंच ईश्वरविरोधकांना केवळ स्मरणानें प्राप्त होतें असें सांगून भक्तीचें योगादि मार्गांहून श्रेष्ठत्वहि सूचित केलें आहे. देवाला भोगप्रिय गोपी व कीर्तनभक्तींत नित्य रमणाऱ्या श्रुति या दोन्ही सारख्याच. तेव्हां तात्पर्य एवढेंच कीं, कोणत्या तरी रीतीनें 'आत्मा वा ऽ रे द्रष्टव्यः श्रोतव्यो मंतव्यो निदिध्यासितव्यः ( परमात्म्याचें दर्शन करावें, श्रवण करावें, मनन करावें व नित्य ध्यान करावें—बृहदारण्यक २, ४, ५ ( असें श्रुतीचें सांगणें आहे ॥ २३ ॥

श्लोक २४. भगवंताची गति जाणणें अत्यंत कठीण असल्यामुळें भक्तीनेंच त्याला वश करावें असा श्रुतींचा आशय या श्लोकांत सांगितला आहे. भगवान् सर्वांच्या आधीं आणि ब्रह्मदेवादि सर्व त्याच्यानंतर, असा मागील आढावा निघतो. पुढें पाहावें तों सर्व कार्यकारणभावबद्ध पदार्थांचा लय झाला, तरी परमात्मा आहेच. तेव्हां परमात्म्याचें ज्ञान त्या कनिष्ठांना कसें होणार ? हा अर्थ " **को अद्धा वेद, क इह प्रवोचत्, कुत आजाता, कुत इयं विसृष्टिः । अर्वाग्देवा अस्य विसर्जनेनाथा को वेद यत आवभूव** " ( ही सृष्टि कोठून जन्मली व कोठून आली हें कोणाला ठाऊक आहे आणि तें सांगणार कोण ? या विश्वाच्या उत्पत्तीनंतरचा मुळीं देवांचा जन्म. तेव्हां ही कोठून आली हें कोणाला ठाऊक असणार ?—ऋग्वेद, मंडळ १०, सूक्त १२९, मंत्र ६ ) या श्रुतींत सांगितला आहे. '**यतो वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसा सह**' ( वाणी आणि मन हीं त्या परमेश्वरापर्यंत न पोंचतांच माघारीं फिरतात.—तैत्तिरीय उपनिषद् २, ९ ) इत्यादि श्रुतींचाहि तोच भावार्थ आहे ॥ २४ ॥

श्लोक २५. सांख्य, नैय्यायिक, वैशेषिक, मीमांसक इत्यादिकांचीं मतें हीं भ्रमानें आरोपित केलेल्या गुणांवर उभारलेलीं असल्यामुळें अज्ञानजन्य व भ्रामक होत, असें या श्लोकांत सांगितलें आहे. परमात्मस्वरूप वास्तविकरीत्या सांगून सांख्यादि मतांचें भ्रामकत्व '**सदेव सोम्येदमग्र आसीत्**' ( अरे बाळा, सृष्टीच्या पूर्वी हें सत्यस्वरूपी ब्रह्मच केवळ होतें.—छांदोग्य ६, २, १), '**ब्रह्मैव सन् ब्रह्माप्येति**'( तो ब्रह्मरूप असल्यामुळें ब्रह्मांतच लय पावतो.—बृहदारण्यक ४, ४, ६ ) '**अनीशया शोचति मुह्यमानः**' ( तो मायेनें मोहित होऊन दुःख पावतो.)—(मुंडक ३, १, २ ), '**अविद्यायामन्तरे वर्तमानाः स्वयं धीराः पंडितं मन्यमानाः जघन्यमानाः परियन्ति मूढाः अंधेनैव नीयमाना यथान्धाः**' ( मुंडकोपनिषद् १, २, ८.)—( अविद्येंत खितपत पडलेले आणि स्वतःला ज्ञानी व विद्वान् समजणारे असे मूर्ख लोक अतिशय दुःखपीडित होत्साते आंधळ्यानें वाट दाखविलेल्या आंधळ्यांप्रमाणें संसारचक्रांत गिरक्या खातात. ) इत्यादि श्रुतींत सांगितलें आहे. जग हें सत्य असून असत् अशा कांहीं तरीपासून तें झालें आहे असें जें कित्येकांचें म्हणणें तें खोटें म्हणून सांगितल्यावर म्हणजे ब्रह्मरूप कारण तेवढें सत्य पण जग मात्र असत्य असें ठरविल्यावर प्रश्न असा उत्पन्न होतो कीं, मग हें

सारें जें प्रतीतीस येतें तें कसें ? या प्रश्नाला सर्परज्जूचें उदाहरण घेऊन पूर्वी विवर्तवादानें उत्तर दिलेलें आहेच. तेंच पुनः पुढील श्लोकांत थोडया निराळ्या रीतीनें सांगितलें आहे ॥ २५ ॥

श्लोक २६. जग हा मनानें उभारलेला डोलारा असला, तरी तो तत्त्वतः आत्मस्वरूपी असल्यामुळें तो दिसतो या रूपानें खरा नाहीं एवढेंच; पण ब्रह्मरूपानें तो सत्यच आहे आणि म्हणूनच प्रतीतीस येतो. सोन्याची सरी केली म्हणजे सोनें घेणारा मनुष्य ती टाकितो कीं काय ? कारण सरी म्हणजे सोनेंच होय. सरी हा शब्द तेवढा विकार आहे, दुसरा खरा विकार त्या सोन्यांत काय झाला आहे ? ज्ञानी पुरुष याचप्रमाणें जगाकडे जो पाहतो तो ब्रह्मदृष्टीनें पाहतो. वरवर दिसणाऱ्या नामरूपांच्या दृष्टीनें पाहात नाहीं. तात्पर्य नामरूपें अनित्य अतएव मिथ्या असून त्यांचें ब्रह्मरूप अधिष्ठान मात्र सत्य आहे, असा श्रुतींचा सिद्धांत आहे ॥ २६ ॥

श्लोक २७. मागील श्लोकांतील विवेचनावरून जगाकडे ब्रह्मरूपानें पाहिल्यास जीवाला दुःखमुक्त होतां येईल. मग त्यासाठीं भक्तीचें कारण काय ? '**सत्यं ज्ञानं अनन्तं ब्रह्म**' ( ब्रह्म हें अनंत असून सत्यस्वरूपी व ज्ञानमय आहे.—तैत्तिरीय उपनिषद् २-१ ), '**नेह नानास्ति किंचन**' ( या ब्रह्मांत अनेकपणा मुळींच नाहीं—कठोपनिषद् ४-११ ), '**मृत्योः स मृत्युमाप्नोति य इह नानेव पश्यति**' ( जो भेदबुद्धीनें अनेकपणा पाहतो तो जन्ममरणाच्या फेऱ्यांत सांपडतो. बृहदारण्यकक ४,४,१९ ) इत्यादि श्रुतींवरून भेदबुद्धि नाहींशी केली म्हणजे मोक्ष मिळाला असें होतें. पण भेदबुद्धि नष्ट होणें हें चुटकीसरसें नुसत्या शब्दानें होणारें कार्य नव्हे. मायेचा तडाखा मोठा जबर आहे. कोरड्या शब्दज्ञानानें खरी एकात्मभावना होत नाहीं. म्हणून ज्ञानी पुरुष खऱ्या एकात्मज्ञानासाठीं तुझी उपासना करतात व तसेंच केलें पाहिजे असें या श्लोकांत सांगितलें आहे. या भक्तिसिद्धांताला, ' यमेवैष वृणुते तेन लभ्यः ' ( ज्यावर हा परमात्मा कृपा करितो त्यालाच त्याची प्राप्ति होण्यासारखी आहे.—कठोपनिषद् २, २३ ), '**यस्य देवे परा भक्तिर्यथा देवे तथा गुरौ । तस्यैते कथिता ह्यर्थाः प्रकाशन्ते महात्मनः**' ( ज्याची देवावर तशीच ज्ञानदात्या गुरूवर मोठी भक्ति असते त्या महात्म्यालाच या ब्रह्मविषयक गोष्टी सांगितल्या असतां पटतात—श्वेताश्वतर ६, २३ ) या श्रुतींचा पाठिंबा आहे ॥ २७ ॥

श्लोक २८. परमेश्वर देह, इंद्रियें इत्यादिकांनीं विरहित असतांही सर्वांचा सूत्रधार असतो व त्याच्याच योजनेनें प्रजापतीसारखे मोठमोठे समर्थहि विश्वांतील आपलीं कामें बिनबोभाट करीत असतात. अशा रीतीनें परमेश्वर स्वतःकडे कर्तृत्व न घेतां किंवा जीवासारखा इंद्रियादिकांनीं मर्यादित न होतां सर्वांचा स्वामी झालेला आहे, हें या श्लोकांत सांगितलें आहे. हा अर्थ श्वेताश्वतरोपनिषदांतील—'**अपाणिपादो जवनो ग्रहीता पश्यत्यचक्षुः स शृणोत्यकर्णः ॥ स वेत्ति वेद्यं नच तस्य वेत्ता तमाहुरग्र्यं पुरुषं पुराणम्**' ( ३०, १९ ) या वचनांत आला आहे. ( ईश्वराला हात पाय नाहींत तरी तो वेगवान् आहे व घेणाराहि आहे. डोळे नसतांहि तो पाहतो व कान नसतांहि तो ऐकतो

जाणण्यासारख्या सर्व गोष्टी तो जाणतो, पण त्याला मात्र जाणणारा कोणी नाहीं. त्याला सर्वांच्या आधींपासून असलेला पुराणपुरुष म्हणतात. असा या श्रुतीचा भावार्थ आहे. चंद्र, सूर्य, वायु इत्यादि सर्व त्या परमेश्वराच्या भीतीनें आपलीं कामें करीत असतात असें जें या श्लोकांत सुचविलें आहे तें '**भीषास्माद्वातःपवते भीषो देति सूर्यः । भीषास्माद-ग्निश्चेंद्रश्च** या तैत्तिरीयोपनिषदांतील ( २, ८, १ ) वचनाला धरूनच आहे ॥ २८ ॥

श्लोक २९. ईश्वर स्वतः इंद्रियविरहित असला तरी इतर सर्वांच्या इंद्रियांचा प्रेरक असल्यामुळें, इंद्रियांच्या आधीन असलेले जीव त्याच्या भजनीं लागतात यांत नवल कसलें ? असें कोणी म्हणेल; पण असेंच केवळ नाहीं. जीव परमात्म्यापासून उत्पन्न झालेले असल्यामुळें ईश्वराच्या आधीनच ते असणार; पण तसे ते असले म्हणून ईश्वर मात्र कोणाच्याहि योगानें बांधलेला नाहीं. तो सर्वांना सारखाच. त्याला आपपर, जवळचा, दूरचा, असें कांहीं नाहीं व या दृष्टीनें त्याचें शून्याशींहि बरबर साम्य दिसतें, असें सांगणाऱ्या श्रुतींचा या श्लोकांत अनुवाद आहे. ज्याप्रमाणें अग्नीपासून बारीक ठिणग्या उडतात, त्याप्रमाणेंच या परमात्म्यापासून सर्व प्राण, लोक भूतें व सर्व जीव निघतात– '**यथाग्नेः क्षुद्रा** विस्फुलिंगा **व्युच्चरन्त्येवमेवा स्मादात्मनः सर्वे प्राणा सर्वे लोका :-सर्वे देवाः सर्वाणि भूतानि सर्व एत आत्मानो व्युच्चरन्ति**–' अशी या अर्थाची श्रुति आहे. ' यथा **सुदीप्तात्पावकात् विस्फुलिंगाः सहस्रशः प्रभवन्ते सरूपाः । तथाऽक्षरात् विविधाः सोम्य भावाः प्रजायन्ते**'–( मुंडक २, १। १ ) या श्रुतीचाहि तोच भावार्थ आहे. ईश्वराचें शून्याशीं बरबर सादृश्य आहे असें म्हणण्याला– '**असत् वा इदम् अग्र आसीत् । ततः वै सत् अजायत** '–( सृष्टीच्या पूर्वी शून्य होतें म्हणजे कांहीं नव्हतें, त्यापासून ही व्यक्त सृष्टि उत्पन्न झाली ) ( तैत्तिरीय २, ७ ) इत्यादि श्रुतींचा आधार आहे; पण यावरून ईश्वर शून्य होय असें होत नाहीं. कारण असत् म्हणजे शून्य नव्हे, तर अव्यक्त होय.

श्लोक ३०. पूर्वीच्या श्लोकांत जीव हे ईश्वराचे अंश होत असें सांगितलें. हे अंशासारखे वाटणारे जीव अविद्येच्या उपाधीमुळें होतात. आतां अविद्या जर एकच आहे, तर जीवहि एकस्वरूपीच असल्यामुळें एक जीव मुक्त झाला म्हणजे सर्व जीव मुक्त झाल्यासारखेंच होईल. तसेंच अविद्या अनेक म्हणाव्या, तर एक अविद्या नाहींशी झाली तरी दुसऱ्या असल्यामुळें जीवाला कधींच मुक्ति मिळणार नाहीं असे जे कित्येकांचे कुतर्क आहेत त्यांना या श्लोकांत उत्तर दिलें आहे. सांख्यमताप्रमाणें जीव असंख्य असून प्रत्येक सर्वगामी आहे. आतां जीव ईश्वराप्रमाणें सर्वव्यापी असल्यावर तो जीवांचा नियंता होणें शक्य नाहीं. नियंतृत्वाला कार्यकारणभाव लागतो व सर्व कार्यांमध्यें कारणाचें समत्व असावें लागतें. तेव्हां जीव सर्वव्यापी व अनंत मानून चालणार नाहीं. खरा प्रकार श्रुतिप्रतिपादित असा आहे कीं, परमात्मा एकच एक असून अविद्येच्या कार्यरूप असंख्य उपाधींमुळें अनेक जीव भासतात. म्हणून जेवढी उपाधि नष्ट होईल तेवढा जीव मुक्त झाल्यासारखें होतें. वस्तुतः त्याचा कारणरूप परमात्मा अविकृतच असतो. हें जें अविकृत असें

कारणरूप ब्रह्म, त्याचें स्वरूप मात्र कोणालाच सांगतां येत नाहीं. कारण जो तें कळलें असें म्हणतो, त्याला तें मुळींच कळलेलें नसतें. कारण ज्ञानाचा विषय हा मर्यादित असतो आणि ब्रह्म तर अमर्याद आहे असें श्रुति सांगतात.–' **यस्यामतं तस्य मतं मतं यस्य न वेद सः** ' ( जो कळलें नाहीं म्हणतो त्यालाच ब्रह्म कळलें असतें व जो कळलें म्हणतो त्याला तें कळलेलें नसतें.–केनोपनिषद् २, ३, ), **अवचननेनैव प्रोवाच** '–( न बोलतांच तो बोलला ),–' **सह तूष्णीं बभूव** '– ( तो ब्रह्म जाणल्याबर खरोखर स्तब्ध राहिला ) इत्यादि श्रतींवरून ब्रह्म कळलें, तरी तें सांगणें कठीण आहे असें दिसून येतें ॥ ३० ॥

श्लोक ३१. जीव हा परमात्म्यापासून उत्पन्न होतो असें म्हटल्यानें–' **जातस्य हि ध्रुवो मृत्युः** '–या न्यायानें तो नष्ट होतो असेंहि मानावें लागेल; पण असें नाहीं. जीव हा केवळ उपाधिकृत असल्यामुळें उपाधि नष्ट झाल्यावर तो मुक्तच आहे, असें सांगण्यासाठीं जीवाची उत्पत्ति म्हणजे वस्तुतः काय प्रकार आहे हें या श्लोकांत सांगितलें आहे. प्रकृति व पुरुष यांपैकीं एकापासूनहि स्वतंत्रपणें जीवोत्पत्ति झालेली नाहीं, तर उभयतांच्या संयोगानें ती झालेली आहे. याविषयीं– ' **अजामेकां लोहितशुक्लकृष्णां बह्वीं प्रजां जनयंतीं सरूपाम् । अजो ह्येको जुषमाणोऽनुशेते जहात्येनां भुक्तभोगामजोन्यः** '–( सत्त्वादि तीन गुणांनीं युक्त अशी एक जन्मरहित माया असून ती आपल्याला अनुरूप अशा त्रिगुणात्मक प्रजा उत्पन्न करिते. त्या मायेचा उपभोग जन्मरहित एक म्हणजे जीवात्मा घेत रहातो व दुसरा म्हणजे परमात्मा तटस्थ रहातो )– श्वेताश्वतर ४, ५. (जीव हे वस्तुतः जन्मलेले नव्हेतच; कारण प्रलयकाळीं ते परमात्म्यांतच लीन होतात असें या श्लोकांत सांगितलें असून,–' **यथा सोम्य मधुकरा मधुकृतो निस्तिष्ठंति नानात्ययानां वृक्षाणां रसान्समवहारमेकतां संगमयंति । ते यथा तत्र न विवेकं लभन्ते अमुष्याहं वृक्षस्य रसोस्म्यमुष्याहं वृक्षस्य रसोस्मीत्येवमेव खलु सोम्येमाः सर्वाः प्रजाः सति संपद्य न विदुः सति संपद्यामह इति** '–या श्रुतींत तेंच प्रतिपादिलें आहे; ( मधमाशा अनेक वृक्षांच्या फुलांतील थेंब थेंब रस आणून मध एकत्र सांठवितात, पण पुढें त्या मधाच्या थेंबांना मीं अमुक वृक्षांतील रस, मी तमक्या वृक्षांतील रस, असें कांहीं पृथक्करण करून सांगतां येत नाहीं, त्याचप्रमाणें हे सर्व जीव ब्रह्मस्वरूपांत मिळाले म्हणजे आपण ब्रह्मरूपांत मिळालों असें त्यांना भानहि राहात नाहीं ) मधासारखा दुसरा दृष्टान्त मुंडक श्रुतीनें समुद्रांत मिळणाऱ्या नद्यांचा दिला आहे, ही श्रुति म्हणते,–" **यथा नद्यः स्यंदमानाः समुद्रेऽस्तं गच्छंति नामरूपे विहाय । तथा विद्वान् नामरूपाद्विमुक्तः परात्परं पुरुषमुपैति दिव्यम्** "– ( मुंडक ३, २, ८ ) ( नद्या समुद्रांत मिळाल्या म्हणजे त्यांचें नामरूप नष्ट होतें, समुद्रांत एक होऊन गेल्यावर कोठली गंगा व कोठली यमुना ! त्याचप्रमाणें जीवाला ज्ञान झालें म्हणजे तो नामरूपांच्या उपाधि टाकून दिव्य अशा परमात्मस्वरूपांत जाऊन मिळतो ) ॥ ३१ ॥

श्लोक ३२. जीवाची उत्पत्ति परमात्म्यापासून होते व त्यांतच त्याचा लय होतो असें सांगून जीवाच्या मागें लागलेल्या संसारचक्राचें निरूपण केलें. आतां ज्ञानाच्या योगानें त्या चक्राची निवृत्ति होते असें या श्लोकांत सांगितलें आहे.

**' परीत्य भूतानि परीत्य लोकान् परीत्य सर्वाः प्रदिशो दिशः च।**
**उपस्थाय प्रथमजामृतस्यात्मनाऽऽत्मानमभिसंविवेश।'**

(जीव सर्व योनि, सर्व लोक, सर्व दिशा, उपदिशा फिरून आल्यावर म्हणजे या सर्व गोष्टी मिथ्या होत असें जाणल्यावर अनादि वेदवाणीची सेवा करून मनानें आत्मस्वरूपांत प्रवेश करतो ) असा या श्रुतीचा तोच भावार्थ आहे ॥ ३२ ॥

श्लोक ३३. जीव ज्ञानयुक्त झाला म्हणजे परमात्मस्वरूपांत प्रविष्ट होतो, असें सांगितल्यावर तें ज्ञान गुरुसेवेनें होतें असें या श्लोकांत सांगितलें आहे. इतर मार्गांनीं परमेश्वराचें ज्ञान करून घेणें दुष्कर आहे व योगादिमार्ग संकटग्रस्त आहेत असें सांगून गुरूच्या आश्रयाची आवश्यकता यांत दाखविली आहे.–' **तद्विज्ञानार्थं स गुरुमेवाभिगच्छेत्समित्पाणिः श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठम्** '– (त्या परमेश्वराचें ज्ञान पाहिजे असेल तर हातांत समिध घेऊन वेदवेत्त्या ब्रह्मनिष्ठ गुरूचाच आश्रय केला पाहिजे–मुंडक १, २, १२ ),–'**आचार्यवान् पुरुषो वेद** ' ( गुरूला शरण गेलेल्या पुरुषालाच ब्रह्मज्ञान होतें )–'**नैषा तर्केण मतिरापनेया प्रोक्तान्येनैव सुज्ञानाय प्रेष्ठ** ' ( हें ब्रह्माचें ज्ञान तर्कानें प्राप्त होणारें नाहीं. गुरूनेंच तें सांगितलें असतां मनांत पटूं लागतें–कठ. २, ९ ) इत्यादि श्रुति हाच अर्थ प्रतिपादितात ॥ ३३ ॥

श्लोक ३४. गुरूच्या उपदेशानें ब्रह्मज्ञान होतें; पण गुरूकडे जाण्याची बुद्धि वैराग्य उत्पन्न होईल तेव्हांच होते. म्हणून वैराग्य धरिलें पाहिजे असें या श्लोकांत प्रतिपादिलें आहे. वैराग्य होण्याला संसाराचें निःसारत्व समजावें लागतें इत्यादि **अर्थ–' परीक्ष्य लोकान् कर्मचितान् ब्राह्मणो निर्वेदमायात्। नास्त्यकृतः कृतेन**' ( स्वर्गादि लोक कर्मानें प्राप्त होतात, पण ते अनित्य होत. कर्मापासून अलिप्त असा परमात्मा कर्मानें प्राप्त होणारा नाहीं, अशी वैराग्य बुद्धि उत्पन्न करावी ) असा अर्थ या श्रुतींत आला आहे. ( मुंडक १, २, १२ ) ॥ ३४ ॥

श्लोक ३५. वैराग्य उत्पन्न झालें म्हणजे गुरूचा शोध करण्यासाठीं मुमुक्षु तीर्थाटन करितो असें या श्लोकांत सांगितलें आहे. गुरुसेवा घडली, सत्संगति झाली, म्हणजे घरदारांवरील आसक्ति नष्ट होऊन नित्य सुखस्वरूपी आत्मानंदांत जीवाचें मन रमूं लागतें, असें–' **आत्मा अरे द्रष्टव्यः श्रोतव्यो मंतव्यो निदिध्यासितव्यः** '–(बृहदारण्यक) या श्रुतीला अनुसरून येथें प्रतिपादिलें आहे ॥ ३५ ॥

श्लोक ३६. ईश्वर सत्यस्वरूप असून त्याच्यापासून उत्पन्न झालेलें विश्वहि सत्य आहे असें म्हणून मीमांसक सर्व वेद कर्मप्रतिपादक होत, असें जें म्हणतात त्याला या श्लोकांत उत्तर दिलें आहे. जग हें व्यवहारदृष्टीनें सत्य असलें तरी वस्तुतः तें सत्यब्रह्मावर विवर्तरूपानें असल्यामुळें वेदांच्या शब्दांचा उत्तानार्थ घेऊन ते कर्मपर आहेत असें म्हणणें

हा भ्रम होय. श्रुतींनीं कर्मांची स्तुति केली आहे खरी.–'**अक्षय्यं हि चातुर्मास्ययाजिनः सुकृतं भवति** '–( चातुर्मास याग करणाराला अक्षय पुण्य प्राप्त होतें ),–' **अपाम सोमाममृता अभूम** '–( आम्ही सोमयाग करून सोम प्यालों व तेणेंकरून मृत्यु तरून गेलों ) अशीं वेदवचनें आहेत. पण तीं चित्तशुद्धीसाठीं कर्मे करण्यास मनुष्यांनीं प्रवृत्त व्हावें एवढ्यासाठींच होत. कारण श्रुतींनीं ही कर्मव्यवस्था सांगितल्यावर आपला खरा अभिप्राय–' **तद्यथेह कर्मचितो लोकः क्षीयते एवमेवामुत्र पुण्यचितो लोकः क्षीयते** ' ( ज्याप्रमाणें कर्मानें मिळालेला हा लोक नष्ट होतो, त्याप्रमाणें पुण्यानें मिळालेला स्वर्गादि लोकहि नष्ट होतो–छांदोग्य ८, १, ६, ) असा सांगितला आहे. ॥३६॥

श्लोक ३७. प्रपंच वास्तविक आहे असें कोणत्याहि रीतीनें सिद्ध होत नाहीं. अर्थात् वेद हे कर्मपर नव्हत असें पूर्वी सांगितलेंच. आतां तीच गोष्ट निराळ्या शब्दांनीं सांगून प्रपंचाचें मिथ्यात्व या श्लोकांत प्रदिपादिलें आहे. जग हें पूर्वी नव्हतें, पुढें प्रलयकाळींहि नसतें. अर्थात् मधल्या वेळीं जें तें प्रतीत होतें, तें मिथ्या होय. त्याच्या प्रतीतीचें कारण केवळ परमात्मरूप सत्य अधिष्ठान. ' **सदेव सोम्येदमग्र आसीत्** '–( सृष्टीपूर्वी हें सत्य ब्रह्म मात्र होतें ) इत्यादि श्रुतींवरून जगाचा सृष्टीपूर्वीचा अभाव दिसून येतो.– ' **नासदासीत नो सदासीत् तदानीम्** '–( प्रलयकाळीं हा प्रपंच नाहींसारखा होतो ) ही श्रुति त्याचा प्रलयकालीन अभाव दर्शविते. आतां मधल्या काळांत तें भासतें तें सत्य ब्रह्मावर केवळ नामरूपानें होय. ' **यथा एकेन मृत्पिंडेन सर्वं मृन्मयं विज्ञातं भवति वाचारंभणं विकारो नामधेयं मृत्तिकेत्येव सत्यं** ' ( जशी एका मातीच्या गोळ्यावरून सर्व मातीची कल्पना येते; घट, शराव इत्यादि वाणीनें उच्चारिलेले नांवाचे शब्द हाच काय तो विकार; पण खरें स्वरूप माती हेंच ) इत्यादि श्रुतींवरून प्रपंच हा केवळ नामरूपात्मक आहे असें दिसून येतें ॥ ३७ ॥

श्लोक ३८. प्रपंच मिथ्या म्हणून सांगितलें व त्याच्या चैतन्यरूप ब्रह्माचा संबंधहि वास्तविक नाहीं म्हणून ठरविलें. मग प्रश्न असा उत्पन्न होतो कीं, जीवाला त्या संसारांत कां पडावें लागावें ? त्याचा त्यांत काय अपराध ? आणि ईश्वरानें तरी असें काय केलें आहे कीं तो मात्र त्या मिथ्या प्रपंचापासून नित्य मुक्त राहावा ? प्रपंच जर मिथ्या, तर कर्मकांडाचें प्रतिपादन करणाऱ्या वेदशास्त्राची तरी काय स्थिति ? या प्रश्नांना या श्लोकांत उत्तर आहे. * जीव व ईश्वर हे वस्तुतः एकाच प्रकारचे, एकाच संसारवृक्षावर बसलेल्या स्नेही पक्ष्यांप्रमाणें होत; पण त्यांतील जीव हा त्या प्रपंचवृक्षाचें फळ गोड म्हणून खातो आणि दुसरा तें न खातां त्याकडे नुसता बघत असतो, हा दोघांत भेद आहे. जीव जर संसारवृक्षाचें फळ खाणार नाहीं तर तोहि मुक्तच आहे; पण काय असेल तें असो, जीव तें फळ खातो व त्यामुळें त्याला झालेली बाधा दूर करण्यासाठीं वेदशास्त्रांची प्रवृत्ति

* " द्वासुपर्णा सयुजा सखाया समानं वृक्षं परिषस्वजाते । तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्त्यनश्नन्नन्यो अभिचाकशीति । " ( मुंडक ३, १, १. )

आहे. जीवानें संसाराची कल्पना सोडिली म्हणजे वेदशास्त्रांचेंहि कांहीं काम नाहीं; असें–' न तस्य कार्यं करणे च विद्यते '–( त्याला कांहीं करावयाचें राहात नाहीं ) असें श्वेताश्वतर श्रुति ६, ८ ) सांगत आहे ॥ ३८ ॥

श्लोक ३९. आतां या श्लोकांत भोंदू साधकाची स्थिति वर्णिली आहे. एकीकडे इंद्रियनिग्रहाचा आव आणून दुसरीकडे सर्व प्रकारच्या इंद्रियलालसा पुरविण्याची धडपड करणाऱ्यांना परमेश्वरप्राप्ति होत नाहीं. अशा लोकांना इहपर अशा दोन्ही ठिकाणीं दुःख होतें. **'कामान्यः कामयते मन्यमानः संकर्मोभिर्जायते तत्र तत्र'**( जो विषयाचें चिंतन करीत त्यांचीच इच्छा करितो तो त्या त्या कर्मांनीं अनुरूप अशा योनींत जन्मास येतो ). असें याविषयीं मुंडकोपनिषद् ३, २, २ यांत म्हटलें आहे ॥ ३९ ॥

श्लोक ४०. ब्रह्मज्ञानी पुरुष सुखःदुखांपासून मुक्त होतो व त्याला शास्त्रांच्या विधिनिषेधाचीं बंधनेंहि लागत नाहींत. तशीच भगवद्भक्ति करणाऱ्यांनाहि तीं लागू नाहींत, असा या श्लोकाचा आशय आहे.–' **एष नित्यो महिमा ब्राह्मणस्य न कर्मणा वर्धते नो कनीयान्** '–( ब्रह्मज्ञानी पुरुषाची योग्यता नित्य आहे. ती कर्मानें वाढत नाहीं किंवा न्यूनहि होत नाहीं. बृहदारण्यक–४,४,२३ ) असें श्रुति सांगते ॥ ४० ॥

श्लोक ४१. परमात्म्याचें ज्ञान झालेल्या पुरुषाला सुखःदुखादि बाधत नाहींत असें म्हटलें; पण त्याचें ज्ञान होणें हें अत्यंत कठीण आहे. तेव्हां हें ज्ञान होणार कसें ? या प्रश्नाचें उत्तर या अंतिम श्लोकांत श्रुतींनीं दिलें आहे. परमेश्वराला जर अंतच नाहीं, तर त्या नसलेल्या अंताचें ज्ञान देवांनाच काय पण परमेश्वराला तरी कसें होणार ? गोष्ट खरी. तरी पण श्रुतींच्या द्वारा त्याचें अप्रत्यक्ष ज्ञान होतें. कारण श्रुति परमेश्वराहून इतर वस्तूंचें वर्णन करून हा पदार्थ म्हणजे परमेश्वर नव्हे, तो म्हणजे परमेश्वर नव्हे, असें सांगतात व अशा रीतीनें या सर्वांहून जो वेगळा तो परमात्मा, असें अप्रत्यक्ष ज्ञान होऊं शकतें. हेंच वेदांचें कार्य. यासंबंधीं श्रुति सांगतात, –' **अन्यत्र धर्मादन्यत्राधर्मादन्यत्रास्मात्कृताकृतात्** '–( धर्म, अधर्म, कार्य, कारण इत्यादिकांहून भिन्न असें आत्मस्वरूप आहे-कठ २, १४ ). **अणोरणीयान् महतो महीयान्** '–( अणूहूनहि सूक्ष्म व मोठ्यांहूहि मोठें असें आत्मस्वरूप होय–कठ. २, २० ) या श्रुतीचेंहि तात्पर्य असेंच आहे ॥ ५१ ॥

अशा रीतीनें या वेदस्तुतींत सर्व उपनिषद्रूप वेदांताचें सार आलें असून ज्ञान व भक्ति यांची त्यांत उत्कृष्ट सांगड घातलेली आहे. याच हेतूनें शुकाचार्यांनीं या वेदस्तुतीला पुढील ४३ व्या श्लोकांत–' **अशेषसमाम्नायपुराणोपनिषद्रसः** ' म्हणजे सर्व वेद व पुराणें यांतील तत्त्वांचें सार असें म्हटलें आहे.

# श्रीधरस्वामीकृत वेदस्तुतीचें रूपान्तर

श्रीधरस्वामींनीं श्रीमद्भागवताबरोबर आपल्या टीकेंत कित्येक ठिकाणीं मुळांतील श्लोकांचा अर्थबोध सुलभ होईल असे रूपान्तराचे श्लोक घातले आहेत. वेदस्तुतीच्या श्लोकांचेंहि असें सुलभ रूपान्तर त्यांनीं केलेलें असून तें त्यांच्या टीकेंतून पुढें उतरून घेतलें आहे.

जय जयाजित जह्यगजंगमावृतिमजामुपनीतमृषागुणाम् ।
नहि भवन्तमृते प्रभवन्त्यमी निगमगीत गुणार्णवता तव ॥ १ ॥
[1]द्रुहिणवह्निरवीन्द्रमुखामरा जगदिदं न भवेत्पृथगुत्थितम् ।
बहुमुखैरपि मंत्रगणैरजस्यत्वमुरुमूर्तिरतो विनिगद्यसे ॥ २ ॥
सकलवेदगुणेरित सद्गुणस्त्वमिति सर्वमनीषिजना रताः ।
त्वयि सुभद्रगुणश्रवणादिभिस्तव पदस्मरणेन गतक्लमाः ॥ ३ ॥
नरवपुः प्रतिपद्य यदि त्वयि श्रवणवर्णनसंस्मरणादिभिः ।
नरहरे न भजंति नृणामिदं दृतिवदुच्छ्वसितं विफलं ततः ॥४॥
उदरादिषु यः पुंसां चिन्तितो मुनिवर्त्मभिः ।
हन्ति मृत्युभयं देवो हृद्गतं तमुपास्महे ॥ ५ ॥
स्वनिर्मितेषु कार्येषु तारतम्यविवर्जितम् ।
सर्वानुस्यूतसन्मात्रं भगवन्तं भजामहे ॥६॥
त्वदंशस्य ममेशान त्वन्मयाकृतबंधनम् ।
त्वदंघ्रिसेवामादिश्य परानन्द निवर्तय ॥ ७ ॥
त्वत्कथामृतपाथोधौ[2] विहरन्तो महामुदः ।
कुर्वन्ति कृतिनः केचिच्चतुर्वर्गं[3] तृणोपमम् ॥ ८ ॥
त्वय्यात्मनि जगन्नाथे मन्मनो रमतामिह ।
कदा ममेदृशं जन्म मानुष्यं संभविष्यति ॥ ९ ॥
चरणस्मरणं प्रेम्णा तव देव सुदुर्लभम् ।
यथाकथंचिन्नृहरे मम भूयादहर्निशम् ॥ १० ॥
कोऽहं बुद्ध्यादिसंरुद्धः क्व भूमन्महस्तव ।
दीनबंधो दयासिन्धो भक्तिं मे नृहरे दिश ॥ ११ ॥
मिथ्यातर्कसुकर्कशेरितमहावादान्धकारान्तर-
भ्राम्यन्मन्दमतेरमन्दमहिमांस्त्वज्ञानवर्त्मास्फुटम् ।
श्रीमन्माधव वामन त्रिनयन श्रीशंकर श्रीपते

---

१ ब्रह्मदेव. २ सागरे. ३ पुरुषार्थान्.

गोविन्देति मुदा वदन् मधुपते मुक्तः कदा स्यामहम् ॥ १२ ॥
यत्सत्वतः सदाभाति जगदेतदसत्वतः ।
सदा भासमसत्यस्मिन् भगवन्तं भजाम तम् ॥ १३ ॥
तपन्तु तापैः प्रपतन्तु पर्वतादटन्तु तीर्थानि पठन्तु चागमात् ।
यजन्तु यागैर्विवदन्तु वादैर्हरिं विना नैवं मृतिं तरन्ति ॥१४॥
अनिंद्रियोऽपि यो देवः सर्वकारकशाकिधृक् ।
सर्वज्ञः सर्वकर्ता च सर्वसेव्यं नमामि तम् ॥ १५ ॥
त्वदीक्षणवशाक्षोभमायाबोधितकर्मभिः ।
जातान् संसरतः खिन्नान्नृहरे पाहि नः पितः ॥ १६ ॥
अंतर्यंता सर्वलोकस्य गीतः श्रुत्या युक्त्या चैवमेवावसेयः ।
यः सर्वज्ञः सर्वशक्तिर्नृसिंहः श्रीमन्तं तं चेतसैवावलंबे ॥ १७ ॥
यस्मिन्नुद्यद्विलयमपि यद्भाति विश्वं लयादौ
जीवोपेतं गुरुकरुणया केवलात्मावबोधे ।
अत्यन्तान्तं व्रजति सहसा सिन्धुवत्सिन्धुमध्ये
मध्ये चित्तं त्रिभुवनगुरुं भावये तं नृसिंहम् ॥ १८ ॥
संसारचक्रक्रकचैर्विदीर्णमुदीर्णनानाभक्तापतप्तम् ।
कथंचिदापन्नमिह प्रपन्नं त्वमुद्धर श्रीनृहरे नृलोकम् ॥ १९ ॥
यदा परानंदगुरो भवत्पदे पदं मनो मे भगवँल्लभेत ॥
तदा निरस्ताखिलसाधनश्रमः श्रयेय सौख्यं भवतः कृपातः ॥ २० ॥
भजतो हि भवान् साक्षात्परमानन्दचिद्घनः ॥
आत्मैव किमतः कृत्यं तुच्छदारसुतादिभिः ॥ २१ ॥
मुञ्चन्नंगतदंगसंगमनिशं त्वामेव संचिंतयन्
सन्तः सन्ति यतो यतो गतमदास्तानाश्रमानावसन् ।
नित्यं तन्मुखपंकजाद्विगलितत्वत्पुण्यगाथामृत-
स्रोतः संप्लवसंप्लुतो नरहरे न स्यामहं देहभृत् ॥ २२ ॥
उद्भूतं भवतः सतोऽपि भुवनं सन्नैव सर्पस्रजः
कुर्वत्कार्यमपीह कूटकनकं वेदोऽपि नैवं परः ।
अद्वैतं तव सत्परं तु परमानन्दं पदं तन्मुदा
वन्दे सुन्दरमिन्दिरानुत हरे मा मुञ्च मामानतम् ॥ २३ ॥
मुकुटकुंडलकंकणकिंकिणीपरिणतं कनकं परमार्थतः ।
[1]महदहंकृतिख प्रमुखं तथा नरहरेर्न परं परमार्थतः ॥ २४ ॥
नृत्यन्ती तव वीक्षणांगणगता कालस्वभावादिभिः
भावान्सत्त्वरजस्तमोगुणमयानुन्मीलयंती बहून् ।

१ महत, अहंकार, आकाश इत्यादि.

भामाक्रम्य पदा शिरस्यतिभरं संमर्दयन्त्यातुरम्
माया ते शरणं गतोऽस्मि नृहरे त्वामेव तां वारय ॥ २५ ॥
दंभन्यासमिषेण वंचितजनं भोगैकचिंतातुरं
संमुह्यन्तमहर्निशं विरचितोद्योगक्लमैराकुलम् ।
आज्ञालंघिनमज्ञमज्ञजनतासंमाननात्सन्मदं
दीनानाथ दयानिधान परमानन्द प्रभो पाहि माम् ॥ २६ ॥
अवगमं[1] तव मे दिश माधव स्फुरति यन्न सुखासुखसंगमः ।
श्रवणवर्णनभावमथापि वा नहि भवामि यथा विधिकिंकरः ॥ २७ ॥
द्युपतयो विदुरन्तमनन्त ते नच भवान्न गिरः श्रुतिमौलयः
त्वयि फलंति यतो न म इत्यतो जय जयेति भजे तव तत्पदम् ॥ २८ ॥

---

१ ज्ञानम्

---

# श्रीधरस्वामीकृत वेदस्तुतीच्या रूपांतराचें मराठी तात्पर्य

हे अजिंक्य परमेश्वरा, स्थावर-जंगम अशा सर्व भूतांना आच्छादून टाकणाऱ्या मायेचा नाश करून तूं नित्य विजयी हो ! माया ही गुणवती दिसते, पण ते गुण तिनें खरोखर खोटेपणानेंच धारण केले आहेत. तुझ्याशिवाय जीवांना कसलेंच सामर्थ्य नाहीं; म्हणूनच वेदांनीं तुझ्या गुणसमुद्राचें वर्णन करण्याचा यत्न केला आहे ॥ १ ॥ ब्रह्मदेव, अग्नि, सूर्य, इंद्र इत्यादि देव, तसेंच हें जग हें तुझ्याहून अगदीं वेगळें असें कांहीं उत्पन्न झालेलें आहे असें नाहीं. हीं सर्व तुझींच रूपें होत. म्हणून वेदमंत्रांनीं जी अनेक प्रकारांनीं स्तुति केलेली आहे ती सर्व जन्ममृत्युरहित व विश्वरूपधारी अशा तुझीच होय ॥ २ ॥ सर्व वेदांनीं तुझ्या उत्तम गुणांचें वर्णन केलें असल्यामुळें ज्ञानी पुरुष कल्याणकारी अशा तुझ्या गुणांचें कीर्तन व श्रवण करून तुझ्या ठायीं प्रेमानें आसक्त होतात आणि तुझ्या स्मरणानें त्यांचे सारे संसाराचे क्लेश दूर होतात ॥ ३ ॥ सोन्यासारखें मनुष्यशरीर प्राप्त झालें असतांहि जर कोणी जीव श्रवण, कीर्तन, स्मरण इत्यादिकांनीं तुझी भक्ति करणार नाहींत तर हे नरहरे, त्यांचें जीवित म्हणजे भात्यानें वारा फुंकिण्यासारखेंच व्यर्थ होय ॥ ४ ॥ ऋषींच्या मार्गानें जाणारे कित्येक साधक उदर, हृदय इत्यादि स्थानीं ईश्वराचें ध्यान करतात व तो परमेश्वर त्यांना शेवटीं मृत्युचक्रापासून मुक्त करितो. त्या हृदयस्थ परमात्म्याची आम्हीं उपासना करतों ॥ ५ ॥ आपणच उत्पन्न केलेल्या जीवादिकांमध्यें शिरलेला असूनहि जो त्या जीवादिकांच्या न्यूनाधिक्यानें लिप्त न होतां सर्वात अंतर्यामिस्वरूपानें सारखाच वास करितो, त्या सत्यस्वरूप भगवंताचें आम्ही भजन करितों ॥ ६ ॥ हे ईश्वरा, मी तुझा अंशच आहें; तरी तूं मला आपल्या पायांची सेवा करावयास लाव व तुझ्या मायेनें जें बंधन उत्पन्न

केलें आहे तें दूर कर. तूं आनंदाचें परम निधान आहेस ॥ ७ ॥ हे परमात्म्या, तुझ्या कथारूपी अमृताच्या सागरांत मोठ्या आनंदानें विहार करणारे जे कित्येक कृतकृत्य पुरुष आहेत, त्यांना धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष हे पुरुषार्थहि करूपटासमान वाटतात ॥ ८ ॥ हे जगन्नाथा, तूं जो परमात्मा त्या तुझ्या ठिकाणीं माझें मन या मनुष्यलोकीं रममाण होवो. कारण ही संधि मीं घालविल्यास मग असला मनुष्यजन्म मला पुनः कधीं मिळणार आहे बरें ? ॥ ९ ॥ हे परमेश्वरा, प्रेमानें तुझ्या चरणांचें स्मरण होणें ही गोष्ट मोठी कठीण आहे. यास्तव हे नरहरे, कसेंहि करून तें स्मरण मला रात्रंदिवस होईल असें कर. ॥१०॥

हे सर्वव्यापका परमेश्वरा, बुद्धि आदिकरून उपाधींनीं वेष्टिलेला असा मी कोणीकडे आणि तुझें तेज कोणीकडे ? मला तुझें ज्ञान कोठून होणार ? यास्तव, हे दयासागरा, हे दीनांच्या कैवारी नरहरे, मला तुझ्या भक्तीचा उपदेश कर ॥ ११ ॥ हे परमेश्वरा, तुझा महिमा अगाध आहे आणि मी तर अगदीं जड बुद्धीचा आहें. तुझ्या ज्ञानाचा मार्ग मला व्यक्त कसा होणार ? कारण निरर्थक कोटिक्रमामुळें कठोर झालेल्या जंगी वादरूपी अंधकाराच्या गाभाऱ्यांत मीं भ्रमण करीत आहें ! ॥ १२ ॥ हे मधुपते, माधवा, हे वामना, हे त्रिनयना, हे शंकरा, हे श्रीपते, हे गोविंदा, असा आनंदानें जप करीत मीं केव्हां मुक्त होईन बरें ? हें जग वस्तुतः मिथ्या असतांहि सत्यस्वरूप परमेश्वराच्या अधिष्ठानामुळें सत्यासारखें भासतें; पण जग नसलें तरी परमेश्वर मात्र सत्यस्वरूपानें नित्या असतोच; अशा त्या भगवंताची आम्हांकडून सेवा घडो ॥ १३ ॥ कोणी ताप सहन करून तप करोत, कोणी पर्वतांवरून कडेलोट करून घेवोत, कोणी तीर्थाटन करोत वा कोणी वेदपठन करोत, कोणी यज्ञांचा पसारा मांडोत किंवा कोणी कोटिक्रम करून वाद करोत. यांपैकीं एकहि हरिभक्तीशिवाय जन्मरमणांतून मुक्त होत नाहीं ॥ १४ ॥ परमेश्वर स्वतः इंद्रियांनीं विरहित असला तरी सर्व देवतांच्या शक्ती त्याच्याच स्वाधीन आहेत. अर्थात सर्वज्ञ असा तोच सर्वांचा वास्तविक कर्ता असून सर्वांनीं त्याची सेवा करणें योग्य आहे. मी त्याला नमस्कार करितों ॥ १५ ॥ हे नरहरे, तूंच आमचा जनक व संरक्षक आहेस. तुझ्या केवळ पाहण्यानें त्रिगुणात्मक मायेच्या साम्यावस्थेंत क्षोभ उत्पन्न होऊन त्यामुळें आमचीं सुप्त कर्में जागृत होतात व आम्ही जन्मास येऊन संसारांत पडतों. आमचें रक्षण कर ॥ १६ ॥ परमेश्वर प्राणिमात्राच्या अंतर्यामीं राहून त्यांचें नियमन करितो, श्रुति त्याचें गुणवर्णन करितात. त्याचें स्वरूप अमुक एक प्रकारचें म्हणून सांगतां येत नसल्यामुळें युक्तायुक्त कोटिक्रमानेंच तें ठरवावें लागतें. असा जो सर्वज्ञ व सर्वशक्तिमान् लक्ष्मीपति नरसिंह त्याचा मी मनानें स्वीकार करितों ॥ १७ ॥ जीवासहित हें सर्व विश्व प्रलयकालीं परमेश्वरस्वरूपांत लीन झालें असतांहि सूक्ष्म संस्काररूपानें राहतें व सृष्टिकालीं पुनः उत्पन्न होतें; पण गुरूपदेशानें आत्मसाक्षात्कार झाला म्हणजे मात्र नदीचा समुद्रांत लय होतो, त्याप्रमाणें त्याचा आत्यंतिक लय होऊन पुनरावृत्ति होत नाहीं. त्या त्रिभुवनाच्या गुरुरूपी नृसिंहाचें मी मनांत ध्यान करितों ॥ १८ ॥ हे नरहरे, या संसारचक्राच्या करवतीसारख्या तीक्ष्ण धारेनें हे लोक विदीर्ण झाले असून भयंकर अशा अनेक

प्रकारच्या संसारदुःखांनीं होरपळून गेले आहेत. अशा आपत्तींत सांपडल्यामुळें जे कसेंहि करून तुला शरण येतील त्या पुरुषांचा तूं उद्धार कर ॥ १९ ॥ हे परमानंद देणाऱ्या सद्गुरो भगवंता, माझें मन जेव्हां तुझ्या चरणांचा आश्रय करील व तेथें त्याला स्थान मिळेल, तेव्हां सुखसाधनाचे माझे सारे श्रम दूर होऊन तुझ्या कृपेनें मला सौख्य लाभेल ॥ २० ॥ हे परमेश्वरा, तुझी भक्ति करणारे जे आहेत, त्यांना आत्मस्वरूपी तूंच परम आनंदाचा व ज्ञानाचा गाभा आहेस. असें असल्यामुळें क्षुद्र अशीं जीं स्त्रीपुत्रादिक त्यांशीं त्या तुझ्या भक्तांना काय काम असणार ? ॥ २१ ॥ हे नरहरे, शरीर व तत्संबंधीं स्त्रीपुत्रादिक यांचा संबंध सोडून साधु लोक तुझेंच रात्रंदिवस ध्यान करीत ज्या आश्रमांत निरहंकार होऊन जातात, त्या आश्रमाचा आश्रय करून मी त्या साधूंच्या मुखकमलांतून निघणाऱ्या तुझ्या पवित्र कथारूपी जलप्रवाहांत बुड्या मारून स्नान करीन व देहबंधनापासून मुक्त होईन ॥ २२ ॥ हे परमेश्वरा, सत्यरूपी अशा तुझ्यापासून जरी हें विश्व झालें असलें तरी तें कांहीं सत्य नाहीं. सत्य अशा फुलांच्या माळेपासून सर्पाचा भास झाला तरी तेथें खरा सर्प नसतो किंवा बनावट सोनें व्यवहार चालू करीत असलें तरी तें खरें सोनें होत नाहीं. वेदहि विश्वाला सत्य म्हणत नाहींत; पण तुझें अत्यंत आनंद-दायक असें जें द्वैतरहित श्रेष्ठपद तें मात्र सत्य होय. मी त्या पदाला आनंदानें वंदन करितों. हे श्रीहरे, लक्ष्मीहि ज्या तुझें स्तवन करिते, तो तूं नम्र होऊन शरण आलेल्या मला सोडून जाऊं नको ॥ २३ ॥ हे नरहरे, सोन्याचें मुकुट, कुंडलें, कंकणें, घागऱ्या इत्यादि रूपान्तर केलें तरी त्या त्याचा सोनेपणा मुळींच नष्ट होत नाहीं; त्याप्रमाणें ब्रह्मापासून झालेलें महत्तत्त्व, अहंकार, आकाश इत्यादि सर्व तत्त्वतः सत्य नसून ब्रह्मच वास्तविक सत्य आहे ॥ २४ ॥ हे परमेश्वरा, प्रकृतिरूप माया तुझ्या दृष्टिक्षेत्रांत आली म्हणजे नाचूं लागते आणि काल, स्वभाव इत्यादिकांच्या साहाय्यानें सत्त्व, रज व तम या गुणांनीं युक्त असे खेळ दाखवीत माझ्या मस्तकावर आपला जड पाय देऊन मला चुरडून दुःखी करिते. अशा स्थितींत मी तुला शरण आलों आहें. तरी हे नरहरे, तूंच आतां तिचें निवारण कर ॥ २५ ॥ हे प्रभो, मीं दांभिकपणें योग्याचा आव आणून लोकांना फसविलें. वस्तुतः विषयभोगासाठीं माझें मन उत्कंठित आहे. रात्रंदिवस नाना प्रकारचे उद्योग करून त्या श्रमानें विव्हळ झालों व मोह पावलों. मी अज्ञानी असून तुझी आज्ञा पाळिली नाहीं व अडाणी लोकांनीं मान दिल्यामुळें गर्विष्ठ झालों. हे दीनांच्या कैवाऱ्या प्रभो, तूं दयासागर व अत्यंत आनंददायक आहेस. माझें रक्षण कर ॥ २६ ॥ हे लक्ष्मीपते, तूं आपल्या ज्ञानाचा मला उपदेश कर. कारण त्या ज्ञानाच्या योगानें सुखदुःखांचा संबंध नष्ट होतो. ज्ञान न दिलें तर श्रवणभक्ति किंवा कीर्तनभक्ति तरी दे. म्हणजे तेणेंकरूनहि विधिनिषेधांच्या दास्यांतून मी मुक्त होईन ॥ २७ ॥ हे अन्तरहित परमेश्वरा, स्वर्गाधिपति इंद्रादिकांना तुझा अन्त कळत नाहीं, तसाच तो तुला स्वतःलाहि कळत नाहीं. तरी पण वेदप्रमुख शब्दांचें पर्यवसान तुझ्याच ठिकाणीं होतें. यास्तव तुझा जयजयकार करून तुझ्या त्या मोक्षदायी पदाचीच मी सेवा करितों ॥ २८ ॥

---

# अध्याय ८८ वा

---

परीक्षित् राजा म्हणतो, हे मुने, देव, असुर आणि मनुष्यें यांमधील जे कोणी अपवित्र आचरण करणाऱ्या शंकराची भक्ति करितात ते बहुतकरून वैभवशाली होऊन भोग भोगितात; पण लक्ष्मीपति श्रीहरीची भक्ति करणाराला असें वैभव प्राप्त होत नाहीं ॥ १ ॥ हें असें कां होतें हें समजून घेण्याची माझी इच्छा आहे. कारण याविषयीं मला मोठी शंका उत्पन्न झाली आहे. भगवान् शंकर व विष्णु या परस्परविरुद्ध स्वभावांच्या प्रभूंची भक्ति करणाऱ्यांना अपेक्षेविरुद्ध अशी ही स्थिति कां प्राप्त व्हावी ? ॥ २ ॥

शुकाचार्य म्हणतात, राजा, शंकर हा नित्य प्रकृतिरूप शक्तीनें युक्त असून सत्त्व व रज गुणांच्या तमोगुणाशीं झालेल्या न्यूनाधिक मिश्रणानें आच्छादिल्यामुळें तीन प्रकारचा झालेला आहे. तो अहंकारस्वरूपी असून त्याचे तीन प्रकार म्हणजे सात्त्विक, राजस व तामस हे होत ॥ ३ ॥ या अहंकारापासून मन, दहा इंद्रियें व पांच भूतें असे सोळा पदार्थ कार्यरूपानें उत्पन्न झाले. या सोळा विकारांमधील एखाद्या विकारानें युक्त असलेल्या देवतेची उपासना करणाराला त्या विकाराला अनुरूप अशा सर्व ऐश्वर्याची प्राप्ति होते ॥ ४ ॥ पण विष्णु हा अगदीं निर्गुण असून प्रकृतीच्या पलीकडील जो पुरुष तोच तो होय. तो सर्वांचा साक्षी व अंतर्यामी असल्यामुळें त्याची जो उपासना करील तो गुणांपासून अलिप्त असा सहजच होईल ॥ ५ ॥ राजा, तुझा आजोबा जो युधिष्ठिर राजा त्यानें अश्वमेध यज्ञाची समाप्ति झाल्यावर श्रीकृष्णाच्या तोंडून धर्माचें विवरण ऐकावें या इच्छेनें एकदां श्रीकृष्णाला याच विषयावर प्रश्न केला होता ॥ ६ ॥ तेव्हां मनुष्यमात्राला शाश्वत कल्याणाचा मार्ग दाखविण्यासाठीं यदुकुलांत अवतार घेतलेला जो समर्थ भगवान् श्रीकृष्ण तो संतुष्ट झाला आणि धर्मराजाची ऐकण्याची इच्छा असल्यावरून तो त्या प्रश्नाचें उत्तर त्याला देऊं लागला ॥ ७ ॥

भगवान् म्हणाला, ' युधिष्ठिरा, ज्याच्यावर मला कृपा करावी असें वाटतें. त्याचें धन मी हळूहळू हरण करतों. असें केलें म्हणजे तो निर्धन होतो व त्याला व्यवहारांत अडचणी येऊं लागतात. त्याचे बांधव त्याला सोडून जातात आणि तो दुःखी होतो ॥८॥ मग धनाच्या आशेनें तो अनेक उद्योग करतो; पण त्या प्रत्येकांत अपयश आल्यामुळें शेवटीं तो खिन्न होतो व त्यामुळें त्याच्या अंगीं विरक्तपणा येऊं लागतो. तसें होऊन माझ्याच भक्तांशीं तो मैत्री करूं लागला म्हणजे मग मी त्याच्यावर कृपा करितों ॥९॥ ब्रह्म जें आहे तें अत्यंत सूक्ष्म असून त्रिकालाबाधित, ज्ञानस्वरूपी व अंतरहित आहे. तें ब्रह्म म्हणजे मीच असल्यामुळें माझी आराधना करणें कठीण वाटून लोक दुसऱ्या देवतांच्या भजनीं लागतात ॥१०॥ या दुसऱ्या देवता थोडक्यानें संतुष्ट होणाऱ्या असल्यामुळें त्यांच्यापासून ते लोक राज्य-

संपत्ति मिळवितात व उन्मत्त होतात. आणि असे उन्मत्त झाले म्हणजे आपल्याला वर देणाऱ्या देवतांची त्यांना आठवणहि नाहींशी होते. उलट ते त्यांची हेटाळणी करूं लागतात ' ॥ ११ ॥

शुकाचार्य म्हणतात, राजा, ब्रह्मदेव, विष्णु, शिव इत्यादि ज्या ह्या देवता आहेत, त्या शाप देण्याला जशा समर्थ आहेत तशा कृपा करण्यासहि समर्थ आहेत; पण त्यांत शिव व ब्रह्मदेव हे रागावले असतां तत्काल शाप देण्यास प्रवृत्त होतात, तसेच संतुष्ट झाले असतां तत्काल कृपाहि करितात; पण श्रीविष्णूचें मात्र तसें नाहीं ॥ १२ ॥ याविषयीं एक प्राचीन ऐतिहासिक कथा सांगत असतात कीं, भगवान् शंकर अशा रीतीनें वृकासुराला वर देऊन त्यामुळें स्वत: संकटांत सांपडला होता ॥ १३ ॥ वृक नांवाचा असुर हा शकुनीचा पुत्र होता. त्याची बुद्धि दुष्ट होती. एकदां वाटेंत नारदमुनि त्याला भेटला असतां वृकासुरानें त्याला विचारिलें, 'हे नारदा, ब्रह्मा विष्णु, व शंकर यांतील देवांमध्यें तत्काल संतुष्ट होणारा देव कोण ? ' ॥१४॥ तेव्हां नारदानें उत्तर केलें, ' तूं महादेवाची उपासना कर, तो लवकर प्रसन्न होईल. हा देव थोडक्या गुणांवर संतुष्ट होणारा व तसाच थोड्याशा दोषानें तत्काळ क्रुद्ध होणारा असा आहे ॥ १५ ॥ रावण व बाणासुर यांनीं त्याची भाटांप्रमाणें स्तुति केली असतां तीमुळें संतुष्ट होऊन त्यानें त्या दोघांना अतुल ऐश्वर्य दिलें व त्या योगानें स्वत:वर मोठें संकट ओढवून घेतलें ! ' ॥ १६ ॥ याप्रमाणें नारदानें सांगितलें असतां त्या वृकासुरानें आपल्या शरीरानेंच शंकराला संतुष्ट करण्याकरितां त्याची आराधना चालविली. अग्नि हा शंकराचें मुख होय. यास्तव वृकासुरानें एका क्षेत्रामध्यें आपल्या अंगाचें मांस तोडून अग्नीमध्यें त्याच्या आहुति टाकण्यास आरंभ केला ॥ १७॥ पण अशा रीतीनें सहा दिवस हवन झालें तरी कांहीं शंकर प्रसन्न झाला नाहीं. तेव्हां सातव्या दिवशीं निराश झालेल्या वृकासुरानें शंकराच्या तीर्थानें मस्तकावरील केस भिजविले आणि तें मस्तक तो आपल्या कुऱ्हाडीनें तोडूं लागला ॥१८॥ तेव्हां अत्यंत दयाळु असलेला तो अग्नीसारखा तेजस्वी शंकर तेथील यज्ञाग्नींतून वर आला आणि त्यानें आपल्या दोन्ही हातांनीं आमच्याप्रमाणें वृकासुराचे हात धरून त्याला मस्तक छेदूं दिलें नाहीं. शंकराच्या स्पर्शामुळें त्याचें अंग लगेच पूर्वीप्रमाणें चांगलें झालें ॥१९॥ मग शंकर वृकासुराला म्हणाला, ' अरे, असलें धारिष्ट पुरे कर, अगदीं पुरे कर, ! मी तुजवर संतुष्ट झालों आहे. वर माग. तुझी इच्छा असेल तो वर मी तुला देतों. मनुष्यांनीं शरण येऊन मला जरी नुसतें पाणी दिलें तरी तेवढ्यानेंहि मी संतुष्ट होतों. अरे, तूं आपल्या शरिराला विनाकारण मोठी पीडा दिलीस ! ' ॥२०॥ शंकराचें भाषण ऐकून दुष्ट वृकासुरानें सर्व प्राण्यांना भय उत्पन्न करणारा वर त्याच्यापाशीं मागितला, तो म्हणाला, ' ज्याच्या ज्याच्या डोक्यावर मी हात ठेवीन तो प्राणी मरावा, असा वर मला दे ! ' ॥२१॥ ही मागणी ऐकून भगवान् शंकराच्या मनाला खेद वाटला; पण हे राजा, त्यानें हंसत हंसत ' ठीक आहे ! ' असें म्हणून त्याला तो वर दिला; पण हें वरदान म्हणजे सर्पाला दूध पाजण्यासारखेंच झालें

॥२२॥ कारण शंकराच्या तोंडून ' वर दिला ' असे शब्द निघतांच त्या असुराच्या मनांत देवी गिरिजेलाच पळवून न्यावें असें आलें आणि तत्प्राप्त्यर्थ आपल्याला मिळालेल्या वराची परीक्षा करावी म्हणून आपला हात शंकराच्याच मस्तकावर तो ठेवूं लागला ! हा प्रकार पाहतांच आपल्याच कृतीचें हें फळ होय असें वाटून शंकर अगदीं घाबरून गेला ॥ २३ ॥ असुर मागें लागल्यामुळें तो भयग्रस्त झाला व कांपत कांपत पळूं लागला. तो उत्तरेकडे जो धांवत सुटला तो आकाश, भूमि व दिशा यांच्या मर्यादा एकमेकांशीं भिडतात तेथपर्यंत गेला ॥ २४ ॥ शंकरावर आलेल्या या संकटाचा परिहार कसा करावा हें मोठमोठ्या देवांनाहि कळेना व ते अगदीं स्वस्थ बसून राहिले. तेव्हां शंकर तमोगुणाच्या पलीकडे असलेल्या देदीप्यमान अशा वैकुंठलोकाला गेला ॥२५॥ तेथें भगवान् नारायण त्याच्या दृष्टीस पडला. नारायण म्हणजे सर्वसंगपरित्याग केलेल्या व शांत अशा ज्ञानी पुरुषांचा उत्तम आधार होय. त्याच्या स्थानाची प्राप्ति झाली कीं तेथून कोणी माघारा येत नाहीं ॥ २६ ॥ अशा प्रकारें संकटांत सांपडलेला शंकर आला आहे असें पाहातांच सर्वांच्या पापाचें क्षालन करणाऱ्या त्या भगवान् नारायणानें योगमायेनें लहान मुलाचें रूप घेतलें व दुरूनच प्रकट होऊन शंकराच्या मागून धावत येणाऱ्या वृकासुराच्या मार्गांत तो उभा राहिला ॥ २७ ॥ त्या बटुरूप भगवंताच्या कमरेंत मेखला, अंगावर हरिणाचें चर्म, हातांत दंड व गळ्यांत रुद्राक्ष असून तेजानें तो अग्नीप्रमाणें तळपत होता. वृकासुर दिसतांच हातांत दर्भ घेतलेल्या भगवानानें त्याला नम्रपणें नमस्कार केला व त्याच्याशीं बोलण्यास आरंभ केला ॥ २८ ॥

भगवान् म्हणाला, ' हे शकुनिपुत्रा वृकासुरा, तूं खरोखर थकलेला दिसत आहेस. तूं फार दुरून चालत आला असावास असें वाटतें. तरी येथें क्षणभर बसून विश्रांति घे. मनुष्याचें हें शरीर म्हणजे सर्व इच्छा पुरविणारी कामधेनु आहे. ( अर्थात् त्याला जपून ठेविलें पाहिजे ) ॥ २९ ॥ हे समर्थ असुरा, मला असें वाटतें कीं, तूं मनांत कांहीं तरी कार्य योजून निघालेला आहेस. जर तें कार्य सांगण्यासारखें असेल तर सांग. माझ्यानें होण्यासारखें असल्यास मीं तें अवश्य करीन. सामान्यत: जो कोणी हाताशीं मिळेल त्याचें साहाय्य घेऊन आपलें कार्य सिद्धीस न्यावें अशी जगाची रीतच आहे ' ॥ ३० ॥

शुकाचार्य म्हणतात, हे राजा, याप्रमाणें अमृताचा वर्षाव करणाऱ्या गोड शब्दांनीं त्या बटुरूपधारी भगवंतानें वृकासुराला प्रश्न केला असतां तो असुर शांत झाला. त्याचे सर्व श्रम दूर झाले आणि पूर्वी आपण काय केलें, तें सर्व वर्तमान त्यानें भगवंतास सांगून टाकिलें ॥ ३१ ॥

त्याचें तें वृत्त ऐकून भगवान् नारायण म्हणाला, ' हे वृकासुरा, तूं म्हणतोस तसें जर असेल, तर मला मुळीं प्रथम त्या शंकराचें वचनच खरें वाटत नाहीं. अरे, त्या शंकराला दक्षाचा शाप होऊन त्याला पिशाचयोनि प्राप्त झाली व आता तर तो प्रेत व पिशाच यांचा राजा होऊन बसला आहे ॥ ३२ ॥ हे दानवश्रेष्ठ वृकासुरा, आतां त्याला जगद्गुरु म्हणत असल्यामुळें तुझा जर त्याच्या बोलण्यावर विश्वास असला, तर प्रथम तूं

त्याची परीक्षा पाहण्यासाठीं आपल्याच मस्तकावर हात ठेवून पाहा कसा ! ॥ ३३ ॥ हे दानवराजा, जर कदाचित् शंकराचें वचन असत्य झालें तर तो खोटें बोलणारा समजून तूं त्याला मारूनच टाक म्हणजे तो पुन्हा कधीं खोटें बोलणार नाहीं ! ' ॥ ३४ ॥ याप्रमाणें भगवान् नारायणाच्या अत्यंत मोहक अशा विचित्र शब्दांनीं त्या असुराची बुद्धि चळली. त्याला आपलें स्वत:चेंच भान राहिलें नाहीं आणि त्यानें आपला हात आपल्याच मस्तकावर ठेविला ! ॥ ३५ ॥ मग काय विचारावें ! जणूं वज्राचा आघात व्हावा त्याप्रमाणें आघात होऊन त्याचें मस्तक छिन्न झालें व तो दानव तत्क्षणीं भूमीवर पडला ! त्याबरोबर आकाशांत मोठा जयजयकार झाला. सर्वांनीं भगवंताला नमस्कार केला आणि ' फार उत्तम झालें ! ' असें म्हणून देवांनीं मोठी गर्जना केली ॥ ३६ ॥ देव, ऋषि, पितर व गंधर्व यांनीं भगवंतावर पुष्पांचा वर्षाव केला. अशा रीतीनें विष्णूनें शंकराची संकटांतून मुक्तता केली ॥ ३७ ॥ मग संकटमुक्त झालेल्या शंकराला भगवान् श्रीविष्णु म्हणाला, ' हे देवाधिदेव शंकरा, हा पापी असुर आपल्या पापानेंच मरण पावला. हे ईश्वरा, थोरांचा अपराध केल्यावर कोणत्या प्राण्याला सुख होणार आहे बरें ? मग तूं तर जगद्गुरु व विश्वाचा अधिपति आहेस. तुझा अपराध करणाराची गोष्टच कशाला ? ' ॥ ३८ ॥ ३९ ॥ परमात्मा श्रीहरि म्हणजे अविकृत अशा सर्व शक्तींचा समुद्रच होय, त्या सर्वश्रेष्ठ श्रीहरीनें प्रत्यक्ष केलेल्या शंकराच्या मुक्ततेची ही कथा जो कोणी दुसऱ्याला सांगेल अथवा स्वत: श्रवण करील, तो संसारबंधनापासून तसाच शत्रुभयापासून मुक्त होईल ॥ ४० ॥

## अठ्ठ्याऐशींवा अध्याय समाप्त

---